**घेरा**—पु· १ परीघ; वर्तुळ; वेढा. २ परिवेष्टित स्थान; वेढलेली जागा; आवार. (मु.) **घेरा डालना**—वेढा घालणें. **घेरा बाँधना**—वेढणें.

**घेवर**—पु· घीवर (पक्वान्न).

**घैया**—पु· कच्च्या दुधावरची निवळी; लोणी. [ लांछन.

**घैर—रू—रो**—पु· [ दे. ] अपकीर्ति;

**घोंघा**— पु· [ दे. ] १ शंख. २ गोगलगाय. वि· मूर्ख.

**घोंटना**—क्रि·स· [अनु.] १ घोंट-घोंट पिणें. २ पचविणें.

**घोंपना**—क्रि·स· भोसकणें; घुसविणें.

**घोंसला**—पु· घरटें.

**घोंसुआ***—पु· घरटें.

**घोखना**—क्रि·स· घोकणें; पाठ करणें.

**घोटना**—क्रि·स· १ घोटणें; वांटणें; घोटून बारीक पूड करणें. २ अभ्यास करणें; परिश्रम करणें. ३ दाबणें (गळा). ४ चिकण किंवा चकचकीत करणें.

**घोटनी**—स्त्री· लहान खल.

**घोटवाना**—क्रि· स· घोटवून घेणें; वांटवून घेणें.

**घोटा**—पु· १ बत्ता. २ घोटण्याची किंवा वांटण्याची क्रिया.

**घोटाअी**—स्त्री· १ घोटण्याची किंवा वांटण्याची मजुरी; घोटणावळ. २ घोटण्याची क्रिया; घोटणी.

**घोडा**—पु· घोडा. (मु.) **घोडे बेचकर सोना**—खुशाल झोंपणें; ताणून देणें.

**घोडानस**—स्त्री· घोडशीर.

**घोडिया**—स्त्री· १ खुंटी. २ घोडा (तुळशीखालचा). ३ घोडी. ४ छोटी घडवंची; घोडी.

**घोर**—वि· १ भयंकर. २ दाट;गाढ. ३ खोल. ४ वाअीट. ५ पुष्कळ; अतोनात. ६ कठिण; टणक.

**घोरा***—पु· १ खुंटा. २ घोडा.

**घोरी**—स्त्री· अघोरी ( अेक पंथ).

**घोलना**—क्रि·स·घोळणें; मिसळणें; अेकजीव करणें. [ २ गर्जना.

**घोषणा**—स्त्री· १ घोषणा; दवंडी.

**घोसी**—पु· गवळी.

**घौद**—पु· [दे.] घड; घोंस (फळांचा).

## च

**चंग**—स्त्री. [ फा. ] अेक प्रकारचें डफासारखें वाद्य. [ मोठा पतंग.
**चंग**—स्त्री. पतंग ( कागदी );
**चंगना***—क्रि. स. ओढणें; ताणणें; आवळणें.
**चंगा**—वि. १ निरोगी; धडधाकट. २ छान; सुंदर. ३ निर्मळ; शुद्ध.
**चंगु***—पु. १ पंजा. २ पकड; तावडी.
**चंगुल**—पु. पंजा(मांजर, पक्षी अि.चा) (मु.) **चंगुलमें फँसना**—पकडींत-तावडींत सांपडणें.
**चँगेर-री**—स्त्री. १ करंडी. २ फुलाची परडी व टोपली. ३ पखाल.
**चंच-चु***—चोंच. पु. १ अेरंडाचें झाड. २ हरीण.
**चंचरीक**—पु. भुंगा; भ्रमर.
**चंचल**—वि. चंचल; अस्थिर.
**चंचला**—स्त्री. १ लक्ष्मी. २ वीज.
**चंट***—वि. १ धूर्त; कावेबाज. २ हुशार; चलाख.
**चंड**—वि. १ अुग्र; प्रखर. २ बलवान्. ३ कठिण; बिकट. ४ रागीट; चिडचिडा.
**चडता***—स्त्री. प्रबलता.
**चँडाअी***—स्त्री. १ घाअी; त्वरा; जलदी. २ जबरदस्ती.
**चंडाल**—पु. चांडाळ; डोंब. (मु.) **चंडालचौकडी**-चांडाळ चौकडी; बदमाष लोक. [ मादक पादर्थ.
**चंडू**—पु. अफूपासून तयार केलेला
**चंडूख़ाना**—पु. [सं.+फा.] चंडू, चरस वगैरे सेवन करण्याचा अड्डा.
**चंडूबाज़**—पु. [ सं.+फा. ] चंडू पिणारा.
**चंडूल**—पु. [ दे. ] चंडोलपक्षी.
**चंडोल**—पु. अेक प्रकारची पालखी.
**चंद**—वि. [फा.] थोडे; कांहीं.
**चंदन**—पु. १ चंदनाचें झाड. २ चंदनाचें खोड. ३ चंदनाचा लेप; अुटी.
**चंदरोज़ा**—वि. [ फा. ] थोडया दिवसांचा; तात्पुरता. [ टकल्या.
**चँदला**—वि. टक्कल पडलेला;
**चँदवा**—पु. १ चांदवा. २ अेक प्रकारचा लहान मंडप व छत.
**चंदाँ**—क्रि. वि. [फा.] १ अेवढा; अितका. २ अितका वेळ.
**चंदा**—पु. चंद्र. [२ दान; देणगी.
**चंदा**—पु. [फा.] १ वर्गणी; पट्टी.
**चंदावल**—पु. [ फा. ] सैन्याच्या पिछाडीचें रक्षण करणारे सैनिक.
**चँदोवा**—पु. पाहा ‘ चँदवा ’.

**चँदिया**—*स्त्री*. १ टाळू; कवटी. २ दामटी; लहान पोळी; चानकी.

**चंद्रमा**—*पु*. चंद्र.

**चंद्रहास**—*पु*. १ रावणाच्या तलवारीचें नांव. २ तलवार; खड्ग.

**चंद्रिका**—*स्त्री*. चांदणें; मोराच्या पिसाऱ्यावरील डोळा. [ पिवळसर.

**चंपअी**—*वि*. चांफ्याच्या रंगाचा;

**चंपत**—*वि*.[ दे. ] गडप झालेला; पसारझालेला; निसटलेला; पळालेला.

**चँपना**—*क्रि. अ*. १ ओझ्याखालीं दबणें; चेपलें जाणें. २ व्याकुळ होणें. *क्रि. स*. चेपणें; दाबणें.

**चंपा**—*पु*. चांफा

**चँवर**—*पु*. १ चवरी. २ झालर. ३ घोडा अि. च्या डोक्यावर लावावयाचा तुरा.

**चँवरढार**—*पु*. चवरी ढाळणारा.

**चँवरी**—*स्त्री*. १ चवरी २ तिबेट मधील अेक प्रकारची गाय; नीलगाय.

**चअुर***—*पु*. चवरी.

**चअुहट्ट***—*पु*. चौक; चौरस्ता; बाजार.

**चक**—*पु*. १ चकवा; चक्रवाक (पक्षी). २ अेक प्रकारचें खेळणें; चक्री. ३ चाक. ४ जमिनीचा तुकडा. ५ खेडें. ६ विपुलता. ७ अधिकार. *वि*. भरपूर; पुष्कळ. ( मु. ) **चक जमना**—बस्तान बसणें.

**चकअी**—*स्त्री*. चक्रवाक पक्ष्याची मादी; चकवी. [ खेळणें.

**चकअी**—*स्त्री*. चक्र; अेक प्रकारचें

**चकचकाना**—*क्रि.अ*. [अनु.] १ थेंब थेंब बाहेर येणें. २ ओलेंचिंब होणें; भिजणें.

**चकचौंधना**—*क्रि. अ*. अतिशय प्रकाशामुळें डोळे दिपणें; अंधेरी येणें. **चकचौंध, चकाचौंध**—*स्त्री*. डोळे दिपणें; थक्क होणें.

**चकडोर**—*स्त्री*. चक्रीला ( खेळणें ) गुंडाळलेला दोरा.

**चकती**—*स्त्री*. १ ठिगळ. २ चकती; कापडाची किंवा चामड्याची पट्टी.

**चकत्ता**—*पु*. १ चकंदळ; नायट्याचा डाग किंवा चट्टा. दांतानें चावल्याचा व्रण; खूण. ३ गांध; फोड; अवाळूं ( खाजविल्यामुळें झालेलें ).

**चकना***—*क्रि. अ*. १ चकित होणें; विस्मित होणें. २ साशंक होणें'

**चकनाचूर**—*वि*. [अनु.] चक्काचूर.

**चकपकाना**—*क्रि. अ*. कावरेंबावरें होणें; स्तिमित होणें.

**चकफेरी**—*स्त्री*. प्रदक्षिणा; फेरी.

**चकबंदी**—*स्त्री*. [सं.+फा.] जमिनीचे लहान लहान तुकडे पाडणें; धुरे पाडणें. [२ नुकसान; तोटा; हानि

**चकमा**—*पु*. १ हूल; फसवणूक

**चकरबा**–पु. १ अनवस्था प्रसंग; पेंच; २ घोंटाळा; भानगड.
**चकराना**–क्रि. अ. १ चक्कर येणें; घेरी येणें. २ बुचकळ्यांत पडणें. ३ घाबरणें.
**चकरी**–स्त्री. १ चक्री; फिरकी. २ जातें. वि. अस्थिर; चंचल.
**चकला**–पु. पोळपाट. २ जातें. ३ विभाग; प्रदेश. ४ वेश्यांचा शहरांतील राहण्याचा भाग.
**चकला**–वि. रुंद. [लहान सहाण.
**चकली**—स्त्री. १ कप्पी; चाक. २
**चकलेदार**–पु. [सं.+फा.] अेखाद्या प्रदेशाचा सरकारी अधिकारी किंवा कर वसूल करणारा.
**चकवा**–पु. चक्रवाक (पक्षी).
**चकहा***—पु. चाक; चक्र.
**चका***–पु. १ चाक. २ चकवा पक्षी.
**चकाचक**–वि. [अनु.] रसभरित; रसाळ क्रि. वि. चापून, दाबून; भरपूर.
**चकाबू**–पु. चक्रव्यूह.
**चकितवंत***–वि. आश्चर्ययुक्त; विस्मयकारक. [घेणें.
**चकोटना**–क्रि. स. [अनु.] चिमटा
**चकोतरा**–पु. ओीडलिंबू; साखरलिंबू.
**चकोर**-पु. चातक पक्षी. **चकोरी**-स्त्री.
**चक्क**–पु. १ चकवा पक्षी. २ कुंभाराचें चाक.
**चक्कर**–पु. १ चाक; गोल वस्तु. २ फेरा; चक्र ३ परिभ्रमण. ४ गोंधळ; घोंटाळा.
**चक्कवअि***—वि. चक्रवर्ती; सार्वभौम (राजा).
**चक्कवा**–पु. चक्रवाक; चकवा.
**चक्का**–पु. १ चाक. २ चाकाच्या आकाराची गोल वस्तु. ३ गोटा; दगड.
**चक्का**–पु. घट्ट गोळा.
**चक्की**–स्त्री. जातें.
**चक्कू**–पु. [तु.] चाकू.
**चक्खी**—स्त्री. [दे.] स्वादिष्ट व खमंग पदार्थ (भेळ, भर्जी वगैरे).
**चक्र**—पु. १ चाक (गाडीचें, कुंभाराचें अि.). २ वर्तुळ. ३ तळहातावरील चक्र ४ चक्रवाक पक्षी.
**चक्रधर**—पु. १ विष्णु; कृष्ण. २ जादूगार. ३ ग्रामप्रमुख.
**चक्रपाणी**—पु. विष्णु.
**चक्रवर्ती**–पु. सम्राट्; सार्वभौम.
**चक्रवृद्धि व्याज**–पु. (यौ.) चक्रवाढ व्याज.
**चख***–पु. १ डोळा. २ दृष्टि.
**चख़**–स्त्री. [फा.] १ झगडा; भांडण. २ आरडाओरड; गिल्ला. (यौ.)
**चख़चख़**–बोलाचाली; तंटा. वि. १ वाअीट; खराब. २ दुष्ट.

**चटपटा**—*वि.* [अनु.] चुरचुरीत; खमंग; रुचकर.

**चटपटी**—*स्त्री.* [अनु.] १ आतुरता; घाअी; अुत्कंठा. २ चुटपुट.

**चटशाला, चटसार***—*स्त्री.* मुलांची शाळा.

**चटाअी**—*स्त्री.* चटअी.

**चटाक-ख**—*पु.* [अनु.] लांकूड मोडण्याचा आवाज.

**चटाका-खा**—*पु.*[अनु.] कडाका; कडाडण्याचा किंवा मोडण्याचा आवाज.

**चटाना**-*क्रि.स.*[अनु.] १ चाटविणें; खावविणें. २ लांच देणें. ३ धार लावणें.

**चटापटी**—*स्त्री.* [अनु.] घाअी.

**चटावन**—*पु.* [अनु.] अुष्टावण.

**चटियल**—*वि.* ओसाड; वैराण (मैदान); माळरान.

**चटुल**—*वि.* १ चपल, चंचल; तरतरीत. २ सुंदर; मनोहर.

**चटोरा**—*वि.* [अनु.] १ लालचावलेला, चटावलेला (खाण्यासंबंधीं). २ स्वादलोलुप. **चटोरापन**-*पु.* चांगले पदार्थ खाण्याची चट.

**चट्टान**—*स्त्री.* [दे.] खडक.

**चट्टा-बट्टा**—*पु.* [अनु.] १ मुलांचीं लांकडी खेळणीं. २ जादुगाराच्या पोतडींतील गोटे गोळ्या अि.(मु.) **अेकही थैलीके चट्टेबट्टे**—अेका माळेचे मणी. **चट्टेबट्टे लड़ाना**—लावालावी करणें.

**चट्टी**—*स्त्री.* [दे.] १ मुक्कामाची जागा; यात्रेकरूंची अुतरण्याची जागा. २ नुकसान; हानि.

**चटू**—*वि.* [अनु.] चटावलेला; लालचावलेला.

**चड्डा**—*पु.* [दे.] मांडीचा वरील सांधा.

**चड्डी**—*स्त्री.* लंगोट; जांघिया.

**चड्डी**—*स्त्री.*[दे.] कुरघोडीचा खेळ.

**चढना**—*क्रि.अ.* १ चढणें; वर जाणें. २ अधिक होणें; चढणें (पाणी, भाव, स्वर, आवाज अि.). ३ चढाअी करणें; चाल करणें. ४ तंबोरा, सतार अि. ची तार चढणें; ताणणें. ५ नोंद होणें; लिहिलें जाणें. ६ कर्ज देणें.

**चढवाना**—*क्रि.स.* चढवून घेणें.

**चढाअी**—*स्त्री.* १ चढणें. २ चढण. ३ हल्ला; आक्रमण.

**चढा-अुतरी**—*स्त्री.* चढअुतार करणें.

**चढा-अूपरी, चढाचढी**—*स्त्री.* चढाओढ. [२ अर्पण करणें; वाहणें.

**चढाना**—*क्रि.स.* १ चढविणें; वर नेणें.

**चढाव**—*पु.* १ वाढ; वृद्धि. २ चढण. ३ प्रवाहाच्या अुलट दिशेनें जाणें.

(यौ.)**चढाव अुतार**–चढ-अुतार; अुंच-सखल जागा.

**चढावा**—पु· १ विवाहसमयीं वर-पक्षाकडून वधूला घालावयास दिला जाणारा दागिना. २ देवाला अर्पण केलेली वस्तु (नैवेद्य). ३ अुतारा.४ अुत्तेजन. (मु.) **चढावा बढावा देना**–अुत्साह वाढविणें; अुत्तेजन देणें.

**चढोत्री**—स्त्री· [दे.] मूर्ति किंवा पोथी वगैरे पुढें ठेवण्यांत येणारी दक्षिणा; बिदागी.

**चतुरंग**–पु· १ बुद्धिबळ. २ सैन्याचे चार भाग (हत्ती, घोडेस्वार, रथी व पायदळ).

**चतुर**–वि·हुशार;प्रवीण;धूर्त;चपळ.

**चतुरअी-राअी**—स्त्री· १ चातुर्य; हुशारी. २ धूर्तपणा; चलाखी.

**चतुर्मास**–पु· चातुर्मास (पावसाळ्यांतील चार महिने).

**चद्दर**–स्त्री· [फा.] १ चादर.२नदीच्या प्रवाहावरील पाण्याची पातळी (घारेजवळील); सपाट व स्थिर असा जलपृष्ठाचा भाग.

**चनखना**–क्रि·स· चिडणें; रागावणें.

**चना**–पु· चणा; हरबरा. (मु.) **नाकों चने चबवाना**–सतावणें; हैराण करणें; नाकीं नअू आणणें.

**चपकन**—स्त्री· [अनु.] १ अेक प्रकारचा लांब अंगराखा. २कोयंडा.

**चपकना**–क्रि·अ·[अनु.] १ चिकटणें. २ लागून असणें; जुळलेलें असणें.

**चपटा, चिपटा**–वि· चपटा; बसलेला; दबलेला.

**चपडा**–पु· लाखेचा तुकडा

**चपत**—स्त्री· १ चापट; चपराक; थप्पड. २ हानि; नुकसान; चाट.

**चपना**–क्रि·अ· १ दबणें. २ शरमणें; लज्जित होणें.

**चपनी**– स्त्री· १ पणती. २ वाटी. ३ संन्याशाचा कमंडलू. [तावडतोब.

**चपरा**—क्रि·वि· [अनु.] झटपट;

**चपरास**—स्त्री· [फा.] शिपायाचा पट्टा (बिल्ल्यासह). **चपरासी**–पु· शिपाअी; पट्टेवाला. [२ चटदिशीं.

**चपरि***—क्रि· वि· १ चपळाअीनें

**चपल**—वि· १ चपळ. २ क्षणिक. ३ अुतावळा. ४ चलाख.

**चपाना**—क्रि· स· १ चेपून घेणें; रगडून घेणें. २ लाजविणें.

**चपेट**—स्त्री· १ धपाटा; थप्पड. २ संकट; आपत्ति; दडपण. ३ पकड; ताबा.

**चपेटना**—क्रि· स· १ पकडून दाबणें. २ दटावणें; धमकविणें. ३ जबरदस्तीनें पळविणें.

**चपेरना***–*क्रि. स.* चेपणें; दाबणें.
**चप्पड**—*पु.* लाकडाची साल; चीप; ढलपा; छिलका.
**चप्पन**—*पु.* [ दे. ] तसराळें.
**चप्पल**–*पु.* [दे.] चप्पल; पायतण.
**चप्पा**—*पु.* १ चार अंगुळें जमीन. २ जमिनीचा लहानसा तुकडा. ३ चतुर्थांश. ३ थोडा भाग.
**चप्पी**—*स्त्री.* चेपणें; चंपी.
**चप्पू**–*पु.* अेक प्रकारचें वल्हें. [खाणें.
**चबाना**—*क्रि. स.* चावून चावून
**चबूतरा**—*पु.* चबुतरा; ओटा.
**चबेना**–*पु.* चबीना; भाजलेलें धान्य ( हरबरे अि. ). [ रीचे पदार्थ.
**चबेनी**–*स्त्री.* फराळाचें किंवा न्याहा-
**चभाना**–*क्रि. स.* जेवावयास घालणें.
**चभोकना-चभोनना**—*क्रि. स.* [अनु.] १ खूप चोपडणें; फासणें. २ बुचकळून काढणें (तेलांत, तुपांत ); बुडवून काढणें.
**चमक**–*स्त्री.* प्रकाश; शोभा, चमक.
**चमक-दमक**—*स्त्री.* १लखलखाट. २ शोभा; दीप्ति.
**चमकना**—*क्रि. अ.* १ चमकणें; प्रकाशणें; लखलखणें; २ भरभराट होणें. ३ दचकणें; ३ लचक भरणें; चमक भरणें.
**चमकाना**—*क्रि. स.* १ चकचकीत करणें; अुजळा देणें. २ दचकाविणें भिवविणें. [ २ भपकेदार.
**चमकीला**–*वि.* १भडक;चकचकीत.
**चमकौवल**–*स्त्री.* चकचकीत करणें.
**चमगादड़**—*पु.* वटवाघूळ.
**चमचम**—*स्त्री.*[दे.] अेक प्रकारची बंगाली बर्फी; मिठाअी.
**चमड़ा**—*पु.* १ चामडें; कातडें. २ त्वचा. (मु.) **चमड़ा अुधेडना** अथवा **खींचना**–१कातडें सोलणें. फोडून काढणें; खूप चोप देणें.
**चमडी**—*स्त्री.* १ कातडें २ साल.
**चमन**—*पु.* [ फा. ] १ बगीचा; बाग. २ रमणीय स्थान.
**चमर**–*पु.* [सं.]१चवरी. २ वनगाय.
**चमरख**—*पु.* रहाटाच्या सळअीला लावलेला कातडी तुकडा (चकती).
**चमरौटी**–*स्त्री.* चांभारवाडा.
**चमरौधा**–*पु.* चामड्यानें शिवलेला ओबडधोबड जोडा.
**चमला**—*पु.* [ दे. ] भिक्षापात्र.
**चमाचम**—*वि.* चकचकीत.
**चमार**–*पु.*चांभार; **चमारिन**–*स्त्री.* चांभारीण. **चमारी**—*स्त्री.* १ चांभारीण. २ चांभाराचें काम.
**चमेली**—*स्त्री.* चमेली.
**चमोटा**—*पु.* धार लावण्याचा कातड्याचा मोठा तुकडा. **चमोटी**

—स्त्री· १ चाबूक; कोरडा. २ वेत; छडी.
**चमौवा**—पु· जुनापुराणा जोडा.
**चम्मच**—पु· [ फा. ] चमचा.
**चयन**—पु· १ संग्रह; संचय. २ निवड. ३ क्रमवार ठेवणें; रचणें.
**चर–चरक**–पु· १ दूत; जासूद. २ हेर; गुप्तचर. ३ प्रवासी; मुसाफिर.
**चरकटा**—पु·· गवत किंवा चारा कापून आणणारा माणूस. २ कमी प्रतीचा किंवा साधारण माणूस.
**चरका**—पु· [ फा. ] १ जखम. २ कपट; फसवणूक. ३ चरका; चटका; डाग.
**चरख**—पु·[फा.] १ चरक; चाक. २ चरका. ३ कुंभाराचें चाक; आकाश. ४ गोफण.
**चरखी**-स्त्री· [ फा. ] १ चाकासारखी फिरणारी वस्तु. २ लहान चरखा. ३ पाणी काढण्याची कप्पी.
**चरचना**-क्रि· स· लेप लावणें; चर्चिणें; अुटी लावणें.
**चरचराना**—क्रि· अ· [अनु.] चर चरणें; झणझणणें, वेदना होणें.
**चरन***—पु· चरण; पाय.
**चरना**— क्रि· स· चरणें.
**चरना**—क्रि· अ· हिंडणें; फिरणें.
**चरनि***स्त्री· चाल.
**चरनी**—स्त्री· १ गुरें चारण्याची जागा; गायरान. २ गुरांना वैरण घालण्याची पाटी; ३ वैरण; चारा.
**चरपट**—पु· १ धपाटा; थपड; थप्पड. २ अुचल्या; चोर.
**चरपरा**—वि· [ अनु. ] झणझणीत; तिखट. **चरपराहट**–स्त्री· १ तिखटपणा; झणझणीतपणा. २ द्वेष, मत्सर. ३ जखमेची आग; तिडीक. [ ( दुसऱ्याच्या जिवावर ).
**चरपौती**–स्त्री· [दे.] मौज मारणें;
**चरब** –वि· [ फा. ] १ चिकण. २ स्थूल; जाड. ३ चपळ.
**चरबाँक–बाक**–वि· धूर्त; चलाख; कावेबाज. [ प्रतिकृति.
**चरबा**—पु· [ फा. ] नक्कल;
**चरबी**—स्त्री· चरबी [ काष्ठेचा.
**चरम**–वि· अंतिम; शेवटचा; परा-
**चरमर**–पु· [अनु.] जोड्याचा किंवा अितर वस्तूचा कर्र कर्र असा आवाज. [ कर्र असा आवाज होणें.
**चरमराना**–क्रि· अ· [ अनु. ] कर्र
**चरवाअी–ही**—स्त्री· १ गुरें चारण्याची मजुरी. २ गुरें चारण्याचें काम-
**चरवाना**–क्रि· स· चारविणें; चारण्याचें काम दुसऱ्याकडून करून घेणें.
**चरवाहा**—पु· गुराखी.
**चरवैया**–पु· गुरें चारणारा; गुराखी.

**चरस**—पु. १ मोट. २ मादक पदार्थ; चरस. **चरसी**–पु. १ मोट हांकणारा; २ चरस पिणारा.
**चरसा**—पु. १ गाअींचें किंवा म्हशीचें कातडें. २ मोट.
**चरागाह**—पु. [फा.] गायरान; कुरण. [गप्पागोष्टींत गुंतविणें.
**चराना**—क्रि. स. १ चारणें. २
**चराव***—स्त्री. [दे.] बडबड; बकवा.
**चरिंदा**-पु. [फा.] चरणारा प्राणी; पशु.
**चरितार्थ**—वि. १ कृतार्थ; कृतकृत्य. २ तंतोतंत लागू पडणारा.
**चरित्तर**—पु. १ चरित्र. २ चालचलणूक; बागणूक (विशेषतः स्त्रियांची). ३ नखरेलपणा.
**चरित्र**—पु. १ चरित्र. २ शील.
**चरित्र-चित्रण**—पु. स्वभाव-चित्रण; स्वभाव-रेखन.
**चरी**—स्त्री. १ कुरण; गायरान. २ हिरवा चारा (कडबा).
**चरु**—पु. यज्ञाकरितां शिजविलेलें अन्न किंवा त्याचें भांडें. २ कुरण. ३ यज्ञ.
**चरेरा**—वि. [अनु.] १ चिरक्या आवाजाचा; कर्कश. २ खडबडीत; खरखरीत. [णारा; गुराखी.
**चरैया**—पु. चरणारा. २ चार-
**चरैला**—पु. [दे.] अेकावेळीं चार भांडीं ठेवतां येईल अशी चूल; चौमुखी चूल. [(लांकूड).
**चरैला**—वि. स्त्री. [दे.] फोडलेलें
**चर्ख**—पु. पाहा 'चरख'.
**चर्खा**—पु. [फा.] १ चरखा. २ रहाट.
**चर्चक**—पु. चर्चा करणारा.
**चर्ब**—वि. [फा.] १ गुळगुळीत. २ स्थूल. ३ चपळ. (यौ.) **चर्ब-ज़बान**—खुशामत्या; गोडबोल्या.
**चर्राना**—क्रि. अ. [अनु.] १ चुरचुरणें. २ अतिशय अिच्छा होणें. ३ रुक्षपणामुळें तडतडणें; फाटणें.
**चर्री**—स्त्री. [अनु.] मर्मी लागणारी गोष्ट. [२ मृत्यु.
**चलचलाव**—पु. १ प्रवास; यात्रा;
**चलता**—वि. १ चालू; प्रचलित. २ तरतरीत; हुशार. ३ कार्यक्षम. (मु.) **चलता पुर्जा**—गडबड्या; धडपड्या. **चलते बनना**—निघून जाणें.
**चलती**-स्त्री. १ चलती; प्रगति. २ आदर; सन्मान वि. चालू.
**चलन**—पु. १ चाल; गति. २ रीतिरिवाज; पद्धत. ३ चलन. व्यवहारांत येणारी गोष्ट. [२ टिकाअू.
**चलनसार**—वि. १ चालू; प्रचलित.
**चलना**—क्रि. अ. १ चालणें; गमन करणें; अेका ठिकाणाहून

दुसरीकडे जाणें. २ निर्वाह होणें. ३ प्रवाहयुक्त होणें; वाहणें. ४ वाढणें; भरभराट होणें. ५ प्रभावी किंवा परिणामकारक होणें. ६ आरंभ होणें. ७ चालू असणें. ८ टिकणें. ९ लागू होणें (मु.) **पेट चलना**–१ जुलाब होणें. २ निर्वाह होणें. **चल बसना**–मृत्यु होणें. **अपने चलते**–१ आपल्या जीवभर; स्वतः असेपर्यंत २ यथाशक्ति.

**चलनी**—*स्त्री.* चाळणी.

**चलवाना**—*क्रि. स.* चालविणें; चालावयास लावणें.

**चलाअू**–*वि.* १ टिकाअू; मजबूत. २ तात्पुरता; कामचलाअू.

**चलाका***—*स्त्री.* वीज.

**चलाचल***—*स्त्री.* गति; चाल.

**चलाचल***—*वि.* चंचल; चपल.

**चलाचली**—*स्त्री.* १ निघण्याची घाअी; गडबड २ निघण्याची तयारी किंवा वेळ. *वि.* निघावयास तयार झालेला.

**चलान**—*स्त्री.* १ गिरफदारी; अटक. २ मालाची रवानगी. ३ मालाचें बीजक. ४ आलेला किंवा धाडलेला माल. ५ रवानगी.

**चलाना**—*क्रि. स.* १ चालविणें; जावयास लावणें; चालना किंवा गति देणें. २मारणें (नेम, बंदूक). ३ अुपयोगांत किंवा व्यवहारांत आणणें.

**चलावा**—*पु.* १ रीति, चाल. २ आचरण. ३ द्विरागमन. ४ अुतारा.

**चवन्नी**–*स्त्री.* पावली; चार आणे.

**चवा***–*स्त्री.* अेकदम चोहों बाजूंस वाहाणारा वारा.

**चवाअी–अू, चवैया***–*पु.* १ निंदक; बदनामी करणारा. २ चुगलखोर.

**चवाव**-*पु.* १ लोकापवाद; अफवा. २ निंदा; बदनामी.

**चश्म**–*स्त्री.* [फा.] डोळा; नेत्र.

**चश्मक**–*स्त्री.* [फा.] १ चष्मा. २ डोळ्यांनीं खूण करणें, ३ भांडणतंटा.

**चश्मदीद**–*वि.* [फा.] डोळ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेलें; खरें.

**चश्मनुमाअी**–*स्त्री.* [फा.] डोळे वटारणें; धमकी.

**चश्मपोशी**–*स्त्री.* [फा.] दुसऱ्याच्या दोषांकडे दुर्लक्ष करणें किंवा डोळेझांक करणें.

**चश्मा**–*पु.* [फा.] १ चाळिशी; अुपनेत्र; चष्मा. २ पाण्याचा झरा.

**चष***–*पु.* चक्षु; डोळा.

**चषचोल***–*पु.* डोळ्याची पापणी.

**चषक-चसक**—पु. १ मद्याचा पेला. २ मध.
**चसक**–स्त्री. [ दे. ] पीडा; वेदना.
**चसकना**–क्रि. अ. [ दे. ] ठणकणें; वेदना होणें.
**चसका**—पु. १ चटक; आवड; आस्वाद; गोडी. २ नाद; संवय; व्यसन.
**चसना**–क्रि. अ. [ फा. ] चिकटणें.
**चस्पाँ**–वि. [ फा. ] चिकटविलेला; डकविलेला.
**चहकना**–क्रि. अ. [ अनु ] किलबिल करणें. **चहक**–स्त्री. चिवचिव; किलकिलाट; किलबिल.
**चहचहा**–पु. [ अनु. ] १ किलबिल; किलकिलाट. २ विनोद; थट्टा. वि. आनंदित व अुत्साहित करणारा.
**चहचहाना**—क्रि. अ. [ अनु. ] चिवचिवणें; किलबिल करणें.
**चहबच्चा**—पु. [फा.] १ पाण्याचा हौद; खड्डा. २ धान्य सांठविण्याचें तळघर.
**चहर***—स्त्री. १ आनंदोत्सव; आनंदीआनंद. २ आरडाओरड; कल्लोळ. [ होणें; प्रसन्न होणें.
**चहरना**—क्रि.अ.[अनु.] आनंदित
**चहल**–स्त्री. [अनु.] चिखल; गाळ.
**चहल**-स्त्री. आनंद; अुल्हास; अुत्साह.
**चहलक़दमी**–स्त्री. [अनु. + फा.] सहल; शतपावली.
**चहलपहल**–स्त्री. [अनु.] १ आनंद; अुल्हास; अुत्साह. २ धामधूम.
**चहला**—पु. चिखल; गाळ.
**चहार**—वि. [फा.] चार.
**चहारदीवारी**–स्त्री. [फा.] आवाराची भिंत ( चोहों बाजूंची ).
**चहार शम्बा**—पु. [फा.] बुधवार.
**चहारुम**—वि. [ फा. ] १ चौथा. २ अेक चतुर्थांश. [ चारी.
**चहुँ–हूँ***—वि. चार ( संख्या );
**चहेता**—वि. आवडता; लाडका.
**चहोरना**–क्रि. अ. [दे.] १ अेका जागेवरून अुपटून दुसरीकडे लावणें. (रोप). २ सांभाळणें; देखरेख करणें.
**चाँई**—वि. [दे.] १ धूर्त; ठग; कपटी; बिलंदर. २ अुचल्या.
**चाँक**—पु. धान्याच्या राशीवर रेघा ओढण्याची काठी.
**चाँकना**—क्रि. स. खळ्यांतील धान्याच्या राशीभोंवतीं रेघ ओढणें व त्यावर खुणा करणें.
**चाँचर-रि**–स्त्री. वसंतऋतूंत गायिला जाणारा अेक राग.
**चाँचु***—पु. चोंच.
**चाँटा**–पु. [अनु.] चपराक; थप्पड.
**चाँटी**—स्त्री. [अनु.] मुंगी.
**चाँड**–स्त्री. टेकू; आधार. वि. १ प्रबळ;

बलवान्. २ अुग्र. ३ तृप्त. संतुष्ट.

**चाँडना**–*क्रि. स.* [?] १ खोदणें; खणणें. २ अुपटणें;अुध्वस्त करणें.

**चांडाल**—*पु.* १ चांडाळ;अस्पृश्य. २ दुष्ट.

**चाँडिला***–*वि.* १ प्रबळ; बलवान्. २ खोडकर; खट्याळ. ३ अधिक; पुष्कळ. [ अत्यंत सुंदर व्यक्ति.

**चाँद**–*पु.* चंद्र.(मु.)**चाँद्का टुकडा**-

**चाँद्तारा**-*पु.* १ अेक प्रकारची झिरझिरीत मलमल, जीवर टिकल्या असतात. २ मोठा पतंग.

**चाँद्नी**–*स्त्री.* १ चांदणें. २ मोठी पांढरी चादर. ३ चांदवा; छत.

**चांदमारी**—*स्त्री.* भिंतीवर निशाण किंवा खूण करून बंदुकीनें नेम मारण्याचा अभ्यास.

**चाँदी**–*स्त्री.* चांदी. [ कीचा घोडा.

**चाँप**–*स्त्री.* १ चाप; दाब. २ बंदु-

**चाँपना**—*क्रि. स.* १ दाबणें; पकडींत चेपून धरणें. २ बळकावणें; दाबून ठेवणें.

**चाअु***-*पु.* आवड; गोडी; रुचि.

**चाक**—*पु.* [ फा. ] तडा; फट.

**चाक**—*वि.* [तु.] १ दृढ; मजबूत २ धट्टाकट्टा.

**चाकचक**—*वि.* [ तु. + अनु. ] चारीहि बाजूंनीं मजबूत;सुरक्षित.

**चाकना**—*क्रि. स.* मर्यादा ठरविण्याकरितां भोंवतालीं वर्तुळाकार रेघ काढणें ( विशेषतः खळ्याभोंवतीं ) व त्यावर खुणा करणें.

**चाकर**–*पु.* [फा.] चाकर; नोकर; सेवक.

**चाकरी**–*स्त्री.* [फा.] नोकरी; सेवा.

**चाकू**—*पु.* [फा.] चाकू; सुरी.

**चाक्षुष**—*वि.* डोळ्यांसंबंधीं.

**चाचर-रि***—*स्त्री.* शिमग्याच्या अुत्सवांतील नाचरंग.

**चाचरी**–*स्त्री.* योगांतील अेक मुद्रा.

**चाचा**—*पु.* काका.

**चाची**-*स्त्री.* काकी.

**चाट**—*स्त्री.* [अनु.] १ चट; चटक; गोडी; लालसा. २ नाद; खोड; व्यसन. ३ खमंग पदार्थ ( बटाटेवडा अि. )

**चाटना**—*क्रि. स.* [अनु.] चाटणें.

**चाटु**—*पु.* १ गोडगोड गोष्टी. २ खुशामत; हांजीहांजी. **चाटुकार**–*पु.* हांजीहांजी करणारा; खुशामत्या. **चाटुकारी**-*स्त्री.* खोटी स्तुति; खुशामत.

**चाड***–*स्त्री.* १प्रेम;प्रीति.२ आवड.

**चाढा***–*पु.* प्रियकर; प्रेमी.

**चातक**—*पु.* चातक; चक्रवाक पक्षी.

**चातुरी**—स्त्री॰ १ चातुर्य २ धूर्तपणा.
**चादर**—स्त्री॰ [ फा. ] पलंगपोस; चादर. २पांघरण्याचें वस्त्र;पासोडी. ३ धबधब्याचें पाणी पडत असतांना पाण्याच्या पातळीचा दिसणारा समपृष्ठभाग. ४ अेखाद्या धातूचा चोकोनी पत्रा.
**चादरा**—पु॰ [फा.] पासोडी.
**चाप**—पु॰ धनुष्य. स्त्री॰ १ दाब. २ पायांचा आवाज; चाहूल.
**चापना**—क्रि॰ स॰ दाबणें.
**चापलूस**—वि॰ [फा.] खुशामत करणारा. **चापलूसी**-स्त्री॰खुशामत
**चाबना**-क्रि॰ स॰ १ चर्वण करणें; चावणें. २ खूप खाणें; चापणें.
**चाबी-भी**—स्त्री॰ चावी; किल्ली.
**चाबुक**—पु॰ चाबूक; हंटर.
**चाम**—पु॰ कातडें; चामडें. (मु.) **चामके दाम चलाना**–अन्याय करणें;चामड्याची नाणीं चालविणें.
**चामीकर**— पु॰ सोनें; सुवर्ण. वि॰ सोनेरी. [ स्त्री॰ चहापाणी.
**चाय**-स्त्री॰[ची.]चहा. **चायपानी**.
**चायक***-पु॰ अिच्छुक.
**चार**-वि॰ चार (मु.) **चार चाँद लगना**—कळस चढणें; शोभा वाढणें. **चार दिनकी चाँदनी**—थोडे दिवस टिकणारें सुख, **चार सौ बीस**—लबाड; अट्टल बदमाष.
**चार-आअीना**-पु॰ [फा.] चिलखत.
**चारखाना**—पु॰ [फा.] चौकटी असलेलें कापड.
**चारजामा**-पु॰ [फा.]·जीन; खोगीर.
**चारण**—पु॰ भाट; स्तुतिपाठक-**चारणी**-स्त्री॰ [तट.
**चारदीवारी**—स्त्री॰ [फा.] आवार;
**चारना***-क्रि॰ स॰ चारणें.
**चारनाचार**-क्रि॰ वि॰[फा.] नाअिलाजानें; लाचार होऊन.
**चारपाअी**-स्त्री॰ बाज; खाट.
**चारयारी**-स्त्री॰ [सं.+फा.] १ चार मित्रमंडळी; चौकडी. २ सुन्नी मुसलमानांचे पहिले चार खलिफा.
**चारा**-पु॰ चारा; गवत.
**चारा**-पु॰[फा.] १ अुपाय; अिलाज. २ अधिकार; ताबा. [दावा.
**चाराजोअी**-स्त्री॰ [ फा. ] फिर्याद;
**चारु**-वि॰ सुन्दर; मनोहर.
**चाल**-स्त्री॰ १चाल; गति. २ चालण्याची ढब. ३ वागणूक; वर्तणूक. ४ रीति-रिवाज; प्रथा. ५ युक्ति; क्लृप्ति. ६ बुद्धिबळाच्या खेळांत मोहऱ्यानें केलेली खेळी. ७ हालचाल, खळबळ. ८ घडण; बनावट. ९ कावा. १० तऱ्हा; पद्धत.

**चालचलन**—*पु.* वर्तन; वागणूक; आचरण. [२ तऱ्हा; पद्धत; चाल.
**चालढाल**—*स्त्री.* आचरण; वागणूक.
**चालन**—*पु.* १ कोंडा. २ चाळण.
**चालना***—*क्रि. स.* १ हलविणें; डोलविणें; २ चाळणें. ३ नेणें. *क्रि. अ.* चालणें. [वस्ताद; कावेबाज.]
**चालबाज़**—*वि.* [सं. + फा.] धूर्त;
**चालाक**—*वि.* [फा.] १ चतुर; दक्ष; चलाख. २ धूर्त; लबाड. **चालाकी**—*स्त्री.* हुशारी; चलाखी; चाणाक्षपणा. २ धूर्तपणा; लुच्चेगिरी.
**चालान**—*पु.* पाहा 'चलान'.
**चाली**—*वि.* १ कपटी; धूर्त; कावेबाज; बेरकी. २ खोडकर; अुपद्रवी.
**चालीस**—*वि.* चाळीस.
**चालीसा**—*पु.* १ चाळीस वस्तूंचा संग्रह. २ चाळीस दिवस.
**चाव**—*पु.* १ आवड; गोडी; रुचि. २ प्रेम; प्रीति. ३ अुत्कंठा. ४ लाड; कौतुक
**चावल**—*पु.* १ तांदूळ. २ भात.
**चाशनी**—*स्त्री.* [फा.] साखरेचा अगर गुळाचा पाक.
**चाष**—*पु.* तास पक्षी.
**चाष***—*पु.* डोळा.
**चास**—*पु.* १ शेती. २ नांगरणी.
**चासा**—*पु.* १ नांगर हांकणारा. २ शेतकरी.
**चाह***—*स्त्री.* १ खबर; बातमी. २ मर्म.
**चाह**—*स्त्री.* १ अिच्छा; अभिलाष; आवड. २ प्रेम; प्रीति. ३ आदर; वाहवा; चाहा. ४ आवश्यकता; गरज; मागणी.
**चाहना**—*क्रि. स.* १ अिच्छा करणें; चाहणें. २. आवडणें; प्रेमकरणें. ३ मागणें; याचना करणें.
**चाहि***—*अव्य.* पेक्षां;—च्या पेक्षां.
**चाहिये**—*अव्य.* हवें; पाहिजे.
**चाही**—*वि. स्त्री.* आवडती; लाडकी.
**चाहे**—*अव्य.* वाटल्यास; अिच्छा असल्यास.
**चिआँ**—*पु.* चिंचोका.
**चिअुँटा**—*पु.* [अनु.] मुंगुळा.
**चिअुँटी**—*स्त्री.* मुंगी. (मु.) **चिअुँटीके पर निकलना**—मृत्यु ओढवून घेण्यासारखें कृत्य करणें; मरण्याचीं लक्षणें दिसूं लागणें.
**चिंघाडना**—*क्रि. अ.* आरोळी ठोकणें; गर्जणें (श्वापदांचें); चीत्कार करणें. **चिंघाड**—*स्त्री.* १ आरोळी; गर्जना (जनावरांची). २ चीत्कार.
**चिंचिनी***—*स्त्री.* १ चिंचेचें झाड. २ चिंच.
**चिंतना**—*क्रि. स.* १ ध्यान करणें; स्मरण करणें. २ विचार करणें; चिंतणें.
**चिंतवन***—*पु.* चिंतन.

**चिंता**—स्त्री· चिंता; काळजी.
**चिंदी**—स्त्री· [दे.] चिंधी. (मु.) **हिंदी की चिंदी निकालना**—विनाकारण कीस काढणें (क्षुल्लक गोष्टीसाठीं).
**चिअुडा, चिडवा**—पु· पोहे.
**चिक**—स्त्री· [तु.] १ बांबूच्या बारीक कामट्यांचा पडदा; चिकाचा पडदा.
**चिक**—स्त्री· [दे.] कमरेंत भरलेली अुसण किंवा चमक (अेका बाजूवर ताण पडल्यानें होणारी). [चिपीत
**चिकट**—वि· १ चिकट. २ घाण; चिप·
**चिकटना**—क्रि·अ· चिपचिपीत होणें.
**चिकना**—वि· १ गुळगुळीत; तुळतुळीत. २ ओषट; तेलकट. ३ सफाअीदार; सुंदर. ४ निसरडें. घसरडें; ५ लाघवी; लाडीगोडी लावणारा. (मु.) **चिकनी चुपडी बातें**—गोडगोड गोष्टी; कृत्रिम मधुर भाषण. **चिकनापन**-पु· **चिकनाअी चिकनाहट**—स्त्री· स्निग्धपणा; गुळगुळीतपणा. [स्निग्धता.
**चिकनाअी**—स्त्री· १ चिकणपणा.
**चिकनाना**—क्रि·स· १ स्निग्ध पदार्थ चोपडणें; चोपडें करणें. २ गुळगुळीत करणें. ३ व्यवस्थित करणें.
**चिकनिया**—वि· छानछोकी करणारा; अलबेला; रंगेल. [गर्जना.
**चिकार**—पु· श्वापदांची आरोळी;
**चिकारना**—क्रि· अ· चीत्कार करणें; चीं चीं करणें; आरोळी ठोकणें.
**चिकारा**—पु· सारंगीसारखें वाद्य. २ हरिणाच्या जातीचा प्राणी.
**चिकित्सा**—स्त्री· १ चिकित्सा; अुपाय; अिलाज. २ वैद्यकी धंदा.
**चिकित्सक**-पु· वैद्य.
**चिकुर**—पु· १ डोक्याचे केस. २ पर्वत. ३ सरपटणारे प्राणी. ४ खार. ५ चिचुंद्री.
**चिक्कट**—पु· किटण; तेलाची चिकटी; मळ. वि· मळकट; किटलेलें; मलिन.
**चिक्कन**—वि· चिकण; गुळगुळीत.
**चिक्कन**—पु· सुपारी. **चिक्का**—पु· सुपारी.
**चिचडा**—पु· [दे.] आघाडा.
**चिचडी**—स्त्री· [?] गोचिड.
**चिजारा**—पु· [फा.] कारागीर; गवंडी. [तुकडा. २ चिठ्ठी.
**चिट**—स्त्री· १ कागद किंवा कपड्याचा
**चिटकना**—क्रि· अ· [अनु.] १ तिडतिडणें; तडतड शब्द होणें. २ चिडणें.
**चिटकनी**—स्त्री· [दे.] खिटी.
**चिटकाना**—क्रि·स· [अनु.] १ कड-

कड शब्द करणें; ताडकन् मोडणें. २ चिडविणें; खिजविणें.

**चिटनवीस**—पु. [सं. + फा.] कारकून; लेखक.

**चिट्टा**—वि. पांढरा; धवल.

**चिट्टा**—पु. [?] हरबऱ्याच्या झाडावर चढविणें; फुगविणें.

**चिडवा**—पु. पोहे.

**चिट्ठा**—पु. १ खातेवही; हिशेबाची वही. २ ताळेबंद. ३ गोषवारा; जमाखर्चाची यादी. (मु.) **कच्चा चिट्ठा**—सविस्तर वृत्तांत (कांहीं अेक न लपवितां); बित्तं बातमी.

**चिट्ठी**—स्त्री. १ पत्र. २ आज्ञापत्र.

**चिट्ठीपत्री**—स्त्री. १ पत्र. २ पत्रव्यवहार. [वांटणारा; पोस्टमन.

**चिट्ठीरसाँ**—पु. [सं. + फा.] पत्रें

**चिडचिडाना**—क्रि. अ. [अनु.] १ अुलणें. २ तिडतिडणें. ३ तडकणें. ४ चिडणें; रागावणें. **चिडचिडा**—वि. चिडखोर; त्रासिक.

**चिडिया, चिडी**—स्त्री. चिमणी; पक्षी.[प्राणिसंग्रहालय; अजबखाना.

**चिडियाखाना**—पु. [सं. + फा.]

**चिडीमार**—पु. पारधी.

**चिढ**—स्त्री. १ चिरड; चीड; अप्रसन्नता. २ तिटकारा; तिरस्कार.

**चिढना**—क्रि. अ.[अनु.] १ चिडणें; कावणें; रागावणें; नाखुश होणें. २ द्वेष करणें; मनांत अढी धरणें.

**चिढाना**—क्रि. स. [अनु.] १ चिडविणें; खिजविणें. २ अुपहास करणें; वेडावणें.

**चित्**—स्त्री. चैतन्य; ज्ञान.

**चित**—पु. मन; चित्त.

**चित***—पु. दृष्टि; कटाक्ष.

**चितकबरा**—वि. कबरा; रंगीबेरंगी; ठिपकेदार.

**चितचोर**—पु. वि. मनमोहक.

**चितला**—वि. ठिपक्याठिपक्यांचा, कबरा (जनावर). [कटाक्ष.

**चितवन-नि**—स्त्री. नजर; दृष्टि;

**चितवना***—क्रि. सं. पाहाणें; अवलोकन करणें. [लक्ष्य वेधणें.

**चितवाना***—क्रि. स. दाखविणें;

**चिताना**—क्रि. स. सावध करणें. २ आठवण करून देणें; जागें करणें.

**चितावनी**—स्त्री. चेतावणी, सूचना; अिशारा.

**चितु***—पु. १ चित्त; लक्ष्य. २ मन.

**चितेरा-ला**—पु. चित्रकार. **चितेरिन चितेरी**—स्त्री. [नजर.

**चितौन-नि***—स्त्री. कटाक्ष; दृष्टि;

**चित्ती**—स्त्री. ठिपका; डाग; बिंदु.

**चित्तौर**—पु. चितोड शहर.

**चित्र**—पु. चित्र; तसबीर.

**चित्रकारी**–*स्त्री·* चित्रकला.
**चित्रशाला**–*स्त्री·* चित्रशाळा.
**चित्रसारी**–*स्त्री·* १ चित्रांनीं सुशोभित महाल. २ रंगमहाल.
**चित्राल**–*पु·*चित्रळ प्रदेश ( काश्मीर व पाकिस्तानच्या दरम्यान ).
**चिथडा**–*पु·* चिंधी; फाटका कपडा.
**चिथाडना**–*क्रि· स·* १ चिंध्या करणें; फाडणें. २ अपमान करणें.
**चिनक**–*स्त्री·* जळजळ; चुगचुग.
**चिनगारी, चिनगी**–*स्त्री·* ठिणगी. (मु.)**आँखोंसे चिनगारी छूटना**-क्रोधानें डोळे लाल होणें.
**चिनाना**–*क्रि· स·* विटांनीं अथवा दगडांनीं भिंत बांधणें; रचणें.
**चिनार**–*पु·* [ दे. ] अेक अुंच झाड.
**चिनिया**–*वि·* [ दे. ] साखरेसारखा पांढरा सफेत.
**चिनिया-केला**—*पु·* [ दे. + सं· ] लहान जातीचें गोड केळें.
**चिनिया बदाम**–*पु·* [ दे. + फा.] शेंगदाणा; भुअिमूग ( भाजलेला ).
**चिन्हाना**–*क्रि·स·* ओळख पटविणें.
**चिन्हानी**–*स्त्री·*खूण;चिह्न. २स्मृतिचिह्न; स्मारक.
**चिन्हारी***–*स्त्री·* ओळख; खूण.
**चिपकना**–*क्रि·अ·*[अनु.] चिकटणें; लिपटणें; डकलें जाणें.
**चिपकाना**–*क्रि·स·*[अनु]चिकटविणें डकविणें.
**चिपाचिपा**-*वि·*चिकट; चिकचिकीत.
**चिपचिपाना**–*क्रि· अ·* [ अनु. ] चिकट होणें; चिकचिकणें.
**चिपटना**–*क्रि·अ·* पाहा.'चिपकना'
**चिपटाना**–*क्रि·स·*पाहा 'चिमटाना'
**चिपटा**—*वि·* चपटा; बसकट; चेपटलेला.
**चिपडी,चिपरी**–*स्त्री·*गोवरी;शेणी.
**चिप्पड**–*पु·* १ पातळ सपाट तुकडा ( लांकूड, कागद, दगड अि.). २ लांकडाची साल; चीप; ढलपा. ३ तासून निघालेला लांकडाचा भाग.
**चिप्पी**—*स्त्री·* चीप; पातळ सपाट लहान तुकडा.
**चिबुक**–*पु·* हनुवटी.
**चिमटना**–*क्रि· अ·* [अनु.] १ चिकटणें. २ बिलगणें; कवटाळणें. ३ घट्ट धरणें; आवळणें.
**चिमटा**—*पु·* [ अनु. ] चिमटा.
**चिमटी**–*स्त्री·* लहान चिमटा.
**चिमटाना**—*क्रि· स·* [ अनु. ] १ चिकटविणें. २ भिडविणें; अगदीं जवळ आणणें.
**चिमडा**–*वि·* चिंवट; चामट.
**चिमनी**–*स्त्री·*[अिं.]धुराडें; चिमणी.
**चिर**—*वि·* सदैव टिकणारा.

**चिरकीं**—*वि.* [फा.] गलिच्छ; घाणेरडा. [कपडा; चिरगूट.
**चिरकुट**—*पु.* लक्तर; फाटका
**चिरजीवी**—*वि.* १ चिरंजीव; दीर्घायुषी. २ अमर.
**चिरना**—*क्रि. अ.* १ चिरणें; फाटणें. २ चीर पडणें.
**चिरवाओ, चिराओ**—*स्त्री.* चिरण्याची किंवा कापण्याची मजुरी किंवा काम. [कापविणें.
**चिरवाना**—*क्रि. स.* चिरविणें;
**चिराग़**—*पु.* [फा.] दीप; दिवा. (मु.) **चिराग़ तले अँधेरा**—दिव्याखालीं अंधार. **चिराग़ बढ़ जाना**—दिवा विझणें. **चिराग़ सहरी होना**—मरणोन्मुख होणें.
**चिराग़दान**—*पु.* [फा.] दिवा ठेवण्याचा आधार; ठाणवओ.
**चिराना**—*क्रि. स.* चिरवून घेणें; कापवून घेणें. [जळण्याची घाण.
**चिरायँध**—*पु.* चामडें, केस अि.
**चिरायता**—*पु.* काडे चिराअीत.
**चिरौंजी**—*स्त्री.* चारोळ्या.
**चिरौरी**—*स्त्री.* [दे.] झगडा; हुज्जत; बाचाबाची.
**चिलक**—*स्त्री.* १ चकाकी; झळक. २ तिडिक; ठणका; चमक.
**चिलकना**—*क्रि. अ.* १ लखलखणें; चमचम करणें. २ ठणकणें; ठसठसणें; राहूनराहून कळ अुठणें.
**चिलगोज़ा**—*पु.* [फा.] अेक प्रकारचा मेवा. (तुर्की फळ)
**चिलचिलाता**—*वि.* [अनु.] कडक; रखरखीत (अून्ह).
**चिलबिला-ल्ला**—*वि.* चुळबूळ करणारा; चळवळ्या; चंचल.
**चिलम**—*स्त्री.* [फा.] चिलिम; चिलीम.
**चिलमची**—*स्त्री.* [तु.] हात धुणें, गुळणा करणें अि. साठीं असलेलें अेक रुंद तोंडाचें भांडें; तस्त.
**चिलमची**—*स्त्री.* [फा.] चिलीम ओढणारा.
**चिलमन**—*स्त्री.* [फा.] चिकाचा पडदा.
**चिल्ल-पों**—*स्त्री.* [सं. + अनु.] आरडाओरड; ओरडा.
**चिल्ला**—*पु.* [फा.] चाळीस दिवसांचा अवधि. (मु.) **चिल्लेका जाड़ा**—कडाक्याची थंडी.
**चिल्ला**—*पु.* [दे.] अुडदाच्या किंवा मुगाच्या पिठाची तुपांत तळलेली रोटी.
**चिल्लाना**—*क्रि. अ.* ओरडणें; आरडाओरड करणें. **चिल्लाहट** *स्त्री.* आरडाओरड. [होणें.
**चिहुँकना**—*क्रि. अ.* दचकणें; चकित
**चिहुँटना**—*क्रि. अ.* चिमटा घेणें.

(मु.) चित्त चिहुँटना–मनाला बोचणें; लागणें. चिहुँटी–स्त्री· चिमटा; चिमकोरा.

चिहुर*–पु· डोक्याचे केस.

चीं—स्त्री· [फा.] चेहऱ्यावरील सुरकती किंवा आंठी (मु.) चीं–ब–जबीं होना–कपाळाला आठ्या घालणें; नाराज होणें.[तोंड वर करणें.

चीं–चपड़–स्त्री· [अनु.] प्रत्युत्तर;

चीं–चीं–स्त्री· [अनु.] चिवचिव; किलबिल. [स्त्री· मुंगी.

चींटा–पु·[अनु.] मुंगळा. चींटी–

चीक–स्त्री· आरोळी; किंचाळी.

चीकट–पु· तेलाचें किटण; गाळ. वि· मलिन; घाणेरडा.

चीकना–क्रि.अ. किंचाळणें; ओरडणें.

चीख–स्त्री· आरोळी; किंचाळी.

चीख़ना–क्रि.स· ओरडणें; किंकाळणें.

चीखना–क्रि· स· चाखणें; स्वाद घेणें.

चीज–स्त्री· [फा.] १ वस्तु २ दागिना. ३ पद; चीज (गाणें). ४ विलक्षण वस्तु. ५ महत्त्वाची वस्तु.

चीठ–स्त्री· चिखल; घाण. [वही.

चीठा–पु· [दे.] खातें; जमाखर्चाची

चीड–पु· देवदारासारखा अेक वृक्ष.

चीत*–पु· चित्रा नक्षत्र.

चीतना–क्रि· स· १ विचार करणें. २ आठवण करणें. ३ चित्र काढणें.

चीतल–पु· [दे.] चितळ; हरिणाची अेक जात. [वनस्पति.

चीता—पु· १ चित्ता. २ चित्रक

चीता–वि· विचार केलेला.

चीत्कार–पु· आरोळी; कर्कश आवाज.

चीथना–क्रि· स· १ फाडणें, चिंध्या करणें; तुकडे तुकडे करणें. २ ओरखडणें.

चीना बदाम—पु· [दे. + फा.] भुअीमुगाची शेंग (भाजलेली).

चीनी–स्त्री· [दे.] साखर.

चीनीकपूर–पु· [दे.] अेक प्रकारचा कापूर. [माती.

चीनीमिट्टी–स्त्री· [दे. + सं.] चिनी

चीन्ह–न्हा*–पु· चिह्न; खूण.

चीन्हना–क्रि· स· ओळखणें.

चीपड—पु· [दे.] डोळ्यांतील घाण; चिपाड.

चीमड–वि· चिवट; चामट.

चीर–पु· १ कापड; वस्त्र. २ वृक्षाची साल. ३ गाअीचा सड. ४ चिंधी; चिरगुट. [णाचें कातडें.

चीर–चरम*–पु· मृगचर्म; हरि-

चीरना–क्रि· स· फाडणें; चिरणें.

चीरफाड–स्त्री· १ चीरफाड. २ शस्त्रचिकित्सा.

चीरा–पु· १ जखमेंतील चिरा किंवा कांप. २ फेटे बनविण्याचे कामीं अुप-

योग होतो असा रंगीत कपडा. ३ सीमा किंवा हद्दीवरील दगड. (मु.) **चीरा लगाना**–फोड चिरणें; ऑपरेशन करणें.

**चील**–*स्त्री·* घार. [ पक्वान्न; घावन.

**चीला**–*पु·* [दे.] घारग्यासारखें अेक

**चीवर**– *पु·* संन्याशाचा फाटका कपडा.

**चुंगल**–*पु·* पंजा.

**चुंगी**–*स्त्री·* [·फा.] शहरांत येणाऱ्या मालावरील कर; जकात.

**चुंगीघर**–*पु·*[फा.+ *सं·*] जकातनाकें.

**चुंडा**–*पु·* विहीर.

**चुंडित***–*वि·* शेंडी असणारा.

**चुँदरी**–*स्त्री·* चुनडी;बुट्टीदार लुगडें.

**चुंदी**–*स्त्री·* शेंडी. [ डोळे दिपणें.

**चुँधलाना, चुँधियाना**–*क्रि· अ·*

**चुंधा**–*वि·* पिचक्या किंवा बारीक डोळ्यांचा.

**चुंबना**–*क्रि· स·*चुंबणें.

**चुअना***-*स्त्री· अ·* टपकणें; झिरपणें; गळणें.

**चुआअी**–*स्त्री·* टपकणें. [ खड्डा.

**चुआन**–*स्त्री·* १ पाण्याचा पाट. २

**चुआना**–*क्रि· स·* थेंबथेंब गाळणें; टपकविणें; पाझरविणें.

**चुकंदर**–*पु·* [फा.] बीट; अेक कंद. यापासून साखर तयार करतात.

**चुकचुकाना**–*क्रि· अ·* १ पाझरणें; झिरपणें; स्रवणें. २ घामाघूम होणें.

**चुकना**–*क्रि· अ·* १ संपणें; समाप्त होणें (काम; गोष्ट). २ बेबाक होणें; चुकतें होणें. ३ ठरणें; निश्चित होणें. ४ चुकणें; चूक होणें. ५ हुकणें; व्यर्थ जाणें.

**चुकाना**–*क्रि· स·* चुकतें करणें; फेडणें (देणें); भागविणे. [ भांडें.

**चुक्कड़**–*पु·* पाणी पिण्याचें मातीचें

**चुग़द**–*पु·* [फा.] १ घुबड. २ मूर्ख; बेअकली.

**चुगना**–*क्रि· स·* टिपणें; धान्याचा अेक अेक दाणा वेंचून खाणें (पक्ष्यांचें). **चुगाअी**–*स्त्री·* पक्ष्यांचे दाणे टिपणें.

**चुग़लख़ोर**–*पु·* [ फा. ] चहाडी करणारा. **चुग़लख़ोरी**–*स्त्री·* चुगली; चहाडी.

**चुगली**–*स्त्री·* [ फा. ] चहाडी.

**चुगाना**–*क्रि· स·* पक्ष्यांना दाणा घालणें.

**चुचकारना**–*क्रि· स·* चुचकारणें.

**चुचकारी**–*स्त्री·* [ अनु. ] चुचकारण्याची क्रिया किंवा भाव.

**चुचके-पुचके**–*वि·*[अनु.] खप्पड; बसलेले (गाल). [ झिरपणें.

**चुचाना**–*क्रि· अ·* गळणें; टपकणें.

**चुटकना**–क्रि. स. चाबूक मारणें.
**चुटकी**–स्त्री. [ अनु. ] १ चिमूट; चिमटी. २ चुटकी. (मु.) **चुटकी बजाते** अथवा **चुटकियों में**–झटपट; चुटकीसरसें. **चुटकी भरना**–१ चिमटा घेणें. २ मनाला लागेल असें बोलणें.
**चुटकुला**–पु. चुटका; विनोदी गोष्ट. (मु.) **चुटकुला छोडना**–विनोदी गोष्ट सांगणें.
**चुटिया**–स्त्री. शेंडी; शिखा.
**चुटीला, चुटैल**–वि. जखमी; घायाळ.
**चुडिहारा**–पु. कासार; बांगड्या विकणारा. [ कुरूप स्त्री.
**चुडैल**–स्त्री. १ डाकीण; हडळ. २
**चुनचुनाना**–क्रि. अ. [ अनु. ] चुणचुणणें; चरचरणें. **चुनचुना**–वि. चुणचुणणारें; चरचरणारें.
**चुनट, चुनन**–स्त्री. चुन; सुरकुती; निरी; दुमड; वळी.
**चुनना**–क्रि. स. १ वेंचणें; निवडणें; २ व्यवस्थेशीर रीतीनें लावणें; सजविणें. ३ रचणें ( भिंत; अिमारत अि.). (मु.) **दीवारमें चुनना** भिंतींत चिणणें; ठार मारणें.
**चुनरी**–स्त्री. १ चुनडी; ठिपक्या-ठिपक्यांचें अेक प्रकारचें लुगडें. २ अेक प्रकारचें रत्न.
**चुनवाना, चुनाना**–क्रि. स. वेंचविणें; दुसऱ्याकडून निवडून घेणें; पसंत करविणें.
**चुनाअी**–स्त्री. १ निवड. २ निवडण्याची किंवा वेंचण्याची मजुरी.
**चुनाँचे**–अव्य. [ फा. ] १ जसें; अुदाहरणार्थ. २ याकरितां.
**चुनाव**–पु. १ निवड, निवडण्याचें काम. २ निवडणूक.
**चुनिंदा**–वि. १ निवडक; वेंचक. २ अुत्तम; अुत्कृष्ट.
**चुनौटी**–स्त्री. चुन्याची डबी; चुनाळें.
**चुनौती**–स्त्री. १ आह्वान. २ अुत्तेजन; प्रोत्साहन.
**चुन्नी**–स्त्री. १ हिऱ्याचा किंवा माणिकाचा बारीक कण. २ चूण; चूरकणी. ३ लांकडाची भुशी.
**चुप**–वि. गप्प; स्तब्ध; चूप. **चुपका**–वि. निमूट; गप्प; चुप. **चुपकी**–स्त्री. **चुपचाप**–अव्य. मौन; स्तब्ध.
**चुपडना**–क्रि. स. [ अनु. ] १ चोपडणें; माखणें; लेपणें. २ गोड गोड बोलणें.
**चुप्पा**–वि. घुम्या; मुखस्तंभ.
**चुप्पी**–स्त्री. मौन; गुपचुप बसणें. (मु.) **चुप्पी साधना**–मूग गिळून स्वस्थ बसणें.

**चुबलाना-भलाना**-*क्रि.स.* [अनु.] चघळणें; तोंडांत घोळणें.
**चुभकना**-*क्रि. अ.* [अनु.] गटंगळी खाणें. **चुभकी**-*स्त्री.* डुबकी; गटंगळी.
**चुभना**-[अनु.] १ टोंचणें; बोंचणें. २ घुसणें; शिरणें (सुई; कांटा). ३ सलणें; जाचणें; जाचक होणें.
**चुभाना-चुभोना**-*क्रि.स.* [अनु.] टोंचणें; घुसविणें; खुपसणें.
**चुमकारना**-*क्रि.स.* ओठानें चूं चूं असा शब्द करून गोंजारणें; आंजारणें गोंजारणें.
**चुम्मा**-*पु.* [द.] चुंबन; मुका.
**चुर**-*पु.* [दे] गुंफा.
**चुर**-*-*वि.* बहुत; अधिक.
**चुरकन**-*पु.* चुरा, भुसा.
**चुरकुट-चुरकुस** *वि.* [दे.+सं.] चक्काचूर; तुकडेतुकडे.
**चुरना**-*क्रि. अ.* १ खदखदणें; शिजणें. २ सल्लामसलत होणें.
**चुरमुर**-*पु.* [अनु.] कुरकुर असा आवाज (कडक पदार्थ मोडतांना).
**चुरमुरा**-*वि.* कुरकुरीत.
**चुरमुराना**-*क्रि.अ.* [अनु.] (मोडतांना) कुरकुर असा आवाज होणें.
**चुरवाना**-*क्रि.स.* १ चोरी करविणें. २ स्वयंपाक करविणें.

**चुरा***-*पु.* चुरा; चूर्ण.
**चुराना**-*क्रि. स.* १ चोरणें. २ लपविणें. ३ कामांत कसूर करणें; अंग चोरणें. (मु.) **चित्त चुराना**-मोहून टाकणें. **आँखें चुराना**—तोंड लपविणें.
**चुराना**-*क्रि. स.* शिजविणें.
**चुरी***-*स्त्री.* बांगडी.
**चुरू***-*पु.* ओंजळ; पसा.
**चुलचुलाना**-*क्रि. अ.* खाज, कंड, सुटणें. **चुलचुली**-*स्त्री.* खाज; कंड.
**चुलाबुलाना**—*क्रि. अ.* १ चुळबुळ करणें. २ अधीर होणें. **चुलबुला**-*वि.* १ चुळबुळ करणारा; चंचल. २ खोडकर. **चुलबुलापन**-*पु.* १ खोडकरपणा; खेळकरपणा. २ चुळबुळ; चंचलता. **चुलाबुलाहट** *स्त्री.* चुळबुळ; अधीरता; चंचलता.
**चुलाना**-*क्रि. स.* थेंब थेंब गाळणें; टपकविणें.
**चुल्लू**-*पु.* पसा; ओंजळ (मु.) **चुल्लू भर पानी में डूब मरो**—लाज वाटूं दे.
**चुवना***-*क्रि. अ.* झिरपणें.
**चुवाना***-*क्रि. स.* थेंब थेंब गाळणें.
**चुसना**—*क्रि. अ.* चोखलें जाणें.
**चुसकी**-*स्त्री.* १ घोंट; घुटका. २ झुरका. **चुसनी**-*स्त्री.* १ चोखणी;

चोखणें. २ लहान मुलांना दूध पाजावयाची बाटली.

**चुसाना**–क्रि. स. चोखविणें.

**चुस्त**–वि. [फा.] १ घट्ट; आवळ; तंग. २ चपळ; तरतरीत; चलाख. ३ दृढ; मजबूत. [पणा; चपळाओी.

**चुस्ती**–स्त्री. [फा.] चलाखी; तरतरीत-

**चुहचुहाना**—क्रि. अ. [अनु.] १ पक्ष्यांचें किलबिलणें; चिवचिव करणें. **चुहचुहा, चुहचुहाता**–वि. १ चिवचिव अशा आवाजाचा. २ मधुर; रसाळ. [दाबणें.

**चुहटना**–क्रि. स. [दे.] तुडविणें;

**चुहल**—स्त्री. [अनु.] विनोद; थट्टा; मस्करी. [थट्टेखोर; मस्कऱ्या.

**चुहलबाज़**—वि. [अनु. + फा.]

**चुहुँटी**–स्त्री. [दे.] चुटकी.

**चूँ**—क्रि. वि. [फा.] १ म्हणून; यासाठीं. २ जर. (मु.) **चूँ तक न करना**–ब्र देखील न काढणें. **चूँ व चिरा करना**–हुज्जत घालणें.

**चूँ कि**–क्रि. वि. [फा.] कारण कीं; यासाठीं कीं.

**चूँ चूँ**–पु. [अनु.] चिंवचिंव.

**चू**—अव्य. [फा.] १ समान. २ जेव्हां. ३ जर.

**चूक**–स्त्री. [दे.] चूक.

**चूकना**–क्रि. अ. १ चुकणें; चूक करणें; २ संधि घालविणें.

**चूची**–स्त्री. स्तन. [२ तरुण.

**चूज़ा**—पु. [फा.] १ कोंबड्याचें पिलूं.

**चूड़ाँत**—पु. पराकाष्ठा; शेवटची मर्यादा. क्रि. वि. बहुत; अधिक.

**चूडा**–स्त्री. [दे.] १ शेंडी. २ शिखर.

**चूडा**–पु. [दे.] लग्नचुडा.

**चूडाकरण**—पु. जावळ अथवा शेंडी ठेवण्याचा संस्कार.

**चूडामणि**—पु. १ डोकींत घालावयाचा अेक दागिना. २ सर्वश्रेष्ठ व्यक्ति. [रेकॉर्ड; ध्वनिमुद्रिका.

**चूडी**—स्त्री. १ बांगडी; कांकण. २

**चूडीदार**–वि. [सं. + फा.] गोल घेरे असलेली. **चूडीदार पायजमा**–तंग व गोल घेरे असलेली चुणीदार विजार.

**चूतड**–पु. कुल्ला; ढुंगण; नितंब.

**चूतिया**–वि. मूर्ख; अुपटसुंभ.

**चून**–पु. पीठ; भुगा; चूर्ण.

**चूना**–चुना. [टपकणें; झिरपणें.

**चूना**–क्रि. अ. थेंब थेंब गळणें;

**चूनादानी**—स्त्री. [सं. + फा.] चुन्याची डबी.

**चूनी**—स्त्री. १ चूण (जनावरांना घालण्याची); भुसा. २ कण्या.

**चूमना**–क्रि. स. मुका घेणें; चुंबणें.

**चूमा**—पु॰ चुंबन; मुका.
**चूर**—वि॰ १ तल्लीन, गुंग २ धुंद.
**चूर**—पु॰ चुरा; चूर्ण. (मु.) **चूरचूर करना**—तुकडे तुकडे करणें; भुगा करणें.
**चूरन**-पु॰ चूर्ण; भुकटी.
**चूरमा**-पु॰ चुरमा.
**चूरमूर**-पु॰ [दि.] जोंधळ्याचें किंवा बाजरीचे सड; खुंट.
**चूरा**-पु॰ चूर्ण; भुगा.
**चूल**-पु॰ १ शिखा; शेंडी. २ केस.
**चूल**—स्त्री॰ [दे.] कुसू; सांधा करण्यासाठीं लाकडाचा निमुळता केलेला भाग.
**चूल्हा**-पु॰ चूल; शेगडी.
**चूसना**-क्रि॰ स॰ चुंफणें; चोखणें; शोषून घेणें.
**चूहडा, चूहर**-पु॰[?] भंगी; मेहेतर.
**चूहा**-पु॰ [अनु.] उंदीर. [सांपळा.
**चूहादान**-पु॰[अनु.+फा.] उंदराचा
**चेचक**—स्त्री॰ [फा.] देवीचा रोग.
**चेटक**-पु॰ १ सेवक; नोकर. २ दूत. ३ थाटमाट. ४ जादुगिरी.
**चेटकी**—पु॰ १ चेटूक करणारा; जादूगार. २ कुतूहल दाखविणारा; चमत्कार दाखविणारा. स्त्री चेटकीण.
**चेटी**-स्त्री॰ दासी.
**चेत**-पु॰ १ चेतना; सावधानता; जागृति. २ स्मरण; आठवण.
**चेतना**-स्त्री॰ चेतना, शुद्धि; शुद्धीवर असणें. [जागें होणें.
**चेतना**—क्रि॰ अ॰ सावध होणें.
**चेताना**-क्रि॰ स॰ सावध करणें; अिशारा देणें.
**चेतावनी**-स्त्री॰ चेतावणी; अिशारा.
**चेतिका***-स्त्री॰ चिता.
**चेर-रा***-पु॰ १ नोकर. २ शिष्य.
**चेराअी***—स्त्री॰ दास्यत्व.
**चेरी**—स्त्री॰ नोकरी; सेवा; दासी.
**चेला**—पु॰ १ शिष्य. २ शागीर्द.
**चेलिन, चेली**—स्त्री॰ शिष्या; विद्यार्थिनी.
**चेष्टा**-स्त्री॰ १ प्रयत्न; अुद्योग. २ अंगविक्षेप. ३ कामना; अिच्छा.
**चेहरा**-पु॰ [फा.] १ चेहरा; तोंड. २ पुढचा भाग. (मु.) **चेहरा अुतरना**—तोंड अुतरणें. **चेहरा होना**—सैन्यांत दाखल होणें.
**चैत**-पु॰ चैत्र महिना.
**चैती**-१ चैत्र महिन्यांत येणारें पीक (रब्बीचें पीक). २ चैत्रांत गायिला जाणारा विशिष्ट संगीत प्रकार.
**चैन**-पु॰ चैन; आराम; सुख. (मु.) **चैन अड़ाना**-चैन करणें. **चैनकी नींद सोना**-निश्चिंत मनानें राहाणें. **चैनकी बन्सी बजाना**-चैन करणें.

**चैला**–पु· १ फोडलेलें लांकूड. २ जळण.

**चोंगा**–पु· [ ? ] नळकांडें; पोकळ नळी ( वस्तु वगैरे ठेवण्यासाठीं कागद, टिन अि.ची ).

**चोंच**–स्त्री· चोंच; तोंड.

**चोंच**—वि· १ अगाअू; शिष्ट. २ धूर्त; चलाख.

**चोंचाल**-वि· चवचाल; चंचल; अुल्लू.

**चोंचोंका मुरब्बा**–पु·[यौ.] गडबड; गोंधळ; चुथडा.

**चोंथ**–पु· [ अनु.] शेणाचा पोहटा.

**चोआ**–पु· अेक सुगंधित द्रव्य.

**चोकर**–कोंडा; भुसा.

**चोखा**–वि· १ चोख;खरा. २अुत्तम; श्रेष्ठ. ३ स्वच्छ; शुद्ध. पु· तिखट-मीठ लावलेले बटाटे किंवा भाजी.

**चोग़ा**–पु· [ तु. ] पोकळ, पायघोळ अंगरखा.

**चोज**–पु· [?] १ व्याजोक्ति; अुप-हासगर्भित विनोद. २ सुभाषित.

**चोट**–स्त्री· १ आघात; प्रहार; टोला. २ घाव; जखम.

**चोटी**–स्त्री· १ शेंडी. २ शिखर. (मु.) **चोटीका पसीना अेडीतक बहाना**–खूप परिश्रम करणें; घाम गाळणें.

**चोट्टा**–पु· चोर; चोरटा.

**चोप***–पु· १ अिच्छा; मनीषा. २ आवड; रुचि. ३ अुत्साह.

**चोपी**–वि·१ अिच्छुक. २ अुत्साही.

**चोपना***–क्रि· अ· मोहित होणें; आसक्त होणें.

**चोब**–स्त्री· [ फा. ]१ तंबूचा खांब. २ नगारा वाजविण्याची कामटी. ३ सोनें किंवा चांदीचा मुलामा दिलेला दंडा. ४ सोटा; दंड.

**चोबा**–पु· [फा.]भात (शिजविलेला).

**चोर**–पु· चोर.

**चोरकट**–पु· चोर; अुचल्या.

**चोरख़ाना**–पु·[हि+फा.] चोरकप्पा.

**चोरथन**—वि· स्त्री· धारेच्या वेळीं दूध चोरून ठेवणारी गाय, म्हैस वगैरे.

**चोरी**–स्त्री· चोरी.

**चोल**–पु· १ चोळी. २ अंगरखा. ३ वल्कल. ४ कवच. ५ अेक लता. ( हिच्यापासून लाल रंग निघतो ).

**चोलनी**–पु· १ कफनी. २ शरीर.

**चोलरंग**–पु· पक्का लाल रंग.

**चोला**—पु· १ पायघोळ अंगरखा; साधूंची पायघोळ कफनी. २ अंग; शरीर. ( मु. ) **चोला छोड़ना**–प्राणत्याग करणें. **चोला बदलना**–देहांतर करणें.

**चोली**—स्त्री॰ चोळी. (मु.) **चोली-दामनका साथ**-घनिष्ट मैत्री.

**चौंक**-पु॰ दचक.

**चौंकना**-क्रि॰अ॰ दचकणें; बिचकणें.

**चौंकाना**-क्रि॰ स॰ दचकविणें; दिपविणें. [ दिपणें.

**चौंघ**-स्त्री॰ लखलखाटामुळें डोळे

**चौंधियाना**-क्रि॰ अ॰ दिपणें; प्रकाशानें डोळे दिपणें.

**चौंरी**—स्त्री॰ १ चवरी. २पांढऱ्या शेपटीची गाय.३वेणीचा आगवळ.

**चौआ**—पु॰ १ चतुष्पाद जनावर. २हाताचीं चार बोटें.

**चौक**-पु॰१चौक.२रांगोळी घातलेली जागा.(मु.) **चौक पूरना**-रांगोळी घालणें.

**चौकडी**-स्त्री॰ १ चौखुर धांवणें (हरिणाचें). २लांब उडी. ३ चार माणसांचा समूह; चौकडी. (मु.) **चौकडी भूल जाना**—अत्यंत घाबरणें; कांहीं न सुचणें.

**चौकन्ना**— वि॰ सावध; जागा; जागरूक.

**चौकस**-वि॰ १ सावध; जागरूक. २ ठीक; बरोबर. **चौकसी**-स्त्री॰ सावधगिरी; हुशारी; खबरदारी.

**चौका**—पु॰ १ स्वयंपाकाची जागा. २ चौकोनी तुकडा. ३ चौक.

**चौकी**—स्त्री॰ १ नाकें; चौकी. २ चौरंग. ३ पडाव; मुक्कामाची जागा. ४ पहारा. ५ लहान पोळपाट. ६ देवास किंवा पीरास अर्पण केलेल्या वस्तू.

**चौकोर**-वि॰ चौकोनी.

**चौखंड**-पु॰ १ चार मजली घर. २ चार चौकी वाडा.

**चौखट**-पु॰ चौकट.

**चौखटा**-पु॰ चौकट; फ्रेम.

**चौखूँट**-पु॰ चारी दिशा; भूमंडळ. क्रि॰ वि॰ चोहींकडे.

**चौखूँटा**—वि॰ चौकोनी.

**चौगान**-पु॰ [ फा. ] १ अेक प्रकारचा चेंडूचा खेळ; पोलो. २ पोलोचें मैदान. ३ नगारा वाजविण्याच्या कामट्या.

**चौगिर्द**—क्रि॰ वि॰ [ स॰ + फा.] चोहोंकडे; चोहों बाजूंस.

**चौगुना**—वि॰ चौपट.

**चौगोशिया**—स्त्री॰ [ फा. ] चार टोकांचें टोपडें.

**चौघड**-पु॰ दांतांच्या हिरड्या.

**चौघडा**-पु॰ चार कप्पे असलेला विड्याचा डबा.

**चौचीर**-वि॰ चिंधड्या.

**चौडा**—वि॰ रुंद. **चौडाओ**—स्त्री॰ **चौडान**—स्त्री॰ रुंदी.

**चौतनी**—*स्त्री*· चार बंदांचें टोपडें.
**चौतरा**–*पु*·चबुतरा.
**चौथ**–*स्त्री*·१चतुर्थी.२चौथा हिस्सा; चतुर्थांश. **चौथा**–*वि*· चवथा.
**चौथपन***–*पु*· म्हातारपण.
**चौथाअी**—*स्त्री*· चौथाअी; अेक चतुर्थांश.
**चौदस**—*स्त्री*· चतुर्दशी.
**चौदह**–*वि*· चौदा.
**चौधरी**–*पु*· ज्ञातीचा प्रमुख.
**चौपअी–चौपाअी**— *स्त्री*· चौदा मात्रांचा अेक छंद.
**चौपट**–*वि*· नष्ट; नाश झालेला. **चौपटा**–*वि*· नाश करणारा.
**चौपड**—*स्त्री*· पाहा 'चौसर'.
**चौपाया**–*पु*· चतुष्पाद प्राणी (गाय, म्हैस अि.).
**चौपाल**–*पु*· १ वरून छप्पर असलेली, पण चोहों बाजूंनीं खुली अशी बसण्याची जागा. २ बैठक. ३ ओसरी. ४ दालन. ५ चावडी. ६ पालखी.
**चौबगला**–*पु*· [स·+फा.]बाराबंदी.
**चौबा** } *पु*· चतुर्वेदी ब्राह्मण.
**चौबे**
**चौबारा**—*पु*· दुसऱ्या मजल्यावरील बसण्याची मोकळी जागा.
**चौबारा**—*क्रि· वि*· चौथ्यांदा.
**चौबीस**—*वि*· चोवीस.
**चौभड**–*स्त्री*· दाढ. [चारमजली.
**चौमंज़िला**—*वि*· [स· + फा.]
**चौमासा**—*पु*· चातुर्मास. **चौमासिया**–*वि*· चातुर्मासांत होणारा.
**चौमुखा**–*वि*· चारी बाजूंस; चार तोंडांचा. [चौरस्ता; चौक.
**चौमुहानी**—*स्त्री*· [सं· + फा.]
**चौरंग**–*पु*· तलवारीचा हात; खेळ. *वि*· तलवारीच्या वारानें कापला गेलेला.
**चौरंगा**–*वि*· चार रंगांचा.
**चौरस**–*वि*· १ चौरस. २ सपाट.
**चौरस्ता**–*पु*· चौक.
**चौरा**–*पु*· १ चबुतरा. २ समाधिस्थानाचा चबुतरा. ३ घरांतील दालन; सोपा. ४ चवळीची शेंग.
**चौराअी**–*स्त्री*· चवळीची पालेभाजी.
**चौरानबे**–*वि*· चौऱ्याण्णव.
**चौरासी**–*वि*· चौऱ्यांशी.
**चौराहा**–*पु*· चौक; चौरस्ता.
**चौरी**–*स्त्री*· लहान चबुतरा.
**चौरेठा**–*पु*·ओल्या तांदुळाची पिठी.
**चौल**–*पु*· मुंडण; जावळ.
**चौवन**–*वि*·चोपन्न.
**चौवा**–*पु*· चारी बोटांभोंवतीं गुंडाळला जाणारा दोरा; चार अंगुळें.
**चौवालीस**–*वि*· चव्वेचाळीस.

**चौसर**–पु· १ चौपट; सोंगट्यांचा खेळ. २ सोंगट्यांचा पट.

**चौसर**–पु· चार लडींचा हार.

**चौहट्टा**–पु· १ चौक; चौरस्ता. २ चोहोंकडून दुकानें असलेला चौक.

**चौहद्दी**–स्त्री· [सं· + फा.] चारी बाजूंची हद्द.

**चौहत्तर**–वि· चौऱ्याहत्तर.

**चौहरा**–वि· चार पदरी; चौघडीचा; चौपदरी.

## छ

**छंग***–पु· १ अुत्संग; मांडी; कूस. २ छाती.

**छंगुलिया, छंगुली***–स्त्री· करंगळी.

**छँटना**–क्रि· अ· १ अलग होणें. दूर होणें. २ निवडलें जाणें. ३ साफ होणें; स्वच्छ धुतलें जाणें. ४ अशक्त होणें. (मु.) **छँटा हुआ**–१ निवडलेला. २ धूर्त; कावेबाज.

**छँटवाना**–क्रि· स· १ निवड करून घेणें. २ कापविणें; तोडून घेणें. ३ सोलविणें.

**छँटाअी**–स्त्री· कापणें, निवडणें, धुणें अि. काम व त्याची मजुरी.

**छँडना**–क्रि· स· १ टाकणें; सोडणें २ कांडणें; कुटणें. [काढून घेणें.

**छँडाना***–क्रि· स· हिसकावून घेणें;

**छंद**–पु· १ छंद. २ अभिलाषा; अिच्छा. ३ नाद; बंधन. ४ कपट; फसवणूक. ५ युक्ति.

**छः**–वि· सहा.

**छअी**–वि· क्षयी; क्षय होणारा किंवा झालेला. पु· चंद्र.

**छकडा**–पु· [दे.] मालाची वाहतूक करणारी बैलगाडी.

**छकडी**–स्त्री· १ सहांचा समूह; गट. २ सहा भोयांनी अुचलावयाची पालखी. ३ सहा घोड्यांची गाडी.

**छकना**–क्रि· अ· १ तृप्त होणें; संतुष्ट होणें (खाअून पिअून). २ दारू पिअून तर्र होणें. [२ त्रासणें.

**छकना**–क्रि· अ· १ चकणें; फसणें.

**छकाना**–क्रि· स· १ खावयास प्यावयास देअून तृप्त करणें. २ मद्यानें अुन्मत करणें.

**छकाना**–क्रि· स· १ चकविणें; आश्चर्यचकित करणें. २ त्रास देणें.

**छक्का**–पु· १ छक्का (पत्त्याच्या खेळांतील). २ सहांचा समूह किंवा सहा भागांची वस्तु. ३ द्यूतांतील अेक डाव. (मु.) **छक्का**

पंजा—छक्के पंजे; डावपेंच. छक्के छूटना—१ बुद्धि ताळ्यावर न राहणें. २ धीर सुटणें.
छगडा—पु. बोकड.
छगन*—वि. छबकडा; सोनुला; लहान मुलांस लाडानें म्हणावयाचा शब्द. पु. लहान मूल; आवडतें मूल.
छगल—पु. बकरा.
छगुनी—स्त्री. करंगळी.
छछिआ-छछिया — स्त्री. ताक पिण्याचें किंवा मापण्याचें अेक लहान भांडें.
छछूँदर—पु. १ घूस. २ अेक प्रकारचा ताअीत. ३ फटाक्याचा अेक प्रकार (चिचुंद्री).
छजना—क्रि. अ. १ खुलून दिसणें; शोभणें; अुठावदार दिसणें. २ योग्य असणें; साजेसें असणें.
छज्जा—पु. १ सज्जा; गॅलरी. २ छताचा भिंतीच्या पुढें आलेला भाग.
छटकना—क्रि. अ. [अनु.] १ निसटणें; सटकणें. २ दूर दूर राहणें. ३ अुडी घेणें. ४ तावडींतून सुटणें.
छटकाना—क्रि. स. [अनु.] १ निसटूं देणें; सटकूं देणें. २ हिसडा देअून पकडींतून सोडविणें. ३ ओढून काढणें (पकडींत किंवा दाबाखालीं असलेल्या वस्तूस).
छटपटाना—क्रि. अ. [अनु.] १ तडफडणें; हातपाय झाडणें. २ तळमळ होणें; बेचैन होणें.
छटपटी—स्त्री. १ तळमळ; बेचैनी, घाबरें. २ तीव्र अुत्कंठा.
छटाँक—स्त्री. छटाक (वजन).
छटा—स्त्री. १ प्रकाश; दीप्ति. २ सौंदर्य; शोभा. ३ वीज.
छटा—वि. १ निवडक. २ धूर्त; बनेल. ३ पक्का.
छठ—स्त्री. षष्ठी (तिथि).
छठा—वि. सहावा.
छठी—स्त्री. जन्मानंतर सहाव्या दिवशीं होणारी पूजा किंवा संस्कार; सहावी. (मु.) छठीका दूध याद आना—हैराण होणें; ब्रह्मांड आठवणें.
छड़—स्त्री. १ गज; आकडा. २ लांब व पातळ काठी. [दागिना.
छडा—पु. पायांत घालावयाचा
छडा— वि. अेकटा; अेकाकी.
छडिया—पु. पहारेकरी.
छत*—पु. क्षत; घाव; जखम.
छत—स्त्री. १ छत; चांदवा. २ गच्ची.
छत*क्रि. वि. असून देखील; राहून.
छतगीर—छतगीरी— स्त्री. [सं.+फा.] छत; चांदवा.

**छतरी**–स्त्री· १ छत्री. २ मंडप. ३ समाधीवरील छत्री. ४ कबुतरांसाठीं बांधलेला बांबूंचा ताटवा.
**छतिया***—स्त्री· छाती; वक्षस्थळ.
**छतियाना**—क्रि· स· १ आलिंगन देणें; कवटाळणें. २ बंदूक अुडवतेवेळीं मूठ (कुंदा) छातीस लावणें.
**छतिवन**–पु· सप्तपर्णी; अेक वटवृक्ष.
**छतीसा**—वि· १ चतुर; शहाणा. २ धूर्त; कावेबाज.
**छत्ता**—पु· १ छत्री. २ मधमाशांचें पोळें. ३ छत्रीसारखी दूरवर पसरलेली वस्तु.
**छत्तीस**—वि· छत्तीस. (मु.) **छत्तीसका रिश्ता**—छत्तीसाचा आंकडा; वैर.
**छत्रछाया**—स्त्री· कृपाछत्र.
**छत्रबंधु**—पु· हीन कुळांत जन्मलेला क्षत्रिय.
**छत्राक**–पु· कुत्र्याची छत्री; अळंबें.
**छद**—पु· आवरण. [हिस्सा.
**छदाम**–पु· छदाम; पैशाचा चौथा
**छद्मी**—वि· कृत्रिम वेश धारण करणारा; कपटी; फसव्या.
**छन, छनक***—पु· अेक क्षण.
**छनक**–पु· [अनु.] १ छनछन असा आवाज; झणत्कार. २ छनछन आवाज होणें. ३ सटकणें; पसार होणें; दचकून पळणें. **छनकना**–क्रि· अ·
**छनकाना**–क्रि·अ· [अनु.] १ सावध करणें; जागें करणें. २ छनछन आवाज करणें.
**छनछनाना**–क्रि· अ· [अनु.] १ छनछन आवाज होणें. २ अुकळत्या तेलांत पाणी पडल्यामुळें तडतड आवाज निघणें. २ झंकार होणें.
**छनदा***—स्त्री· रात्र.
**छनना**—क्रि· अ· १ गाळलें किंवा चाळलें जाणें. २ छिद्रें पडणें; चाळणी होणें. ३ चौकशी होणें. ४ कढअींतून तळलेला पदार्थ बाहेर काढणें. ५ अंमल चढणें. ६ लागणें; जखम होणें (मु.) **गहरी छनना**—गाढ मैत्री असणें. [चाळवून घेणें.
**छनाना**—क्रि· स· गाळवून किंवा
**छनिक***-वि· क्षणिक; क्षणभंगुर.
**छन्न**–पु· [अनु.] तापलेल्या पदार्थावर पाणी पडल्यानें होणारा आवाज.
**छप**—स्त्री· [अनु.] अेखादी वस्तु पाण्यांत अेकदम पडल्याचा आवाज. क्रि· वि· सप् सप् (पाअूस पडण्याचा) आवाज.
**छपका–छपाका**—पु· डोक्यावर घालण्याचा अेक अलंकार.

**छपका-पाका**—*पु.* [अनु.] १ पाण्यांत हातपाय मारण्याची क्रिया. २ पाण्याचा सपका.
**छपद्**—*पु.* भ्रमर; भुंगा.
**छपन***—संहार; नाश.
**छपना**—*क्रि. अ.* १ छापलें जाणें. २ चिह्नांकित होणें. ३ देवी टोंचल्या जाणें. [असलेला पलंग.
**छपरखट-खाट**—*स्त्री.* मच्छरदाणी
**छपरी*** —*स्त्री.* झोपडी; मठी.
**छपवाना**—*क्रि. स.* छापवून घेणें.
**छपा**—*वि.* छापलेला; मुद्रित.
**छपाना**—*क्रि. स.* छापवून घेणें.
**छपाअी**—१ छापण्याचें काम; मुद्रण. २ छापण्याची मजुरी.
**छप्पन**—*वि.* छप्पन्न. [छंद (षट् पद).
**छप्पय**—*पु.* सहा चरणांचा अेक
**छप्पर**—*पु.* छप्पर; छत. (मु.) **छप्पर पर रखना**—सोडून देणें; चर्चा न करणें. **छप्पर फाड़कर देना**— अकल्पितपणें देणें (दान, देणगी). [२ कांति. ३ फोटो.
**छबि**—*स्त्री.* १ शोभा; सौंदर्य.
**छबीला**—*वि.* देखणा; सुंदर.
**छब्बीस**—*वि.* सव्वीस.
**छमकना**—*क्रि. अ.* [अनु.] घुंगुर बांधून नाचणें. [आवाज.
**छमछम**—*स्त्री.* नूपुर, पैंजण अि.चा
**छमछमाना**—*क्रि. अ.* [अनु.] ‘छमछम’ आवाज चालणें.
**छमना***—*क्रि. स.* क्षमा करणें.
**छमा**—*स्त्री.* माफी; क्षमा.
**छमासी**—*स्त्री.* षण्मासिक श्राद्ध.
**छमाही**—*वि.* सहामाही.
**छमुख**—*पु.* षडानन; कार्तिकेय.
**छय***—*पु.* क्षय; नाश.
**छर***—*पु.* कपट; फसवणूक.
**छरछर**—*पु.* छमछम (छडी मारल्याचा आवाज). [आग होणें.
**छरछराना**—*क्रि. अ.* चुरचुरणें;
**छरना**—*क्रि. अ.* गळणें; टपकणें; झरणें; झिरपणें. [टाकणें.
**छरना***—*क्रि. स.* १ फसविणें. २ मोहून
**छरभार***—*पु.* १ कामाची जबाबदारी किंवा बोजा. २ भानगड; बखेडा.
**छरहरा**—*वि.* १ अत्यंत चपळ. २ हलक्या अंगाचा; सडपातळ.
**छरा**—*पु.* १ वाळा. २ लड. ३ नाडी (विजारीची). ४ दोर.
**छरीला**—*पु.* दगडफूल.
**छर्दि**—*स्त्री.* वांति; उलटी.
**छर्रा**—*पु.* [अनु.] छर्रा; बंदुकीची बारीक गोळी. [बहाणा. ३ धूर्तता.
**छल**—१ कपट; फसवणूक. २ मिष;
**छलक, छलकन**—*स्त्री.* अुसळी; अुसळून बाहेर येणें.

**तंदुरुस्त**—वि. [ फा. ] निरोगी; निकोप. **तंदुरुस्ती**–स्त्री. आरोग्य; निरोगीपणा; स्वास्थ्य.

**तंदुल***—पु. तांदूळ.

**तंदूर**–पु. [ फा. ] अेक प्रकारची पंजाबी चूल (भाकरी भाजण्याची).

**तंदूरी**— वि. तंदूरी भट्टींत तयार झालेली.

**तंदेही**—स्त्री. [ फा. ] १ मेहनत; परिश्रम. २ प्रयत्न. ३ ताकीद.

**तंद्रिल**–वि. झोपाळू; पेंगणारा.

**तँबिया**–पु. तांब्याचें लहान तसराळें.

**तंबीह**–स्त्री. [ अ. ] १ शिकवण; अुपदेश. २. ताकीद; तंबी.

**तंबूरा**-पु. तंबोरा.

**तंबोल**–पु. विडा.

**तँबोली**–पु. तांबोली. [ अचंबा.

**तअज्जुब**–पु. [अ.] आश्चर्य;विस्मय;

**तअय्युन**–पु. [ अ. ] नेमणूक.

**तअल्लुक़**–पु. [ अ. ] संबंध.

**तअल्लुक़ा**–पु. [ अ. ] १ तालुका. २ मोठी जमीनदारी.

**तअल्लुक़ेदार**–पु. [ अ. + फा. ] तालुकेदार; मोठा जमीनदार.

**तअस्सुब**—पु. [ अ. ] १ धर्म किंवा जातीबद्दल पक्षपात. २ पक्षाभिनिवेश; पक्षपात.

**तआला**–वि. [ अ. ] श्रेष्ठ.

**तआवुन**–पु.[अ.]सहकार्य; सहयोग;

**ताअियो***--अव्य. तरी देखील. तरीसुद्धां. [२ प्रति; साठीं.

**ताअिं***–प्रत्य. १शीं; ला ( क्वचित् ).

**तअु***—अव्य. तेव्हां; त्यावेळीं.

**तअू***—अव्य. तरीसुद्धां.

**तक**—अव्य. पर्यंत. स्त्री·टक;नजर.

**तक़दीर**–स्त्री. [अ.]भाग्य; नशीब; दैव.(मु.)**तक़दीर खुलना**–भाग्य अुदयास येणें.

**तक़दीरवर**—वि. [ अ. + फा. ] नशीबवान्; भाग्यवान्.

**तकना**—क्रि. अ. १पाहणें; अवलोकन करणें. २ शरण जाणें. ३ टक लावून पाहणें. ४ आश्रय घेणें.

**तकबीर**—स्त्री.[अ.] १ मान देणें; आदर करणें. २ देवाची प्रशंसा. ३ ओशस्तुति.४'अल्लाहो अकबर' किंवा 'ला-अिल्लाह-अिल्लिलाह' म्हणणें. [घमेंड.

**तकब्बुर**—पु. [ अ. ] अभिमान;

**तकमा**—पु. [ तु ] पदक.

**तकमील**—स्त्री. [ अ. ] पूर्णता.

**तकरार**–स्त्री. [ अ. ] १ हुज्जत; विवाद. २ तंटाबखेडा. ३ द्विरुक्ति.

**तकरीबन्**—क्रि. वि. [अ.] जवळ जवळ; अंदमासें.

**तक़रीर**–स्त्री. [ अ. ] १ भाषण;

व्याख्यान. २ संभाषण. **तक़रीरी**–वि. १ मौखिक; तोंडीं. २ वादग्रस्त.
**तक़रीरन्**–क्रि. वि. [ अ. ] तोंडी.
**तक़रुर**–पु. तक़रूरी [अ.] नेमणूक. नियुक्ति.
**तकला**–पु. १ अडकणी. २ दोर वळण्याचें चाक. **तकली**–स्त्री. चाती; टकळी.
**तक़लीद्**–स्त्री. [ अ. ] १ नक्कल; अनुकरण. २ अंधानुकरण.
**तकलीफ़**–स्त्री. [ अ. ] १ कष्ट; दुःख; क्लेश. २ संकट; आपत्ति.
**तकलीफ़देह**–वि. [ अ. ] क्लेशदायक; कष्टकारक. [शिष्टाचार.
**तकल्लुफ़**–पु. [ अ. ] औपचारिक
**तक़वा**–पु. [अ.] दोषापासून किंवा पापापासून अलिप्त राहणें; सदाचार.
**तक़वियत**–स्त्री. [ अ. ] १ पुष्टि; समर्थन. २ बळ; शक्ति.
**तक़सीम**–स्त्री. [ अ. ] १ विभागणी. २ भागाकार.
**तक़सीर**–स्त्री. [ अ. ] १ कमतरता; उणीव २ चूकभूल. ३ अपराध; दोष. [निकड. २ उत्तेजन.
**तक़ाज़ा**–पु. [ अ. ] १ तगादा;
**तक़ावी**–स्त्री. [अ.] तगाई; गरीब शेतकऱ्यांना दिलें जाणारें कर्ज.
**तकिया**–पु. [ फा. ] १ उशी; तक्क्या. २ विश्रांतीची जागा. ३ आधार; आश्रय. ४ फकिराची राहण्याची जागा. ( यौ. ) **तकिया कलाम**–संवयीमुळें बोलण्यांत येणारा निरर्थक शब्द ( उदा. 'जे हैं तें' 'काय म्हणतात' अि. ).
**तकुआ**–पु. १ चरख्याची अडकणी. २ चाती; टकळी. [कपात.
**तख़फ़ीफ़**–क्रि. [अ.] कमी करणें;
**तख़मीना**–पु. [अ.] १ अनुमान; अंदाज; अटकळ. २ अंदाजपत्रक.
**तख़मीनन्**–क्रि. वि. अदमासें; सुमारें.
**तख़ान**–पु. सुतार.
**तख़्त**–पु. [ फा. ] १ सिंहासन. २ लाकडी फळ्यांचा पलंग.
**तख़्त–ताऊस**–पु. [ फा.+अ. ] मयूरसिंहासन. [रूढ.
**तख़्तनशीन**–वि. [अ.] सिंहासना-
**तख़्तपोश**–पु. [फा.] चादर; तक्तपोशी. [फळ्यांची भिंत.
**तख़्तबंदी**–स्त्री. [ फा. ] लांकडी
**तख़्ता**–पु. [ फा. ] १ लांब व रुंद फळी. २ तक्तपोशी. ३ तिरडी. ४ वाफा. ५ कागदाचा ताव.
**तख़्ती**–स्त्री. [ फा. ] १ लहान लांकडी फळी. २ पाटी (लिहिण्याची).
**तगडा**–वि. धट्टाकट्टा; बलवान.
**तगमा**–पु. [ तु. ] पदक; बिल्ला.

**तगा***–पु. सूत; दोरा; धागा.

**तगाओी**–स्त्री. शिवणावळ.

**तगादा**–पु. पाहा ' तकाज़ा '

**तगार**–पु. [अ.] १ अुखळ पुरण्याचा खळगा. ३ चुन्याची घाणी.

**तगीर***–पु. [अ.] परिवर्तन; बदल. **तगीरी**–स्त्री.

**तचाना**—क्रि. स. १ तापविणें; अून करणें. २ कष्टी करणें.

**ताच्छन***—क्रि. वि. तत्क्षणीं; ताबडतोब तत्काळ.

**तज़किरा**–पु. [अ.] अुल्लेख; वर्णन.

**तजन***—पु. त्याग. [सोडणें.

**तजना**–क्रि. स. त्यागणें; टाकणें;

**तजम्मुल**–पु. [अ.] १ शृंगार; सजावट. २ शोभा.

**तजरबा**–पु. [अ.] अनुभव.

**तजरबाकार**–पु. [अ. + फ़ा.] अनुभवी; व्यवहारज्ञ; कुशल.

**तजल्ली**–स्त्री. [अ.] १ प्रकाश; अुजेड. २ लखलखाट; चमक. ३ ' तूर ' पर्वतावर हजरत मूसाला दिसलेलें दिव्य तेज.

**तजवीज़**—क्रि.[अ.] १ मत; निर्णय. २ निकाल; निवाडा. ३ व्यवस्था; बंदोबस्त.

**तजुरबा**–पाहा ' तजरबा '.

**तज्ञ**–क्रि. ज्ञानी; तत्त्वज्ञ.

**तट**–पु. किनारा; तीर. क्रि. वि.–जवळ; समीप.

**तटका**–वि. १ ताजें. २ नवें; कोरें.

**तटनी***- स्त्री. नदी; सरिता.

**तड**–पु. [अनु.] १ पक्ष. २ दुफळी.

**तडक**- स्त्री. [अनु] १ भेग; तडा. २ तडकणें.

**तडकना**—क्रि. अ. १ तडकणें; भेग पडणें. २ अुलणें; अुकलणें.

**तडका**–पु. तांबडें फुटण्याची वेळ; झुंझुरकें.

**तडकाना**—क्रि.स. १ भेग पाडणें. तडाडणें. २मोठा आवाज करणें.

**तडप**-स्त्री. १ तडफड; तळमळ. २ चमक.

**तडपना–फना**—क्रि.अ. [अनु.] १तडफडणें; तळमळणें; चरफडणें.

**तडपाना**–क्रि.स.सतावणें; कष्ट देणें.

**तडाक**–क्रि.वि. [अनु.] झटपट; घाओीनें. **तडाकपडाक**–तातडीनें; झटपट. [फसवेगिरी.

**तडावा**–पु. दिखाअूपणा; ढोंग;

**तडी**—स्त्री. १ चपराक; थप्पड. २ कपट; फसवेगिरी. ३ बहाणा.

**तततायेओी**–स्त्री. [अनु.] नृत्याचे बोल; नृत्यध्वनि.

**ततसार***–स्त्री. भट्टी; शेगडी.

**तताओी***–स्त्री. आंच; अुष्णता; झळ.

**ततैया**– स्त्री· १ गांधीलमाशी. २ लवंगी मिरची. [तात्कालिक.
**तत्कालीन**– वि· त्या वेळचा;
**तत्त*** - पु· तत्त्व.
**तत्ता***–– वि· तप्त; गरम; अुष्ण.
**तत्तिम्मा**—पु· [अ·] परिशिष्ट.
**तत्त्वता**— स्त्री· १ तात्त्विकता. २ यथार्थता.
**तत्त्वावधान**–पु· देखरेख; नेतृत्व.
**तथा**–अव्य. १ आणि;व. २ तसेंच.
**तथागत**—पु· गौतमबुद्ध.
**तदनु***—क्रि· वि· तदनंतर; त्या प्रकारें; तसेंच. [अुपाय; योजना.
**तदबीर**—स्त्री· [अ·] युक्ति;
**तदारुक**—पु· [अ·] १ प्रतिबंधक अुपाय; तरतूद. २ दंड; शिक्षा. ३ तपास (गुन्ह्यासंबंधीं); चौकशी.
**तन**—पु· शरीर; देह. (मु.) **तन तोडना**—खूप परिश्रम करणें.
**तन**—क्रि· वि· [?] कडे; बाजूस.
**तनक़ीद**—स्त्री· [अ·] १ पारख; परीक्षा. २ परीक्षण; समीक्षण.
**तनक़ीह**—स्त्री·[अ·] १ तपासणी. २ खटल्यांतील वादाचा मुद्दा.
**तनख़ाह-ख़्वाह**—स्त्री· [फा.] पगार; वेतन.
**तनगना***—क्रि·अ· चिडणें; चडफडणें; कावणें; नाराज होणें.
**तनज़ीम**—स्त्री· [अ·] संघटना; व्यवस्था; संयोजन.
**तनज़्ज़ुल**—वि· [अ·] पदच्युत झालेला; अधिकारभ्रष्ट. पु· ऱ्हास; अधोगति; पदच्युति. **तनज़्ज़ुली**–स्त्री· पतन.
**तनना**—क्रि· अ· १ ताणलें जाणें. २ प्रवृत्त होणें. ३ ताठ अुभें राहणें.
**तनतनहा**—क्रि· वि· [फा.] अेकटा; अेकाकी.
**तनरुह-तनूरुह***–पु·१ रोम; लव. २ पक्ष्याचे पंख. ३ मुलगा; पुत्र.
**तनवाना**—क्रि· स· दुसऱ्याकडून ताणण्याचें काम करविणें; ताणून घेणें. [दार कापड.
**तनसुख**—पु· अेक प्रकारचें नक्षी-
**तनहा**—वि·[फा.] अेकटा;अेकाकी. **तनहाअी**·स्त्री·अेकान्त;अेकटेपणा.
**तना**—पु· [फा.] वृक्षाचें खोड.
**तनाज़ा**—पु·[अ·] १ तंटा; बखेडा; झगडा. २ शत्रुत्व; वैर.
**तनातनी**—स्त्री· १ ओढाताण. २ भांडण; तेढ.
**तनाव**—पु· १ ताण. २ ताणून बांधण्याची दोरी. [क्रि· वि· जरा.
**तनि, तनिक**–वि· थोडा; किंचित्.
**तनिया**—स्त्री· १ लंगोटी. २लंगोट.
**तनी**—स्त्री· बंद; नाडी.

**तनूर**—पु. पाहा ' तंदूर '.
**तनूरुह**—पु. पाहा ' तनुरुह '
**तनेना**—वि. १ वांकडा; तिरपा. २ ताणलेला; रागावलेला.
**तनै***—पु. तनय; मुलगा; पुत्र.
**तनैया***—स्त्री. कन्या; मुलगी.
**तनोज***—पु. १ अंगावरील लव; केस. २ तनुज; पुत्र.
**तनोरुह***—पु. १ अंगावरील लव; केस. २ तनुज; पुत्र.
**तन्ज़ीम**—स्त्री. पाहा ' तंज़ीम '
**तन्नाना**—क्रि. अ. गर्वानें ताठणें; आखडणें. २ तणतणणें; रागावणें.
**तन्नी**—स्त्री. तराजूच्या पारड्याची दोरी.
**तन्मय**—वि. तन्मय; निमग्न.
**तपना**—क्रि.अ. १तापणें; गरम होणें. २ संतप्त होणें. ३ तप करणें. ४ वज़न पडणें.
**तपनी**—स्त्री. १ शेकोटी. २ तप.
**तपाक**—पु.[फा.]१ आवेश. २ अुत्साह. ३ वेग. ४ रुबाब; वजन.
**तपाना**—क्रि. स. तापविणें.
**तपिश**—स्त्री.[फा.] अुष्णता; अुष्मा.
**तपेदिक़**—पु. [ फा. ] क्षयरोग; राजयक्ष्मा.
**तप्प***—पु. तप; तपश्चर्या.
**तफ़तीश**—स्त्री. [अ.] १ चौकशी. २ झडती; तपासणी. ३ तपास.
**तफ़रीक़**—स्त्री.[अ.]१ फरक. २ अंतर. ३ वियोग.
**तफ़रीह**—स्त्री.[अ.]१ आनंद; मौज. २ विनोद; थट्टामस्करी. ३ सहल; फिरावयास जाणें.
**तफ़सील**—स्त्री. [अ.] १ तपशील. २ विस्तृत वर्णन. ३ कैफियत.
**तफ़सीलवार**—वि. [अ+फा.] तपशीलवार; विस्तारपूर्वक. [म्हणून.
**तब**—अव्य. १त्या वेळीं; तेव्हां. २
**तबअी**—वि. [ अ. ] नैसर्गिक; प्राकृतिक. (यौ.) **अिल्मे-तबअी**—प्रकृतिविज्ञान.
**तबक़ा**—पु. [ अ. ] विभाग; भाग. २ श्रेणी; वर्ग. [वर्तन झालेला.
**तबदील**—वि.[अ.] बदललेला; परि-
**तबदीली**—स्त्री. [अ.] बदल.
**तबलची-तबलिया**—पु. [ फा. ] तबलजी. [प्रचार.
**तबलीग**—पु. [ अ. ] धर्मप्रचार;
**तबादला**—पु. [ अ. ] १ बदल; परिवर्तन. २ बदली. [झालेला.
**तबाह**—वि. [ फा. ] नष्ट; धूळधाण
**तबाही**—स्त्री.[फा.] नाश; धूळधाण.
**तबीअत**—स्त्री. [अ.] प्रकृति; तब्येत. ( मु. ) **तबीअत फडक अुठना**—मन अुत्साहित व आनंदित होणें.

**तबीअतदार**—*वि.* [ अ. + फा. ] १ रसिक. २ समजूतदार.
**तबीब**—*पु.* [अ.] वैद्य.
**तब्दीली**—*स्त्री.*[फा.] १ बदल; परिवर्तन. २ फरक. [यामुळें.
**तभी**—अव्य. १त्याचवेळीं. २यासाठीं;
**तमंचा**—*पु.* [ फा. ] पिस्तुल.
**तम**—*पु.* १ अंधार. २ अज्ञान.
**तमक**—*पु.*[अनु.] १ आवेश; अुद्वेग. २ राग. ३ चपलता. [लाल होणें.
**तमकना**—*क्रि. अ.* [अनु.] रागानें
**तमकनत**—*स्त्री.* [अ.] मानसन्मान. २ थाटमाट. ३ घमेंड; मिजास.
**तमचुर—चोर***—*पु.* कोंबडा.
**तमतमा**—*पु.* रुबाब; वजन.
**तमतमाना**—*क्रि. अ.* रागानें किंवा अुन्हानें लाल होणें.
**तमद्दुन**—*पु.* [अ.] १ संस्कृति. २ नागरिकत्व. ३ नगर-निवास.
**तमन्ना**—*स्त्री.*[अ.] १ कामना; तीव्र अिच्छा. २ आवड; अभिलाषा.
**तमस्सुक**—*पु.* [अ.] दस्तैवज; कर्जरोखा.
**तमहीद**—*स्त्री.* [अ.] प्रस्तावना.
**तमा**—*पु.* राहु. *स्त्री.* रात्र.
**तमा**—*स्त्री.* [अ.] १ लालूच; लोभ. २ अिच्छा; आवड.
**तमाचा**—*पु.* [फा] थप्पड; चपराक.
**तमादी**—*स्त्री.* [ अ. ] मुदतीबाहेर जाणें ( दावा वगैरे ); मुदत संपणें.
**तमाम**—*वि.* [ अ. ] १ सर्व; अेकंदर. २ समाप्त; संपूर्ण. ( मु. ) **काम तमाम होना**—मृत्यु येणें. **काम तमाम करना**-मारून टाकणें. [ गीर; बघ्या.
**तमाशबीन**—*पु.* [अ.+फा.] तमास-
**तमाशा**—*पु.* [अ.] १ खेळ; करमणूक. २ आश्चर्यकारक गोष्ट.
**तामिस्र**—*पु.* अंधार.
**तमीज़**—*स्त्री.* [ अ. ] १ सदसद्विवेकबुद्धि. २ रीत; पद्धत. ३ शिष्टाचार; मर्यादा.
**तमोर—ल***—*पु.* तांबूल; विडा.
**तमोरी—ली**—*पु.* तांबोळी.
**तय**—*वि.* [ अ. ] १ ठरविलेला; निश्चित केलेला. २ निर्णित.
**तयना***—*क्रि. अ.* १ तापणें; अून होणें. २ संतप्त होणें. [ निश्चित.
**तयशुदा**—*वि.* [अ.+फा.] ठरलेला;
**तर**—व. [ फा. ] १ ओला; आर्द्र. २ ताजें; कोवळें. ३ थंड. ४पैसेवाला, मालमत्ता असलेला. *क्रि. वि.* खालीं; तळाशीं.
**तरक**—*पु.* १ विवेचना; विचार; चिंता. २ सुंदर आणि सारगर्भित अुक्ति. *स्त्री.* पुस्तकाच्या पृष्ठाच्या

अुजव्या कोपऱ्यांत खालच्या बाजूस दुसऱ्या पृष्ठाच्या आरंभीचा जो शब्द लिहितात तो. ३ त्याग.

**तरकना**—क्रि. अ. तर्क करणें; अनुमान करणें. [स्त्री. लहान भाता.

**तरकश**—पु. [फा.] भाता. **तरकसी**·

**तरका**—पु. [अ.] वारसा.

**तरकारी**—स्त्री. [ फा. ] भाजी.

**तरकीब**—स्त्री. [अ.] युक्ति; अुपाय; योजना.

**तरक़्क़ी**—स्त्री. [अ.] १ अुन्नति; प्रगति; वाढ; २ बढती.

**तरकुली**—स्त्री. कर्णफूल.

**तरखा**—पु. पाण्याचा जोराचा प्रवाह;

**तरग़ीब**—स्त्री. [अ.] १ अुत्तेजन. प्रोत्साहन. २ फूस. [नजरेनें पाहणें.

**तरछाना***— क्रि. अ. तिरप्या

**तरछाना**—क्रि. अ. १ मारणें; ठोकणें. २ दटावणें; धमकावणें. ३ टाकून बोलणें.

**तरजीह**—स्त्री. [ अ. ] प्राधान्य; प्रामुख्य; अितर वस्तूंपेक्षां अेखाद्या वस्तूस अधिक चांगलें समजणें.

**तरजुमा**—पु. [ अ. ] अनुवाद; भाषांतर. [ मांडणी; पद्धत.

**तरतीब**—स्त्री. [ अ. ] क्रम; व्यवस्था;

**तरतीबवार**—क्रि. वि. [ अ.+फा. ] क्रमशः

**तरदीद**—स्त्री. [ अ. ] रद्द करणें; खंडण.

**तरद्दुद**—पु. [ अ. ] १ चिंता; विवंचना. २ गोंधळ; बुचकळा.

**तरनतारन**—पु. तारणारा; अीश्वर.

**तरना**—क्रि. अ. तरून जाणें; मुक्त होणें. क्रि. स. पार करणें; ओलांडून जाणें.

**तरनी**—स्त्री. नाव. [ तडफडणें.

**तरपना***—स्त्री. अ. तडपणें;

**तरफ़**—स्त्री. [ अ. ] बाजू; दिशा.

**तरफ़दार**— वि. [अ.+फा ] पक्षपाती; पक्षाचा अभिमान धरणारा.

**तरफराना**—क्रि. अ. [ अनु. ] तळमळणें; तडफडणें.

**तरबतर**—वि. [ फा. ] १ रसभरीत. २ आर्द्र. ३ भिजलेला.

**तरबियत**—स्त्री. [ अ. ] १ शिक्षण; संगोपन. २ वळण.

**तरबूज**— पु. [ फा. ] टरबूज.

**तरमीम**—स्त्री. [ अ. ] अुपसूचना; दुरुस्ती.

**तरल**—वि. चंचल; प्रवाही.

**तरवन**—पु. कानाचा दागिना; कुर्डी.

**तरस**—पु. दया; कींव; सहानुभूति. (मु.) (**किसीपर**) **तरस खाना**—कींव करणें.

**तरसना**—क्रि. अ. तळमळणें; बेचैन होणें (हेतु साध्य न झाल्यास).

**तरसाना**—क्रि. स. १ सतावणें; छळणें ( अिच्छित वस्तु न देतां ). २ लालूच दाखविणें.

**तरह**—स्त्री. [अ.] १ तऱ्हा; प्रकार. २ रीत; पद्धत. ३ अुपाय.

**तरहटी, तरेटी**—स्त्री. १ तराअी; पायथा. २ अुतार जमीन. ३ दरी; खोरें.

**तरहदार**—वि. [अ. + फा. ] १ हौशी; शोकीन. २ डौलदार; सुंदर; रेखीव.

**तरहर**—क्रि. वि. खालीं; तळाशीं. वि. १ खालचा; तळाचा; बुडाचा. २ निकृष्ट.

**तरहेल**-वि. १ पराधीन. २ पराजित.

**तराअी**—स्त्री. १ डोंगराचा पायथा. २ दरी; खोरें. ३ नदीकांठची जमीन.

**तराजू**—पु. [ फ़ा. ] तराजू; तागडी.

**तराटक***—पु. त्राटक; योगमुद्रा.

**तराना**—क्रि. स. तारणें; अुद्धार करणें.

**तराना**—पु. [ फा. ] संगीताचा [ अेक प्रकार.

**तराबोर**—वि. [ फा. ] १ ओलाचिंब; भिजलेला. २ रसभरित; रसाळ. ३ आर्द्र.

**तरार**—पु. [ ? ] १ पाण्याची धार. [२ अुडी; कुदी.

**तरावट**—स्त्री. [ फा. ] १ ओलावा; दमटपणा. २ थंडावा; शीतलता. ३ दूध घुसळून केलेलें फेसाळ व गोड पेय.

**तराश**—स्त्री. [ फा. ] १ बनावट; काट-छाट; रचना. २ रीत; तऱ्हा.

**तराशना**—क्रि. स. [ फा. ] १ तासणें. २ कातरणें; कापणें.

**तरियाना**—क्रि. अ. तळाशीं बसणें. क्रि. स. तळाशीं बसविणें; झांकणें.

**तरिवन**—पु. कर्णफूल.

**तरी**—स्त्री. [ फा. ] १ दमटपणा; ओलावा. २ थंडावा; आर्द्रता. ३ पावसाचें पाणी ज्या ठिकाणीं अेकत्र सांठतें असा जमिनीचा खोलगट भाग. ४ तराअी. ५ पाणथळी.

**तरी**—स्त्री. नाव; बोट.

**तरीक़ा**—पु. [ अ. ] १ तऱ्हा; रीत; पद्धत. २ अुपाय; युक्ति.

**तरु**—पु. झाड; वृक्ष.

**तरुण**—पु. तरुण; युवक.

**तरुणाअी**—स्त्री. तारुण्य; यौवन.

**तरेरना**—क्रि. स. दृष्टिसंकेतानें असंमति दर्शविणें; डोळे वटारणें.

**तरोअी**—स्त्री. दोडकें.

**तरोताज़ा**—वि. [ फा. ] टवटवीत; [ प्रफुल्ल.

**तरौंस***—पु. किनारा; तट.

**तरौना**–पु. कर्णफूल. [ सुभाषित.
**तर्क**–पु. १ तर्क. २ टोमणा. ३
**तर्क**–पु. [अ.] त्याग (यौ.)
**तर्के मवालात**–पु. असहकार.
**तर्ज़**–पु. [अ.] १ प्रकार; तऱ्हा. २ पद्धति; शैली. ३ रचना; बनावट.
**तर्जन**–पु. १ धमकावणी. २ क्रोध. ३ झिडकारणें. (यौ.) **तर्जन–गर्जन**–क्रोध प्रकट करणें.
**तर्ज़े अमल**–पु. [अ.] कार्यपद्धति.
**तर्पण**–पु. पितराना पाणी देणें.
**तर्रार**–वि. [अ.] वाचाळ; बडबड्या.
**तल**–पु. तळभाग. [ २ अप्रिय.
**तलख़–तल्ख़**–वि. [फा.] १ कडू.
**तलछट**–स्त्री. १ तळाशीं सांचलेला गाळ. २ बुडाचा पत्रा.
**तलना**–क्रि. स. तळणें.
**तलफ़**–वि. [अ.] नाश पावलेला; नष्ट. [ मळणें; हैराण होणें.
**तलफना**–क्रि. अ. [अनु.] तळ
**तलफ़्फ़ुज़**–पु. [अ.] अुच्चार.
**तलब**–स्त्री. [अ.] १ मागणी. २ शोध; तपास. ३ अिच्छा. ४ बोलावणें. ५ पगार.
**तलबगार**–वि. [अ.+फा.] शोधणारा; धुंडाळणारा; गरजू.
**तलबनामा**–पु. [अ.+फा.] समन्स.
**तलबाना**–पु. [फा.] साक्षीदाराचा भत्ता.
**तलबी**–स्त्री. [अ.] १ बोलावणें; हजर राहण्याचा हुकूम. २ मागणी.
**तलवा**–पु. पायाचा तळवा. (मु) **तलवा खुजलाना**-प्रवासाचा शकुन. **तलवे चाटना**–(**सहलाना**)–खुशामत करणें. हांजी हांजी करणें. **तलवों में आग लगना**–भयंकर राग येणें.
**तलहटी**–स्त्री. १ तराअी; पायथा. २ अुताराची जमीन. ३ दरी; खोरें; डोंगराच्या पायथ्याची जमीन.
**तलाक़**–पु. [अ.] घटस्फोट.
**तलावत, तिलावत**–स्त्री. [अ.] कुराणाचें पठण.
**तलाश**–स्त्री. [तु.] १ तपास; शोध. २ आवश्यकता. **तलाशी**–स्त्री. तपासणी; झडती. [ ३ तळवा.
**तली**–स्त्री. १ बूड; तळ. २ गाळ.
**तलुआ**–पु. 'पाहा तलवा'
**तले**–क्रि. वि. खालीं.
**तलेटी**–स्त्री. पाहा 'तलहटी'
**तलैया**–स्त्री. लहान तळें.
**तलोछ**–स्त्री. तळाचा गाळ.
**तल्ख़**–वि. पाहा 'तलख़'
**तल्ख़ मिज़ाज**–वि. [फा.] तापट; रागीट.
**तल्प**–पु. १ शय्या; शेज. २ गच्ची.

**तल्ला**–पु॰ १ जोडयाचा तळ. २ बूड; खालचा भाग. ३ अस्तर. ४ निकटता. **तल्ली**–स्त्री॰ जोडयाचा तळवा.
**तवक्का**–स्त्री॰ [अ॰] आशा; उमेद.
**तवज्जह**–स्त्री॰ [अ॰] १ लक्ष; चित्त; ध्यान. २ कृपादृष्टि.
**तवना**–क्रि॰ अ॰ तापणें; गरम होणें.
**तवा**–पु॰ तवा. (मु.) **अुलटा तवा**–अत्यंत काळा.
**तवाज़ा**–स्त्री॰ [अ.] १ मानसन्मान; आदरसत्कार. २ आतिथ्य; आगतस्वागत. [सामर्थ्यवान्.
**तवाना**–वि॰ [फा.] बलवान्;
**तवायफ़**–स्त्री॰ [अ॰] कलावंतीण.
**तवारा**–पु॰ दाह; अुष्णता.
**तवारीख़**–स्त्री॰ [अ॰] अितिहास.
**तवालत**–स्त्री॰ [अ॰] १ लांबी. २ विपुलता. ३ भानगड.
**तवेला**–पु॰ [अ॰] तबेला.
**तवील**–वि॰ [अ॰] लांब. (यौ.) **तूलतवील**–वि॰ लांबलचक.
**तशख़ीश**–स्त्री॰ [अ॰] १ रोगाचें निदान किंवा चिकित्सा. २ ठराव; निश्चय.
**तशद्दुद**–पु॰ [अ॰] १ हिंसा. २ सक्ती; बळजबरी. ३ कठोरता. (यौ.) **अदमे तशद्दुद**–पु॰ अहिंसा
**तशफ्फ़ी**–स्त्री॰ [अ॰] समाधान; संतोष.
**तशरीफ़**–स्त्री॰ [अ॰] प्रतिष्ठा; मान; मोठेपणा. (मु.) **तशरीफ़ रखना**–विराजमान होणें; विद्यमान असणें; हजर असणें. **तशरीफ़ लाना**–येणें; आगमन करणें.
**तशरीह**–स्त्री॰ [अ॰] १ भाष्य; टीका; टिप्पणी. २ शरीरशास्त्र.
**तशवीश**–स्त्री॰ [अ.] १ चिंता; काळजी; विवंचना. २ त्रास; जिकीर.
**तश्त**–पु॰ [फा.] मोठें तबक.
**तश्तरी**–स्त्री॰ [फा.] लहानशी थाळी; ताटली; तबक.
**तस***–वि॰ तसें; त्याप्रमाणें.
**तसकीन**–स्त्री॰ [अ॰] संतोष; समाधान; सांत्वन.
**तसदीक**–स्त्री॰ [अ.] खरेपणा. २ सत्यपरीक्षा; सत्यनिर्णय. ३ समर्थन; साक्ष (सत्यता पटविण्यासाठीं).
**तसदीह**–स्त्री॰ [अ॰] १ तसदी; दुःख. २ कपाळदुखी. [२ दानधर्म.
**तसद्दुक**–पु॰ [अ॰] १ समर्पण.
**तसफ़िया**–पु॰ [अ॰] निर्णय; निवाडा.
**तसबीह**–स्त्री॰ [अ॰] १ स्मरणी; जपमाळ. २ अीशस्तवन.
**तसमा**–पु॰ [फा.] चामड्याचा पट्टा.
**तसला**–पु॰ [फा.] तसराळें.

**तसलीम**–स्त्री·[अ·] १ नमस्कार. २ स्वीकार; कबुली; मान्यता. ३ हमी घेणें. [सांत्वन. २ धीर.
**तसल्ली**–स्त्री· [अ·] १ समाधान;
**तसवीर**–स्त्री· [अ·] चित्र; तसबीर.
**तसव्वुर, तसौवर**—पु· [अ·] १लक्ष्य, २कल्पना. ३विचार; तर्क.
**तसौव्वुफ़**—पु· [अ·] १ वैराग्य. २ सूफी भक्तिमार्ग; सूफी लोकांचा दार्शनिक सिद्धान्त.[ त्या ठिकाणीं.
**तहँ*, तहँवाँ, तहाँ**–क्रि· वि· तेथें;
**तह**–स्त्री· [फा.] १ तळ. २ घडी. (मु·) **तहकी बात**–गुप्त गोष्ट. (**किसी बातकी**) **तहतक पहुँचना**–खरेंखुरें मर्म समजून घेणें.
**तहक़ीक़**—स्त्री· [अ.] १ चौकशी; तपास. २ ताडून किंवा पारखून पाहणें (खरें किंवा खोटें). वि· १ नक्की; निश्चित. २ पारखून घेतलेलें.
**तहक़ीक़ात**—स्त्री· [अ.] तपास; शोध; चौकशी ('तहक़ीक'चें बहु.)
**तहक़ीर**–स्त्री·[अ·] अपमान; बेअब्रू.
**तहख़ाना**—पु· [फा.] तळघर.
**तहज़ीब**–स्त्री· [अ.] १ सभ्यपणा; शिष्टाचार. २संस्कृति. [पराधीनता.
**तहत**–पु· [अ·] १ ताबा; अधिकार.
**तहपेच**—पु· [फा.] १ पागोट्याचें अेक टोंक, जें आधीं बांधतात. २ फेटा अगर पागोट्याच्या आंतील टोपी.
**तहपोशी**–स्त्री· [फा.] साडीच्या आंत नेसण्याचा लहेंगा; परकर.
**तहमत-द**—स्त्री· [फा.] लुंगी; कमरेभोंवती गुंडाळण्याचा पंचा.
**तहम्मुल**–पु· [अ·] सहनशीलता.
**तहरी**—स्त्री· [दे.] खिचडी; मटार-भात.
**तहरीक**–स्त्री· [अ·] १ चळवळ. २ ठराव. ३ गति देणें; चालना देणें. ४ फूस देणें.
**तहरीर**–स्त्री· [अ.] १ लिहिण्याची मोड; लपेटा. २ लेखनशैली. ३ लिखाण. ४ लेखी पुरावा.
**तहरीरी**–वि· लेखी.
**तहलका**–पु· [अ.] १ धुमाकूळ; खळबळ. २ नाश. ३ मृत्यु.
**तहवील**–स्त्री· [अ·] १ अनामत ठेव. २ खजाना. ३ रोकड जमा. ४ हवालीं करणें.
**तहवीलदार**–पु· [अ· + फा.] खजीनदार; कोषाध्यक्ष,
**तहसनहस**–वि· [दे.] अुध्वस्त.
**तहसीन**—स्त्री· [अ·] वाहवा; तारीफ; स्तुति.
**तहसील**–स्त्री· [अ·] १ तालुका. २ सारा. ३ सारावसुली.

**तहसीलदार**--पु. [ अ. + फा. ] मामलेदार. [ करणें; गुंडाळणें.

**तहाना**-क्रि. स. [ फा. ] घडी

**ताहिवाँ***-क्रि. वि. तेव्हां; त्या वेळीं; **तहीं**-क्रि.वि. त्याचठिकाणीं.

**तहैया**--पु. [ अ. ] १ तयारी; तत्परता. २ निर्धार; संकल्प.

**ताँगा**-पु. टांगा; घोडागाडी.

**ताँता**-पु. रीघ; रांग ( मु. ) **ताँता बँधना ( लगना )**-रीघ लागणें.

**ताँती**-स्त्री. ओळ; पंक्ति; संतति.

**ताँबा**—पु. तांबें ( धातु ).

**ता***—सर्व. तो.

**ता**—अव्य. [ फा. ] पर्यंत.

**ताईं**—अव्य. १ पर्यंत. २ नजीक; जवळ. ३ समक्ष; प्रति. ४ करितां.

**ताई**-स्त्री. वडील चुलती ( संबोधन शब्द ). स्त्री. अुथळ कढअी.

**ताईद**-स्त्री. [ अ. ] १ पुष्टि; अनुमोदन; समर्थन. २ पक्षपात; तरफदारी. पु. वकीलाचा कारकून.

**ताऊ**-पु. वडील काका.

**ताऊन**—पु. [ अ. ] प्लेग.

**ताऊस**—पु. [ अ. ] मोर. (यौ.) तख्तेताऊस-पु. मयूरसिंहासन.

**ताक**—पु. [ अ. ] कोनाडा. (मु.) **ताकपर रखना** अथवा **धरना**-अुपयोगांत न आणणें; टाकून देणें. वि. विषम; अद्वितीय.

**ताक**—स्त्री. [ दे. ] १ टक; दृष्टि. २ प्रतीक्षा. [ २ चोरून पाहणें.

**ताक-झाँक**—स्त्री. १ डोकावणें.

**ताकत**—स्त्री. [ अ. ] ताकद; सामर्थ्य; बल. [ सशक्त.

**ताकतवर**—वि. [ अ. + फा. ]

**ताकना**-क्रि.स.टक लावणें; पाहणें.

**ताकि**—अव्य [ फा. ] यासाठीं; यामुळें; कीं. [ बजावणें.

**ताकीद**—स्त्री. [ अ. ] ताकीद;

**ताखीर**-स्त्री. [अ.] विलंब; अुशीर.

**तागना**—क्रि. स. १ धावदोरा घालणें. २ जहाज नांगरणें.

**तागा**—पु. धागा; दोरा.

**ताज**—पु. [अ.] १मुकुट. २तुरा.

**ताजदार**—पु[अ. + फा.] मुकुटधारी राजा. [राज्यारोहण.

**ताजपोशी**—स्त्री. [ अ. + फा. ]

**ताज़गी**—स्त्री. [ फा. ] ताजेपणा; नवीनता; नावीन्य..

**ताजन**—पु. [फा.] कोरडा; चाबूक.

**ताज़ा**--वि. [ फा. ] ताजें. ( मु. ) **मोटा ताज़ा**-धष्टपुष्ट; लठ्ठ.

**ताज़िया**—पु. [ फा. ] ताबूत.

**ताजिर**—पु. [ अ. ] व्यापारी.

**ताज़ीम**—स्त्री. [अ.] १ आदर;

मान; सन्मान. २ लवून मुजरा करण्याची अेक पद्धत.

**ताजीरात**—पु. [अ.] गुन्हेगाराला शिक्षा देणें. ('तअजीर'चें बहु.) पीनल कोड.

**ताज्जुब**—पु. पाहा 'तअज्जुब'.

**ताडना**—क्रि. स. १ मारणें. २ दटावणें. **ताडना**—स्त्री. १ प्रहार; मार. २ दटावणी; धमकी. ३ शिक्षा. ४ क्लेश.

**ताडना**—क्रि. स. १ मारून हाकलणें. २ ताडणें; अटकळ करणें; अनुमान करणें.

**ताडी**—स्त्री. [दे.] ताडी; दारू.

**ताडीख़ाना**—[दे. + फा.] दारूचा गुत्ता. [४ भाअू.

**तात**—पु. १ पिता. २ गुरु. ३ पुत्र.

**ताता**—वि. गरम; अुष्ण.

**ताती***—वि. तप्त; अुष्ण.

**तातील**—स्त्री. [अ.] सुट्टी.

**ताते***—अव्य. त्यामुळें.

**तादाद**—स्त्री. [अ.] १ संख्या. २ अंकमोजणी.

**तान**-स्त्री. १ ताण. २ गाण्याची तान; आलाप.

**तानना**—क्रि. स. ताणणें.

**ताना**—पु. [अ.] टोमणा; व्याजोक्ति.

**ताना**—पु. ताणा; विणीचा अुभा धागा. २ माग(सतरंजी, गालिचा).

**ताना-बाना**—पु. विणीचे अुभे आडवे धागे.

**तानाशाह**—पु. [स.+फा.] सर्वाधिकारी; डिक्टेटर; हुकूमशहा.

**तापतिल्ली**—स्त्री. पांथरी.

**तापती**—स्त्री. तापी नदी.

**तापना**—क्रि. अ. तापणें; गरम होणें. क्रि. स. तापविणें.

**तापमानयंत्र**—पु. अुष्णतामापक यंत्र; तापनळी.

**ताफ़्ता**—पु. [फा.] अेक प्रकारचा चमकदार रेशमी कपडा.

**ताब**—स्त्री. [फा.] १ अुष्णता; ताप. २ चमक; प्रकाश. ३ सहनशक्ति. ४ संयम; धैर्य. ५ सामर्थ्य; शक्ति.

**ताबडतोड**—क्रि. वि. [अनु.] सतत; अेकसारखें. [२ ताब्यांतील.

**ताबा**—वि. [अ.] १ अधीन.

**ताबीर**—स्त्री. [अ.] १ फल. २ स्वप्नाचें शुभा-शुभ फल.

**ताबूत**—पु. [अ.] १ प्रेत वाहून न्यावयाची पेटी. २ ताबूत; डोला.

**ताबे**—पाहा 'ताबा'

**ताबेदार**— वि. [अ.+फा.] अधीन; ताबेदार.

**ताम**—पु· १ अस्वस्थता; बेचैनी. २ दुःख; क्लेश. ३ दोष; विकार. *वि·* १ अस्वस्थ; व्याकुल. २ दुःखी. ३ भयानक. *पु·* १ क्रोध; रोष; राग. २ अंधार.

**तामजान**—*पु·* पालखी (खुली).

**तामस**—*पु·* १ सर्प. २ खल; दुष्ट. ३ घुबड. ४ क्रोध; राग. ५ अंधार. ६ अज्ञान; मोह.

**तामसी**—*वि·* तामसी; रागीट.

**तामील**—*पु·* [अ·] अंमलबजावणी.

**ताम्मुल**—*पु·* [अ·] १ मनन; विचार. २ बुचकळा; गोंधळ. ३ अनिश्चितता.

**तायफा**—*पु·* [अ·] १ वेश्यांचा ताफा. २ वेश्या. ३ यात्रेकरूंचा तांडा; ताफा.

**तायना***—*क्रि· स·* तापविणें; ऊन [करणें

**तायर**—*पु·* [अ.] १ उडणारा. २ पक्षी.

**ताया**—*पु·* वडील चुलता.

**तार**—*पु·* १ तार. २ टेलिग्राफ. (मु.) **तार तार करना**—उलगडून टाकणें; विस्काळित करणें. **तार बँधना**—सतत चालू असणें.

**तारक**—*पु·* तारा. २ डोळ्यांतील बाहुली. *वि·* तारणारा; पैलतीरीं नेणारा. [ओढणारा, बनविणारा.

**तारकश**—*पु·* [फा.] धातूंची तार

**तारघर**—*पु·* तार-ऑफिस.

**तारघाट**—*पु·* मतलब साधण्याची कृति; योजना.

**तारतम्य**—*पु·* १ सामंजस्य. २ तुलना.

**तारपीन**—*पु·* [इं.] टर्पेंटाईन.

**तारबर्की**—*पु·* [फा.] टेलिग्राफी; तार.

**तारा**—*पु·* १ तारा. २ डोळ्यांतील बाहुली. (मु.) **तारे गिनना**—काळजी किंवा दुःख करीत रात्र घालविणें. **तारे तोड लाना**—महाकठिण कार्य करणें.

**ताराज**—*पु·* [फा.] १ लूटमार. २ विध्वंस; नाश [चावी.

**तारी***—*स्त्री·* १ टाळी २ किल्ली;

**तारी**—*वि·* [अ·] १ प्रकट. २ पसरलेला; व्यापलेला.

**तारीक**—*वि·* [फा.] १ अंधारयुक्त. २ काळा. **तारीकी**—*स्त्री·* १ अंधार. २ शाई.

**तारीख़**—*स्त्री·* [फा.] १ तारीख; दिनांक; तिथि. २ इतिहास.

**तारीफ़**—*स्त्री·* [अ·] १ वर्णन. २ लक्षण; व्याख्या. ३ प्रशंसा; स्तुति. ४ वैशिष्ट्य; गुण. ५ ओळख परिचय. (मु.) **तारीफ़ करना**—परिचय करून देणें. **तारीफ़के पुल बाँधना**—अत्यंत प्रशंसा करणें.

**ताल**—*पु·* तलाव.

**ताल**–पु. १ तळहात. २ टाळी. ३ ताल ( गाणें ) ४ तलाव.

**ताला**—पु. कुलुप. **तालाकुंजी**–स्त्री. कडीकुलुप [ तलाव.

**तालाब**—पु. [ फा. + सं.] तळें;

**तालिका**–स्त्री. १ किल्ली. २ सूची; यादा; अनुक्रमणिका. [भिच्छुक.

**तालिब**–वि. [अ.] १ शोधक. २

**तालिब अिल्म**–पु. [अ.] विद्यार्थी.

**ताली**–स्त्री.टाळी; थाप.[२ अभ्यास.

**तालीम**—स्त्री. [अ.] १ शिक्षण.

**तालीम-याफ्ता**–वि. [ अ.+ फा.] सुशिक्षित.

**तालू**—पु. टाळू. [ २ भाग्यवान्.

**तालेवर**–वि. [अ.]१ श्रीमंत;संपन्न.

**ताल्लुक**—पु. [ अ. ] संबंध.

**ताल्लुक़ा**–पु. [अ.] तालुका. (यौ.) **ताल्लुक़ादार** पु. तालुकेदार.

**ताल्लुक़ात**—पु. [ अ. ] संबंध ( ‘ ताल्लुक ’ चें बहु.).

**ताव**—पु. १ आंच; अुष्णता. २ आवेश; राग. (मु.) **ताव आना**–अुकळी येणें. **ताव देना**–१ अुन करणें. २ ताव देणें (मिशीवर).

**ताव**—पु. [फा.] कागदाचा ताव.

**तावरो***–पु.१ ताप; दाह; अुष्णता. २ अून. ३ भोंवळ. [सानभरपाअी

**तावान**–पु. [फा.] १ दंड; २ नुक-

**तावीज़**—पु. [ अ. ] ताअीत.

**ताश**—पु. [ अ. ] पत्ते.

**तासीर**—स्त्री. [ अ.] १ परिणाम; प्रभाव. २ गुणधर्म.

**तासु***—सर्व. त्याचा. **तासुको**–सर्व. त्याला. **तासू**, **तासों**–सर्व. त्याच्याशीं. [ देखील.

**ताहम***—अव्य. [फा.] तरी; तरी-

**ताहि***—सर्व. त्याला.

**ताहीं***—अव्य. १ पावेतों; पर्यंत. २ समीप; जवळ.

**तिकोन***—वि. त्रिकोण.

**तिक्का**—पु. [ फा. ] मांसाचा लहानसा तुकडा.

**तिक्की**–स्त्री. तिर्री ( पत्त्यांतील ).

**तिखाअी**—स्त्री. तिखटपणा.

**तिखारना**—क्रि. अ. नक्की करून घेणें; विचारणें.

**तिगुना**–वि. तिप्पट. [येणारा ताप.

**तिजरा**—पु. दर तिसरे दिवशीं

**तिजारत**—स्त्री. [ अ. ] व्यापार.

**तित***—क्रि. वि. तेथें; तिकडे.

**तितर-बितर**—वि. [ अनु. ] अस्ताव्यस्त; अव्यवस्थित.

**तितली**—स्त्री. फुलपांखरूं.

**तितल्ला**-वि.तिमजली;तीन मजली.

**तितिंबा-मा**—पु. [अ.] पुस्तकाचें परिशिष्ट.

**तिते, तितेक, तितो***-*वि.* तितकें.
**तितै***-*क्रि. वि.* त्याच ठिकाणीं.
**तिन**—सर्व. १ त्यानें २ तो. ३ ते (सामान्य रूप).
**तिनकना**—*क्रि.अ.*[अनु.] चिडणें; चडफडणें. [काडी.
**तिनका***-*पु.* वाळलेल्या गवताची
**तिनूका***-*पु.* गवताची काडी.
**तिन्हें***-सर्व. ते (सामान्य रूप).
**तिन्हें***—सर्व. त्यांना.
**तिपल्ला**-*वि.* तीन पदरी; तिहेरी.
**तिपाअी**—*स्त्री.* तीन पायांची घडवंची; तिवअी.
**तिबारा**—*वि.* तिसऱ्यांदा.
**तिबासी**-*वि.* तीन दिवसांचें शिळें.
**तिमंजिला**—*वि.* [*स.*+*अ.*] तीन मजली.
**तिमिर**—*पु.* अंधार; काळोख.
**तिमुहानी**—*स्त्री.* [*सं.* + फा.] तीन रस्ते जेथून फुटतात ती जागा.
**तिय-या***स्त्री.*-१ स्त्री; २ पत्नी.
**तिरंगा**—*वि.* तिरंगी; तीन रंगी.
**तिरखा***—*स्त्री.* तृषा; तहान.
**तिरछा**—*वि.* तिरपा; वांकडा.
**तिरछापन**-*पु.* वक्रता; वांकडेपणा.
**तिरछौहा**—*वि.* किंचित् वांकडा; कांहींसा वांकडा.
**तिरना**—*क्रि. अ.* १ तंरगणें. २ तरणें; पोहणें. ३ तरून जाणें.
**तिरनी**—*स्त्री.* लहंग्याची नाडी.
**तिरपाअी**—*स्त्री.* तिवअी.
**तिरपाल**—*पु.* बोरूच्या पेंढ्या.
**तिरपाल**—*पु.* [अिं.] कॅनव्हास; ताडपत्री.
**तिरेंदा**—*पु.* समुद्रांत धोक्याची सूचना देण्याकरितां जागोजागीं टाकून ठेवलेले पीप.
**तिरलोक**—*पु.* त्रिलोक.
**तिरसट**—*वि.* त्रेसष्ट; ६३.
**तिराना**-*क्रि.स.* तरंगविणें; तरविणें.
**तिरासी**—*वि.* त्र्यांयशी; ८३.
**तिरिया***—*स्त्री.* स्त्री. (यौ.)
**तिरिया-चरितर**-*पु.* स्त्रीचरित्र.
**तिलंगाना**-*पु.* तेलंगण; आंध्र प्रांत.
**तिल**—*पु.* तीळ. (मु.) **तिलका ताड करना**—राअीचा पर्वत करणें. **तिल तिल**-थोडें थोडें. **तिल धरनेकी जगह न होना**-अत्यंत गर्दी होणें.
**तिलकुट**—*पु.* तिळाची वडी.
**तिलचट्टा**—*पु.* झुरळ.
**तिलदानी**-*स्त्री.* शिंप्याची सुअीदोरा ठेवण्याची पिशवी. [जाणें.
**तिलमिलाना**-*क्रि. अ.* कळवळून
**तिलस्म**—*पु.* [ग्री.] जादू; अद्भुत चमत्कार.

**तिलस्माती** } *वि.* [ग्री.] जादूचा;
**तिलस्मी** } जादू संबंधी.

**तिलहन**—*पु.* गाळितांचें धान्य.

**तिलोरी-तिलौरी**—*स्त्री.* तिळवडी.

**तिलौंछना**—*क्रि. स.* तेल लावणें.

**तिलौंछा**—*वि.* तेलकट.

**तिल्ली**—*स्त्री.* पांथरी; प्लीहा.

**तिष्षन**—*वि.* तीक्ष्ण.

**तिस***— सर्व. 'तो'चें सामान्य रूप.

**तिसना***—*स्त्री.* तृष्णा; तहान.

**तिसरायत**—*स्त्री.* परकेपणा.

**तिसरैत**—*पु.* १ तिऱ्हाईत; परका. २ तटस्थ. ३ तिसऱ्या भागाचा मालक.

**तिहराना**—*क्रि.स.* तिसऱ्यांदा करणें.

**तिहरा**—*वि.* तिहेरी; तीन-पदरी.

**तिहाई**—*स्त्री.* तिसरा हिस्सा; अेक तृतीयांश.

**तिहारा, तिहारो***—सर्व. तुमचा.

**तिहि***— सर्व. त्याला.

**तिहूँ***—*वि.* तिघेहि; तीन्हीं.

**तीखन***—*वि.* तीक्ष्ण.

**तीखा**—*वि.* १ तिखट; झणझणीत. २ तीव्र; प्रखर. ३ तीक्ष्ण. ४ चोख; अुत्तम. (यौ.) **तीखापन**—तिखटपणा; तीक्ष्णपणा.

**तीछन**—*वि.* तीक्ष्ण.

**तीज**—*स्त्री.* १ तृतीया. २ हरतालिका, भाद्रपद शुद्ध ३. [झणझणीत.

**तीत**—*वि.* १ अुग्र. २ तिखट;

**तीतर**—*पु.* कवडा; होला.

**तीता**—*वि.* पाहा 'तीत'

**तीन**—*वि.* तीन. (मु.) **तीन पाँच करना**—हुज्जत घालणें; टाळाटाळी करणें. **तीन तेरह करना**—वांटून टाकणें; अुधळून टाकणें. **न तीनमें न तेरहमें**—न अध्यांत न मध्यांत.

**तीमारदार**—*वि.* [फा.] सहानुभूति दाखविणारा. **तीमारदारी**—*स्त्री.* १ शुश्रूषा. २ सहानुभूति.

**तीमी***—*स्त्री.* स्त्री.

**तीय***—*स्त्री.* स्त्री. [चालविणारा.

**तीरंदाज**—*पु.* [फा.] तिरंदाज; धनुष्य

**तीर**—*पु.* [फा.] बाण.

**तीर**—*पु.* तीर; कांठ.

**तीरथ**—*पु.* तीर्थ.

**तीली**—*स्त्री.* [फा.] लोखंडी छड.

**तीसरा**—*वि.* तिसरा.

**तीसी**—*स्त्री.* अळशी (धान्य); जवस.

**तुंदिल**—*वि.* ढेरपोट्या; तोंदिल.

**तुंबा**—*पु.* १ कडू भोपळा (पोहण्याचा). २ कमंडलू (भोपळ्याचा).

**तुअ, तुव***—सर्व. तुमचा; तुझा.

**तुक**—*स्त्री.* यमक.

**तुकबंदी**—स्त्री॰ [सं.+फा.] यमक-जुळवणी.

**तुकमा**–पु॰ [फा.] काजें (बटनाचें).

**तुकान्त**–पु.[दे.] यमक;अंत्यानुप्रास.

**तुकारना**–क्रि॰ स॰ अरे तुरे म्हणून अपमान करणें.

**तुक्कड** पु॰ [दे.] यमक्या (कवि).

**तुख़्म**—पु॰ [ अ. ] बीज.

**तुट***–वि॰ १ तुकडा. २ लेशमात्र; यत्किंचित्.

**तुट्ठना***—क्रि॰ अ॰ संतुष्ट होणें; [ प्रसन्न होणें

**तुडाना** क्रि॰ स॰ मोडण्याचें किंवा तोडण्याचें काम करविणें. **रुपया तुडाना** अथवा **भुनाना**–पैशाची मोड करणें.

**तुतलाना**—क्रि॰ अ॰ [अनु.] तोतरें बोलणें; बोलतांना अडखळणें.

**तुनक**–वि॰[फा.]१ दुर्बल. २ कोमल. ३ हलका. **तुनकमिज़ाज**–वि॰ चिडखोर; रागीट.

**तुन्द**–वि॰[फा.]१ वेगवान्. २बेफाम.

**तुफ़ैल**–पु.[अ.]साधन; मार्ग(द्वारा).

**तुम**–सर्व. तुम्ही ('तूं' चें बहु.); तूं.

**तुमडी**–स्त्री॰ भोपळ्याचें तुणतुणें; भोपळ्याची पुंगी.

**तुमुल**–पु॰ १ लढाओीची दंगल. २ लढाओीची गडबड; कोलाहल.

**तुम्ह***–सर्व. तुम्ही; तुम्हाला.

**तुम्हरा, तुम्हार, तुम्हारा**–स॰ तुमचा; तुझा.

**तुरंजबीन**–पु॰ [अ.] लिंबाचें सरबत.

**तुरंत**–क्रि॰ वि॰ ताबडतोब; लगेच.

**तुरअी**–स्त्री॰ दोडकें.

**तुरकी**—वि॰ [ तु. ] तुर्क देशाचा. स्त्री॰ तुर्की भाषा.

**तुरय**–पु॰ घोडा.

**तुरही**–स्त्री॰ तुतारी.

**तुराओ***—स्त्री॰ बिछाना; गादी.

**तुरावती**–वि॰स्त्री॰ वेगवान्; जलद चालणारी; अैटींत चालणारी.

**तुरिया***–स्त्री॰अेक चतुर्थांश भाग.

**तुरैया**–स्त्री॰ [दे.] दोडकें.

**तुर्रा**–पु॰ [अ.] १ केसांचा झुपका; गोंडा. २ तुरा. (मु.) **तुर्रा यह कि**—अितर्के असूनसुद्धां.

**तुर्रा**–वि॰ [फा.] अद्‌भुत; नवलाअीचा. [ आंबटपणा.

**तुर्श**–वि॰ [फा.] आंबट. **तुर्शी**–स्त्री॰

**तुलना**–क्रि.अ.जोखलें जाणें;तोलणें. (मु.) **तुल जाना**–हट्टास पेटणें; अिरेस पडणें.

**तुलवाना, तुलाना**–क्रि.स॰ १ जोखविणें; वजन करविणें. २ ओंगण घालविणें. **तुलवाअी, तुलाअी**–स्त्री॰ तोलण्याचें काम किंवा मजुरी.

**तुला**–स्त्री· १ वजन; माप. २ तुलना; समानता.
**तुलाअी**–स्त्री·रजअी.
**तुव**–सर्व. तुमचा; तुझा.
**तुवर**–पु· तुरीची डाळ.
**तुष**–पु· भुसा; टरफल.
**तुषार**–पु· १ तुषार. २ दंव. ३ बर्फ.
**तुहार***–सर्व. तुमचा.
**तुहिं*** सर्व. तुम्हांला. [४ गारवा.
**तुहिन**–पु· १ बर्फ. २ धुकें. ३ चांदणें.
**तूँबा**–पु·सुकलेला मोठा भोपळा.
**तू**–सर्व. तूं (अनादर किंवा घनिष्ठता सूचक) (मु.) **तू तडाक**–अनादर सूचक शब्द बोलणें; फटदिशीं बोलणें. **तू तू मैं मैं करना**–भांडण करणें; अेकेरीवर येणें.
**तूअ***–सर्व. तुमचा.
**तूख**–पु· गवताची काडी; भूस. [होणें.
**तूठना***–क्रि· अ· तृप्त होणें; संतुष्ट
**तूती**–स्त्री· [फा.] पोपट. (मु.) **तूती बोलना**–१ बोलबाला हाणें. २ जम बसणें. [२ अुंचवटा. बांध.
**तूदा**–पु· [फा.] १ मातीचा ढीग.
**तूफाँ**, **तूफान**–पु· [अ.] १ वावटळ. २ वादळ; तुफान. ३ आपत्ति; संकट. ४ तंटाबखेडा. ५ आळा.
**तूम**–पु· पिंजलेला कापूस.
**तूमतडाक**–स्त्री· [फा.] थाटमाट; डामडौल.
**तूमडी**–स्त्री· पुंगी (गारुड्याची).
**तूमना**–क्रि·स· कापूस पिंजणें; कापूस विरळ करणें. [लचक गोष्ट.
**तूमार**–पु· [अ.] पाल्हाळ; लांब-
**तूल**–पु· [अ.] १ लांबी. २ विस्तार.
**तूलिका**, **तूली**–स्त्री· कुंचा; ब्रश.
**तृखा***–स्त्री· तृषा; तहान.
**तृण–तृन**–पु· गवत.
**तें***–प्रत्य. १ शीं; द्वारा (तृतीया). २ पासून (पंचमी).
**तेंदुआ**–पु· [दे.] चित्ता.
**तेअू**–सर्व. ते; सर्वच्या सर्व.
**तेग**–स्त्री· [अ.] खड्ग; तलवार.
**तेगा**–पु· [अ.] खंजीर.
**तेज़**–वि· [फा.] १ तीक्ष्ण. २ चपल. ३ तिखट; झणझणीत. ४ महाग. ५ चलाख. ६ बुद्धिमान्. *क्रि· वि·* वेगानें; भरभर. (यौ.) **तेज़ मिज़ाज**–तापट; रागीट.
**तेज़ी**–स्त्री· १ तीक्ष्णता. २ घाअी; जलदी. ३ तेजी; महागाअी.
**तेजसी**–वि·. तेजस्वी.
**तेजस्वी**–वि· प्रतापी; तेज असलेला.
**तेतना**–*वि· तितका.

**तेता, तेतिक, तेतो***— वि. तितका; तितकाच.
**तेरस**—स्त्री. त्रयोदशी.
**तेरहीं**—स्त्री. तेरावा ( श्राद्धाचा ).
**तेल**—पु. तेल; रोगण. (मु.) **तेल चढना**—वरवधूंना तेल लावलें जाणें; हळदी लागणें.
**तेलहन**—पु. गळिताचें धान्य.
**तेलिन**—स्त्री. तेलीण; तेल्याची स्त्री.
**तेलिया**—वि. तेलासारखा तुळतुळीत व चकचकीत.
**तेली**—पु. तेली. (मु.) **तेलीका बैल**—सदा काम करीत राहाणारा.
**तेवर**—पु. [?]रागीट नजर;क्रुद्ध दृष्टि.
**तेह-हा***—पु. १ राग; क्रोध. २ अहंकार; गर्व.
**तेहरा**—वि. १ तिहेरी. २ तिप्पट.
**तेहवार**—पु. सण; पर्व; उत्सव.
**तेहि, तेहीं***—सर्व. त्याला. वि. १ रागीट. २ घमेंडखोर.
**तैं***—क्रि. वि. द्वारा. सर्व. तूं.
**तै***—क्रि. वि. तितका.
**तैनात**—वि.[अ.] नियुक्त. **तैनाती**—स्त्री. नेमणूक; नियुक्ति.
**तैयार**—वि. [अ.] १ तयार. २ धष्टपुष्ट. **तैयारी**—स्त्री. तयारी.
**तैयो,तैवो**—क्रि.वि.तेव्हां; त्या वेळीं.
**तैरना**—क्रि. अ. पोहणें.
**तैराक**—वि. पटाईत पोहणारा.
**तैलचित्र**—पु. तैलचित्र;ऑअिलपेंट.
**तैश** —पु. [अ.]राग; संताप; द्वेष.
**तों***—क्रि. वि. तेव्हां; त्या वेळीं.
**तोंद**—स्त्री. ढेरी; पोट सुटणें.
**तोंदल**—वि. ढेरपोट्या.
**तो***—सर्व.तुझा.अव्य. तेव्हां; तर.
**तोअि***—पु. पाणी.
**तोख**—पु. संतोष.
**तोखना**—क्रि.स. तृप्त करणें; संतुष्ट करणें;प्रसन्न करणें.क्रि.अ.तृप्त होणें.
**तोटका**—पु. तोडगा.
**तोड**—पु.१ नदीचा जोराचा प्रवाह. २ युक्ति; तोड.
**तोडना**—क्रि. स. तोडणें.
**तोडवाना**—क्रि. स. तोडविणें.
**तोतला**—वि.[अनु.] बोबडा;तोतरा.
**तोता** —पु. [फा.] पोपट.
**तोताचश्म**—पु. [फा.] बेमुर्वत; निर्लज्ज.
**तोप**—स्त्री. [तु.] तोफ. **तोपची**—पु. गोलंदाज.
**तोपना**—क्रि. स. झांकणें.
**तोबडा**—पु. [फा.] तोबरा.
**तोम**—पु. समूह; ढीग.
**तोर-रा***—वि. तुझा.
**तोरअी**—स्त्री. दोडकें; घोसाळें.
**तोला**—पु. तोळा; बारा मासे.
**तोशक**—स्त्री. [फा.] लहान गादी.

**तोशदान**–पु. [ फा. ] १ फराळाचा डबा. २ काडतुसांची चामड्याची पिशवी.

**तोशा**–पु. [ फा. ] फराळ (प्रवासास जातांना बरोबर घेतलेले फराळाचे पदार्थ ); शिदोरी.

**तोशाखाना**–पु. [ तु.+फा. ] राजांचें [ वस्त्रागार.

**तोष-तोस**–पु. तृप्ति; संतोष.

**तोहफा**—पु. [ अ. ] १ बक्षीस. २ भेट; नजराणा; देणगी.

**तोहमत**–स्त्री. [अ.] आरोप; आळ.

**तोहर–रा, तोहार***–सर्व. तुमचा.

**तोहि–हे***–सर्व. तुला.

**तौंस***–स्त्री. तहान. [ निघणें.

**तौंसना**–क्रि. अ. होरपळणें; भाजून

**तौंसा**–पु. अुष्णता; अुष्मा.

**तौंसियत**–स्त्री. विस्तवाची आंच.

**तौ***—क्रि. वि. तर

**तौफ़ीक़**-स्त्री.[अ.]१ अीश्वराची कृपा. २ श्रद्धा; भक्ति. ३ सामर्थ्य.शक्ति.

**तौर**–पु. [ अ. ] १ वर्तन; वागणूक. २ दशा; स्थिति. ३ तऱ्हा; पद्धत.

**तौलगि***-अव्य. तोंपर्यंत.

**तौलना**–क्रि. स. १ तोलणें; वजन करणें. २ औंगण घालणें.

**तौलिया**–स्त्री.,पु. [ अिं ] टॉवेल.

**तौहीन**—स्त्री. [ अ. ] अपमान; बेअिज्जत; अप्रतिष्ठा.

**त्याग**—पु. त्याग; सोडणें; अुत्सर्ग. ( यौ. ) **त्यागपत्र**–राजीनामा

**त्यागना**—क्रि. स. सोडणें; त्याग करणें. [ २ त्याप्रमाणें; तसें.

**त्यों**—अव्य. १ तेव्हां; तत्काल.

**त्योरी**—स्त्री. दृष्टि; नजर. ( मु. ) **त्योरी चढना या बदलना**– रागानें डोळे वटारणें. **त्योरीमें बल पडना, त्योरी चढाना**– रागानें कपाळाला आठ्या घालणें.

**त्योहार** / **त्यौहार** } पु. सण; पर्व.

**त्रिपथ-गामिनी**–स्त्री. गंगा नदी.

**त्रिदिव**—पु. स्वर्ग.

**त्रिय-त्रिया**—स्त्री. स्त्री.

**त्रिसना***–स्त्री. तृष्णा.

**त्रुटि**—स्त्री. अुणीव; चूक.

## थ

**थंब-भ**—पु. स्तंभ; खांब. [स्थिर.

**थंमित***—वि. १स्तंभित. २अचल;

**थकना**–क्रि. अ. १ थकणें; दमणें २ कंटाळणें. ३ वार्धक्यानें थकणें.

**थकान**—स्त्री. थकवा.

**थकाना**—क्रि. स. थकविणें.

**थकामाँदा**–वि. थकलेला-भागलेला.
**थकावट–हट**–स्त्री. थकवा. [श्रांत.
**थकौहाँ***–वि. थकलेला; भागलेला;
**थगित**–वि. स्थगित; तहकूब.
**थन**–पु. चतुष्पाद प्राण्याचें स्तन.
**थनी**–स्त्री. अजागल-स्तन.
**थनेला**–पु. स्त्रियांच्या स्तनांवर होणारा फोड.
**थनैत**–पु. १ गांवचा पुढारी. २ जमीनदाराचा खंड वसूल करणारा गुमास्ता.
**थपकना**–क्रि. स. [अनु.] थोपटणें; गोंजारणें. **थपकी**–स्त्री. थापटी (प्रेमानें थोपटणें.).
**थपथपाना** क्रि. स. थोपटणें.
**थपन***–पु. स्थापना.
**थपना, थपाना, थापना**–क्रि. स. १ स्थापना करणें. २ लौकिक गाजविणें; नांव मिळविणें.
**थपेडा**–पु. [अनु.] १ थप्पड. २ प्रहार; आघात. [थोपवून धरणारा.
**थमकारी***–वि. १ संयमी. २
**थमना**–क्रि. अ. १ थांबणें; थबकणें. २ धीर धरणें. ३ बंद होणें; चालू नसणें.
**थर**–पु. १ थर; घडी. २ स्थळ.
**थरकना, थरथराना, थर्राना**–क्रि. अ. [अनु.] थरथर कांपणें.
**थरमामीटर**–पु. [अं.] तापमानदर्शकयंत्र; थर्मामीटर.
**थर्राना**–क्रि. अ. पाहा 'थरकना'.
**थल**–पु. १ स्थळ; जागा; ठिकाण. २ कोरडी जमीन. ३ वाळवंट; रेताड जमीन.
**थलथल**–वि. वातानें अंग सुटलेला.
**थलबेडा**–पु. पत्ता; ठावठिकाण; थांग.
**थली**–स्त्री. १ स्थान; ठिकाण. २ तळ. ३ बैठक. ४ वाळवंट.
**थवई**–पु. गवंडी.
**थहना***–क्रि. स. ठाव घेणें. [कांपणें.
**थहराना**–क्रि. स. [अनु.] थरथर
**थहाना**–क्रि. स. १ थांग लावणें. २ एखाद्याच्या विद्वत्तेविषयीं किंवा योग्यतेविषयीं अंदाज करणें.
**थाँग** स्त्री. १ चोर किंवा डाकूचें गुप्त स्थान. २ थांग; शोध.
**थाँगी**–पु. १ चोरीचा माल विकत घेणारा. २ चोरांचा मुख्य. ३ चोरांना चोरीची माहिती देणारा. ४ गुप्त हेर.
**था**–क्रि. अ. होता ('है' चें पुल्लिंगी एकवचनी भूतकाळाचें रूप).
**थाति–थाती**–स्त्री. १ ठेव; अनामत. २ वेळीं उपयोगी पडावी म्हणून राखून ठेवलेली वस्तु. ३ स्थैर्य.

**थान**-पु. १ स्थान; ठिकाण. २ राहण्याची जागा; निवासस्थान. ३ देवस्थान. ४ तबेला. ५ कपडयाचें ठाण. ६ संख्या.

**थाना** पु. पोलीसचौकी.

**थानेदार**-पु. [सं. + फा.] फौजदार; पोलीसचौकीवरील अधिकारी.

**थाप**-स्त्री. १ थाप (तबल्याची). २ थप्पड. ३ ठसा. ४ प्रतिष्ठा; मर्यादा. ५ प्रमाण. ६ शपथ.

**थापन**-पु. स्थापन; प्रतिष्ठापना.

**थापना**-क्रि. स. १ स्थापणें; बसविणें. २ बनविणें स्त्री. स्थापना; प्राणप्रतिष्ठा.

**थापा**-पु. १ हाताच्या पंजाचा छाप; ठसा. २ शेतांत धान्याच्या राशीवर मातीनें किंवा शेणानें केलेली खूण. ३ ढीग; रास.

**थामना**-क्रि. स. १ थांबविणें, अडविणें. २ थोपवून धरणें; धरून ठेवणें. ३ सहायता करणें; मदत करणें. ४ सांभाळणें. ५ जबाबदारी घेणें.

**थाल**-पु. मोठी परात. **थाली**-स्त्री. ताट; थाळी; परात. (मु.) **थाली का बैंगन**-पगडी बदलणारा; चंचल.

**थाह**-स्त्री. १ थांग; खोली. १ थांग; पत्ता. ३ सीमा; अंत.

**थाहना**-क्रि. स. अंदाज पाहणें; ठाव घेणें; थांग पाहणें.

**थाहरा***-वि. उथळ.

**थिगली**-स्त्री. ठिगळ.

**थिर***-वि. १ स्थिर; अचल. २ शांत. ३ स्थायी; टिकाऊ.

**थिरक**-पु. नृत्यांतील पदविक्षेप; पदविन्यास.

**थिरकना**-क्रि. अ. नाचणें.

**थिरना**-क्रि. अ. १ तरंगरहित होणें; शांत व संथ होणें (पाण्याचा प्रवाह). २ निवळणें. ३ तळाशीं जमणें.

**थिराना**-क्रि. अ. स्थिर होणें. क्रि. स. स्थिर होऊं देणें.

**थीगली**-स्त्री. पाहा 'थिगली.'

**थीता**-पु. १ स्थैर्य. २ शांति; धैर्य.

**थुक्का फजीहत**-स्त्री. [सं.+अ.] १ छी थू; फजीती. २ भांडण; झगडा.

**थुडी**-स्त्री. [अनु.] छी थू; धिक्कार. (मु.) **थुडी थुडी करना**-छी थू करणें. [मितव्ययी; कंजूष.

**थुरहता**-वि. १ लहान हाताचा. २

**थूक** पु. थुंकी.

**थूकना**-क्रि. अ. १ थुंकणें. २ धिक्कारणें; निंदा करणें. (मु.) **किसी पर थूकना**-तुच्छ समजणें; दोष देणें. **थूक कर चाटना**-कबूल करून नाकारणें. **थूक**

देना—निंदा करणें; सोडून देणें.

**थूथन-थूथना**—पु. [ दे. ] लांबट तोंड. (अुंट अि.) [ लांब तोंड.

**थूथरा**—पु. १ नागाचा फणा. २

**थून-नी**—स्त्री. १ खांब. २ आधार.

**थूल-थूला***—वि. १ स्थूल; जाड. २ बेढब.

**थूहर**—पु. शेरीचें झाड.

**थेअीथेअी**—वि. [ अनु. ] थयथय (नाचणें).

**थेगली**—स्त्री. ठिगळ.

**थेथर**—वि. [दे.] थकलेला; शांत.

**थैला**—पु. १ पिशवी; थैली. २ खिसा. **थैली**—स्त्री. पिशवी.

**थैलीदार**—पु. [दे.+फा.] १ खजिन्यांत रुपयांची ने-आण करणारा माणूस. २ कॅशिअर.

**थैलीबरदारी**—स्त्री. [ दे. ] थैली पोंचविण्याचें काम.

**थोक**—पु. १ ढीग; रास. २ समूह. ३ ठोक विक्री. (मु.) **थोक करना**—अेकत्र करणें.

**थोडा**—वि. थोडा; अल्प; कमी. क्रि. वि. अल्प प्रमाणांत. (यौ.) **थोडा बहुत**—थोडेंफार; थोडेंबहुत. **थोडा ही**—जवळ जवळ नाहीं.

**थोती**—स्त्री. [ दे. ] जनावराच्या तोंडाचा पुढील भाग.

**थोथा**—वि. [ दे. ] १ पोकळ; रिकामा. २ तथ्य नसलेला. ३ बोथट. ४ कुचकामाचा.

**थोपडी**—स्त्री. थप्पड; चपराक.

**थोपना**—क्रि. स. १ थापणें; लिंपणें. २ गळ्यांत घालणें; माथीं मारणें.

**थोरा-थोरिक***—वि. थोडा; अल्प.

## द

**दंग**—वि. [ फा. ] थक्क; विस्मित.

**दंगअी**—वि. [ फा. ] १ दंगाधोपा करणारा. दंगेखोर. २ अुपद्व्यापी; अुपद्रवी. ३ प्रचंड; भयंकर.

**दंगल**—पु. [फा.] १ कुस्तीचा आखाडा. २ कुस्तीची शर्यत. ३ समूह; जमाव. ४ मोठी गादी. ५ चढाओढ.

**दंड**—पु. १ दंड· सोटा. २ दंड; जोर (व्यायाम). ३ साष्टांग नमस्कार; दंडवत. ४ दंड; शिक्षा.

**दंडक**—पु. १ दंडा; काठी. २ शास्ता.

**दंडना**—क्रि. स. शिक्षा देणें; दंड करणें.

**दँतिया**—स्त्री. लहान दांत.

**दँतुला**—वि. मोठ्या दांतांचा; दातरा-

**दंद**–*पु.* द्वंद्व; तंटा; झगडा. **दंदी**–*वि.* भांडखोर.

**दंदाना**—*पु.* [फा.] दांते; दांत्याची ओळ (फणी, करवत अि. चे दाते) **दंदानेदार**–*वि.* दांतेदार; दांते असलेला.

**दंदाशिकन**–*वि.* [फा.] १ सडेतोड (अुत्तर). २ दांत पाडणारा.

**दंपा***–*स्त्री.* [अनु.] वीज.

**दंभी**–*वि.* १ ढोंगी. २ घमेंडखोर.

**दँवरी**-*स्त्री.* धान्याची मळणी.

**दंस***–*पु.* दंश.

**दअी***–*पु.* १ अीश्वर. २ दैव; प्रारब्ध, (मु.) **दअी का घाला**–दुर्दैवी, कमनशिबी. **दअीमारा**–*वि.* दैवी आपत्तींत सांपडलेला.

**दकियानूसी**—*वि.* [अ.] १ अत्यंत प्राचीन. २ सनातनी; बुरसटलेला.

**दक़ीक़ा**—*पु.* [अ.] १ युक्ति, अुपाय. २ सूक्ष्म गोष्ट.

**दक्खिन**–*पु.* १ दक्षिण दिशा. २ दाक्षिणेकडील प्रदेश.

**दक्खिनी**–*स्त्री.* अुर्दू भाषा.

**दक्षिण**—*पु.* दक्षिण दिशा. *वि.* १ अुजवा. २ अनुकूल. (यौ.) **दक्षिण पवन**– वसंत ॠतूंतील अुन्मादक वारा.

**दख़ल**–*पु.* [अ.] १ अधिकार; ताबा. २ हस्तक्षेप; ढवळाढवळ. ३ प्रवेश; शिरकाव.

**दख़लयाबी**–*स्त्री.* [अ. + फा.] अधिकार किंवा ताबा मिळविणें.

**दख़ील**–*वि.* [अ.] ताबा ठेवणारा. **दखीलकार**–*पु.* बारा वर्षांच्या वहिवाटीचा हक्क सांगणारा.

**दगड**–*पु.* [दे.] नगारा.

**दगदगा**–*पु.* [अ.] १ भय; भीति. २ संशय; शंका; धुगधुग. ३ अेक कंदील. **दगदगी**–*स्त्री.* भीति.

**दगधना**—*क्रि. अ.* जळणें. *क्रि. स.* १ जाळणें. २ दुःख देणें.

**दगना**–*क्रि.अ.* १ सुटणें (बंदूक, तोफ अि.). २ करपणें; जळून जाणें. ३ डागळलें जाणें; डाग पडणें. ४ प्रसिद्ध, प्रख्यात होणें [रस्ता.

**दगर-रा***–*पु.* १ अुशीर; विलंब. २

**दगल**–*पु.* [अ.] १ दगा; कपट; धोका. २ बहाणा. [डगला.

**दगला**–*पु.* [दे.] जाड अंगरखा;

**दगहा**—*वि.* प्रेताला अग्नि देणारा व क्रियाकर्म करणारा.

**दगहा**–*वि.* डाग दिलेला; चरका दिलेला. [२ फसवणूक.

**दग़ा**–*स्त्री.* [अ.] १ कपट; धोका.

**दग़ादार, दग़ाबाज़**—*वि.* [अ.+ फा.] दगाबाज; कपटी.

**दगैल**–वि· [अ.] १ डागळलेला. २ दोष असलेला. पु· दगाबाज.

**दचकना**–क्रि·अ· [अनु.] १ ठेच किंवा धक्का लागणें. २ दबणें. ३ हिसका बसणें. क्रि· स· १ धक्का देणें. २ दाबणें. [पडणें;

**दचना**–क्रि·अ· [अनु.] खालीं येणें.

**दच्छकुमारी***–स्त्री· पार्वती.

**दाढियल**–वि· दाढी राखणारा; दाढीवाला.

**दतवन, दतुअन, दतुवन**—स्त्री· १ दातवण (बाभूळ, लिंब अि. चें) २ तोंड धुणें.

**दत्त**–वि· दिलेला.(यौ.) **दत्तचित्त**– अेखाद्या कामांत पूर्ण लक्ष घालणारा; रमून गेलेला.

**दत्त–दत्तक**–पु· दान; दत्तक (यौ.) **दत्त-विधान**–दत्तक घेण्याचें कार्य.

**दत्ती**–स्त्री· वाङ्निश्चय.

**ददरा**–पु· [दे.] गाळावयाचें वस्त्र.

**ददिया ससुर**–पु· आजेसासरा.

**ददिहाल**–पु· [अनु.] कूळ; वंश.

**ददोरा**—पु· गांध.

**दध–धि**–पु·१ दही. २ वस्त्र; कपडा.

**दधि***–पु· समुद्र.

**दधिकाँदो**–पु· गोकुळ आष्टमीच्या दिवशीं दह्यांत हळद मिसळून अेकमेकांचें अंगावर फेकतात तो अुत्सव.

**दाधिसुत**—पु· १ कमळ. २ चंद्र. ३ मोतीं. ४ विष.

**दधिसुत**–पु· लोणी.

**दनादन**–क्रि·वि·[अनु.]१ दणादण आवाज करीत. २ आनंदानें. ३ सतत.

**दनुज**–पु· दानव; दैत्य.

**दन्दा**–वि· [फा.] दांत.

**दन्दा-शिकन**–वि· [फा.] १ दांत काढणारा. २ कठोर.

**दपटना**–क्रि· अ· दटावणें;दरडावणें. **दपेट**–स्त्री· दटावणें; दरडावणी.

**दपु***–पु· दर्प; अहंकार; घमेंड.

**दफतर, दफ्तर**–पु· [फा.]१ कचेरी; कार्यालय. २ सविस्तर वृत्तान्त.

**दफती**–स्त्री· [अ.] पुठ्ठा (पुस्तकाचा); पुष्ठीपत्र.

**दफनाना**–क्रि·स·[अ.]पुरणें;गाडणें. **दफन**–पु· प्रेत पुरण्याचा विधि.

**दफा**–स्त्री [अ.] १ वेळा; खेपा. २कायद्याचें कलम. वि· दूर केलेला; तिरस्कृत. (मु.) **दफा लगाना**– कायद्याचें कलमाखालीं खटला भरणें.

**दफादार**—पु· [अ.+फा.] नाअीक; फौजदार.

**दफीना**–पु· [अ.] पुरलेलें धन.

**दफ्तरी**–पु· [अ.] बुक बाअिंडर.

**दफ्तरीखाना**—पु. [ फा. ] बुक-बाइंडिंग विभाग.

**दबंग**–वि. प्रभावशाली; रुबाबदार.

**दबगर**-पु. [दे.] १कातड्याचें बुधलें बनविणारा. २ढाल बनविणारा.

**दबना**—क्रि. अ. १ दबणें; चेपले जाणें. २ टिकाव न धरणें; मागें हटणें. ३ लाचार होणें. ४ फिक्कें पडणें. ५वजन पडल्यामुळें नम्र होणें. ६ लाजणें; संकोच करणें.
( मु. ) **दबी ज़बान से कहना**–ध्वनित करणें; स्पष्ट न बोलणें.

**दबसट**–पु. दाब; दडपण.

**दबाना**—क्रि. स. १ दाबणें; चेपणें २ मागें हटविणें. ३ दड-पण घालणें; दाब आणणें. ४ बळका-वणें. ५ असहाय करून सोडणें. ६ पुरणें; गाडणें. ७ दमन करणें. ८ बळकावणें.

**दबाव**— पु. दाब; दडपण; वजन.

**दबीज़**—वि. [ फा. ] दाट; घट्ट.

**दबैल**—वि. १ अंकित; ताबेदार. २ नमून वागणारा.

**दबोचना**–क्रि. स. १ लपविणें, छपविणें. २ झडप घालून दाबणें; दडपणें. [राहूं न देणें. २ दाबणें.

**दबोरना**—क्रि. स. १ समोर उभें

**दम**—पु. १ संयम. २ शिक्षा. ३ घर. ४ चिलखत.

**दम** पु. [ फा ] १ श्वास; दम. २ चिलिमीचा दम; झुरका. (मु.) **दम उखडना**—श्वास थांबणें; शिथिल होणें. **दम घोंटकर मारना**–गळा दाबून मारणें. **दम खींचना**–१ गप्प बसणें. २ श्वास घेणें. **दम घुटना**–श्वास कोंडणें; जीव गुदमरणें. **दम तोडना**–शेवटचा श्वास घेणें. **दम फुलना**–दम लागणें; धापा टाकणें. **दम भरना**–अभिमानपूर्वक अेखाद्याची स्तुति करणें. **दम मारना; दम लेना**–विसांवा घेणें. **दम खुश्क होना** अथवा **सूखना**–भीतीनें गांगरल्यामुळें श्वास थांबणें. **नाक में दम आना**–नाकीं नअू येणें. **दम देना**–फसविणें. ( यौ ) **दम झांसा**-फसवणूक. **दम दिलासा** अथवा **दमपट्टी**–खोटी आशा.

**दमकना**–क्रि. अ. चकाकणें; लक-लकणें. **दमक**–स्त्री. तेज, चमक.

**दमकल**–स्त्री. [फा.+सं.]१ आगीचा बंब. २ पाणी हापसण्याचा बंब. ३ पंप. **दमकला**— पु. रंग किंवा गुलाबपाणी शिंपण्याचें पिचकारी असलेलें भांडें.

**दमखम**–पु. [फा.] १ दृढता; मजबुती. २ जीवनशक्ति; प्राण. ३ तलवारीचें पातें किंवा धार.
**दमचूल्हा**–पु. लोखंडी शेगडी.
**दमदिलासा**–पु. [फा.] थाप, फसवणूक. [संयम. ३ शिक्षा.
**दमन**–पु. १ दडपून टाकणें. २
**दमबाज़**–वि. [फा.] फूस देणारा.
**दमाद**–पु. जांवई.
**दमामा**—पु. नगारा.
**दमारि***–पु. वणवा; दावानल.
**दमैया***—वि. हरणारा; नाहींसे करणारा.
**दयनीय**—वि. केविलवाणा.
**दयानत**–स्त्री. [अ.] दानत; इमान; विश्वासूपणा. [विश्वासू.
**दयानतदार**—वि. [अ. + फा.]
**दयाना***–क्रि. अ. द्रवणें; दयाळू होणें.
**दयालु**–वि. दयाळू .२ दयेस पात्र.
**दयावना***–वि. पु. १ दीन;
**दयिना**–स्त्री. पत्नी; बायको.
**दरआमद**–स्त्री. [फा.] १ आगमन; आंत येणें. २ मालाची आयात.
**दर**–पु. १ भेग; फट. २ दरी; गुफा, कंदरा. ३ भीति. ४ शंख.
**दर**–पु. दल; झुंड; समूह.
**दर**–पु. [फा.] द्वार; दरवाजा. १ दर; भाव २ पुरावा. (मु.)
**दर दर अलख जगाते घूमना**· लोकांना जागृत करीत हिंडणें.
**दर दर मारा मारा फिरना**– दारोदार हिंडणें; देशोधडीस लागणें.
**दरकना**–क्रि. अ. उलणें; फाटणें.
**दरकाना**–क्रि. स. फाडणें. **दरका**· पु. १ भेग; चीर २ मार; तडाखा.
**दरकार**–वि. [फा.] आवश्यक; जरुरीचा. स्त्री. जरुरी; आवश्यकता.
**दर-किनार**–क्रि. वि. [फा.] वेगळे; बाजूला. [दरमजल.
**दरकूच**· क्रि. वि. [फा.] मजल
**दरखास्त**–स्त्री. [फा.] १ विनंति; प्रार्थना. २ अर्ज; विनंतिपत्र
**दरख्त**–पु. [फा.] वृक्ष; झाड.
**दरगाह**–स्त्री. [फा.] १ दरगा (मुसलमानांचें समाधिस्थान). २ उंबरठा; प्रवेशद्वार. ३ दरबार; कचेरी [अलग. २ माफी मिळालेला.
**दर-गुज़र**–वि. [फा.] १ वेगळा;
**दरज**–स्त्री. भेग; चीर; फट.
**दरद, दर्द**–पु. [फा.] १ पीडा; वेदना; दुःख. २ दया; करुणा.
**दर-दर**–क्रि. वि. [फा.] दारोदार; घरोघर.
**दरदराना**–क्रि. स. भरडणें; ठेचणें.
**दरदरा**–वि. भरड दळलेला.

**दरना**–*क्रि. स.* १ दळणें. २ चेचणें. ३ नाश करणें.

**दरप***—*पु.* दर्प; घमेंड.

**दरपना**-*क्रि. अ.* १ संतापणें; रागावणें. २ गर्व करणें; घमेंड करणें.

**दरपनी**–*स्त्री.* लहान आरसा.

**दरपरदा**-*वि.* [फा.] १ पडद्याआड. २ लपूनछपून. [समोर.

**दर-पेश**–*क्रि. वि.* [फा.] पुढें;

**दर-पै**–*क्रि. वि.* [फा.] अेखाद्याच्या पाठीमागें; अेखाद्याच्या शोधांत. (मु.) **किसी के दर-पै होना**-अेखाद्याच्या पाठीस लागणें; अेखाद्याला त्रास देणें.

**दरब, दर्ब***— *पु.* १ धन; द्रव्य. २ सोनें, चांदी अि. धातू.

**दरबा**—*पु.* [फा.] खुराडें; सोपा; कबुतरखाना.

**दरबान**—*पु.* [फा.] पहारेकरी; द्वारपाल. **दरबानी**–*स्त्री.* पहारा; पहारेकऱ्याचें काम.

**दरभ**–*पु.* दर्भ.

**दरमा**–*पु.* [दे.] चटअी.

**दरमान**–*पु.* [फा.] १ औषध; दवा. २ चिकित्सा; अुपाय. [वेतन.

**दरमाहा**–*पु.* [फा.] दरमहा; मासिक

**दरमियान**—*पु.* [फा.] मध्य. *क्रि. वि.* दरम्यान; मध्यंतरीं.

**दरमियानी**—*वि.* [फा.] मधला. *पु.* समेट घडवून आणणारी व्यक्ति; मध्यस्थ.

**दरवाज़ा**–*पु.* [फा.] दार; दरवाजा.

**दरवेश**–*पु.* [फा.] १ फकीर; दरवेशी. २ भिकारी.

**दरशाना**–*क्रि.स.* पहा 'दरसाना'.

**दरस,दरसन**–*पु.* १ ओझरती भेट; दृष्टादृष्ट. २ रूप; सौंदर्य. ३ दर्शन.

**दरसना***–*क्रि. अ.* दृष्टीस पडणें. *क्रि. स.* पाहणें.

**दरशनी–सनी**-*स्त्री.* आरसा; दर्पण.

**दरसाना**— *क्रि. स.* दर्शविणें; दाखविणें. [कृप्पा.

**दराज**–*स्त्री.* [अिं.] टेबलाचा खण,

**दराज**–*वि.* [फा.] मोठा.

**दराज**–*स्त्री.* भेग; फट.

**दरारना**—*क्रि. अ.* भेग पडणें; फाटणें. **दरार**–*स्त्री.* चीर; फट; भेग.

**दरारा**–*पु.* रेटा; धक्का.

**दरिंदा**–*पु.* [फा.] हिंसक पशु.

**दरिया**–*पु.* [फा.] १ नदी. २ समुद्र. **दरियाअी**–*वि.* १ नदीसंबंधीं; नदीजवळचा. २ समुद्रासंबंधीं.

**दरियादिल**—*वि.* [फा.] अुदार.

**दरियाफ्त**–*वि.* [फा.] ज्ञात; माहितीचा; पत्ता लागलेला.

**दरिया-बरार**-पु. [फा.] मळीची जमीन.

**दरियाबुर्द**—पु. [फा.] नदीच्या प्रवाहानें वाहून गेलेली जमीन.

**दरी**-स्त्री. १ दरी. २ गुंफा.

**दरी**-स्त्री. सतरंजी.

**दरीखाना**-पु. [सं. + फा.] पुष्कळ दरवाजे असलेलें घर.

**दरीचा**— पु. [फा.] १ झरोका; २ खिडकी. ३ खिडकीजवळची बसण्याची जागा. [दुकान किंवा बाजार.

**दरीबा**-पु. [फा.] पानतंबाखूचें

**दरेग**-पु. [फा.] १ दुःख; खेद. २ पश्चात्ताप. ३ कमतरता; उणीव.

**दरेरना**-क्रि. स. चेंदामेंदा करणें; रगडणें; वाटणें. [२ पाण्याची ओढ.

**दरेरा**—पु. १ रेटा; धक्का.

**दरोग**-पु. [फा.] खोटें; असत्य. **दरोगहलफी**—स्त्री. खरें बोलण्याची शपथ घेऊन खोटें बोलणें (विशेषतः कोर्टांत).

**दर्ज**-वि. [फा.] नमूद; लिखित.

**दर्ज**-स्त्री. [फा.] भेग; फट.

**दर्जन**—पु. [अं.] डझन; बारा वस्तूंचा समूह. [श्रेणी; वर्ग. ३ हुद्दा.

**दर्जा**—पु. [अ.] १ पद; दर्जा. २

**दर्जी**-पु. [फा.] शिंपी.

**दर्द**-पु. [फा.] १ दुःख; पीडा. २ दया; करुणा. (मु.) **दर्द खाना**—दया दाखविणें.

**दर्दनाक**-वि. [फा.] करुणाजनक.

**दर्दमंद**—वि. [फा.] १ दुःखी; पीडित. २ दयाळू.

**दर्रा**-पु. [फा.] १ डोंगरांतील दरी. २ डोंगरामधील अरुंद वाट; घाट.

**दर्राना**-क्रि. अ. [अनु.] बेधडक निघून जाणें.

**दल**-पु. १ पान; दळ. २ फुलाची पाकळी. ३ तमालपत्र. ४ समूह ५ फौज; सैन्य. ६ गट; पक्ष.

**दलक**-स्त्री. [अ.] गोधडी.

**दलक**-स्त्री. १ आघातामुळें उत्पन्न झालेला कंप. २ ठणका; ठसठस. **दलकन**-स्त्री. १ कंप; थरकांप. २ आघात.

**दलकना**-क्रि. अ. १ भेग पडणें; फाटणें. २ सावध होणें. ३ त्रासणें. ४ थरकांप होणें. क्रि. स. भिवविणें.

**दलदल**-स्त्री. दलदल. **दलदला**—वि. दलदलीची.

**दलना**-क्रि. स. १ दळणें. २ वाटणें. ३ चेंदामेंदा करणें; चिरडणें. ४ मळणें. [संघटना

**दलबंदी**—स्त्री. [सं. + फा.] पक्ष-

**दलबल**—पु. फौजफाटा. [भांडण.

**दलबाजी**—[सं. + फा.] पक्षबाजी;

**बानैत**–पु· १ बोथाटी फिरविणारा. २ तिरंदाज. ३ योद्धा.

**बापिका***–स्त्री· मोठी विहीर.

**बापुरा**—वि· १ साधारण; तुच्छ. २ गरीब; बापुडा.

**बाब**—पु· [अ·] १ प्रकरण; परिच्छेद. २ दरवाजा.

**बाबत**—स्त्री· [फा.] १ संबंध. २ विषय. अव्य. संबंधीं; विषयीं.

**बाबी**–स्त्री· १ संन्यासिनी; योगिनी. २ लहान मुलांबद्दल प्रेमसूचक शब्द.

**बाबुल**—पु· बाप; बाबू.

**बाम**—पु· [ फा. ] गच्ची; छत.

**बायँ–याँ**—वि· १ डावा; वाम. २ अुलट; विरुद्ध. पु· डग्गा (डाव्या हातानें वाजवावायाचा तबला).

**बाय***–पु· वारा.

**बायकाट**–पु· [अिं.] बहिष्कार.

**बायें**—क्रि· वि· १ डावीकडे २ विरुद्ध; अुलट. (मु.) **बायें हाथका खेल**–हातचा मळ; सोपी गोष्ट.

**बारंबार**-क्रि·वि·वारंवार; पुनः पुनः.

**बार**–पु· १ द्वार. २ आश्रयस्थान. ३ दरबार.

**बार**–स्त्री·१ वेळ; समय. २ अुशीर; विलंब. ३ वेळ; खेप. (मु.) **बारबार**–पुन्हां पुन्हां.

**बार**–पु· [ फा. ] ओझें; बोजा.

**बारगह–गाह** स्त्री· [फा.] १ डेरा; तंबू. २ दरबार.

**बारदाना**–पु· [ फा. ] १ पोतें. २ सैन्याच्या खाण्यापिण्याची सामग्री; रसद.

**बारना**–क्रि· स· पेटविणें.

**बारना**–क्रि· स· १ निवारण करणें. २ मनाअी करणें.

**बारबधू**–स्त्री· वेश्या; नायकीण.

**बारबर्दार**–पु· [फा.] हमाल; मजूर. **बारबर्दारी**–स्त्री· १ हमाली, मजुरी. २ हमालाचें काम. [ पुनः.

**बारबार**–क्रि· वि· वारंवार. पुनः

**बारह**–वि· बारा. **बारहखडी**–स्त्री· बाराखडी.

**बारहदरी** – स्त्री· [ सं· + फा. ] मोकळी हवेशीर बैठक.

**बारहबाना–नी**—वि· १ दैदीप्यमान. २ खरें ( सोनें ).

**बारहमासी**–वि·१ बारा महिने फुलणारें. २ बारा महिने होणारें.

**बारह–वफ़ात**–स्त्री· [फा.] महंमद पैगंबरांच्या मृत्यूपूर्वीचे बारा दिवस.

**बारहासिंगा**–पु· सांबर. [नेहमीं.

**बारहा**–क्रि· वि· [फा ] वारंवार;

**बारही**–स्त्री· बारसें.

**बारहीं** पु. १ बारावा दिवस ( मरणानंतरचा ).२ जन्मानंतरचा बारावा दिवस.
**बाराँ**–पु. [फा.] मेघ; ढग.
**बारा**–वि. बालक. पु. मुलगा.
**बारात**–स्त्री. वरात.
**बारानी**–वि. [फा.] कोरडवाहू; जिराअीत (जमीन). [ रेन-कोट.
**बारानी**–पु. [फा.] पावसाळी कोट;
**बारिश**–स्त्री. [फा.] १ पाअूस; वृष्टि. २ वर्षा ऋतु. [ समास; मार्जिन.
**बारी**–स्त्री. १ किनारा; तट. २
**बारी**–स्त्री. १ बाग; बगीचा; २ घर; निवास. ३ खिडकी; झरोका. ४ बंदर. पु. पत्रावळी, द्रोण अि. विकणारी जात; गुरव.
**बारी**—स्त्री. पाळी; खेप. (मु.) **बारीबारी से**–पाळीपाळीनें.**बारी बंधना**–पाळी ठरणें. [ तरुणी.
**बारी**––स्त्री. १ अबोध कन्या. २
**बारी**–पु. [ अ. ] अीश्वर.
**बारीक**–वि. [फा.] १ बारीक; पातळ. २ लहान; सूक्ष्म. ३ कौशल्यपूर्ण.
**बारीकी**–स्त्री. [ फा. ] १ खुबी; मखली. २बारीकपणा. ३सूक्ष्मपणा.
**बारू**–पु. रेती; वाळू.
**बारूत–द**-स्त्री. [तु.]दारू. (मु.) **गोला बारूद**-लढाअीची सामग्री; दारूगोळा.
**बारे**––क्रि. वि. [ फा. ] शेवटीं; अखेरीस. [ विषयीं.
**बारेमें**–अव्य. [ फा. + सं.] संबंधीं;
**बाल**–पु. केंस. (मु.) **नहाते बाल न खिसकना** किंवा **बाल बाँका न होना**–यत्किंचित्‌हि हानि किंवा कष्ट न होणें. **बाल बाल बचना**-थोडक्यांत बचावणें(संकटां-तून). [बच्चा. वि.अबोध; अजाण.
**बाल**—पु. १ बालक. २ जनावरांचा
**बालखोरा**–पु. [ फा. ] टक्कल.
**बालछड**—स्त्री. [दे.] जटामांसी ( अेक औषधी ).
**बालटी**—स्त्री. [ अिं. ]बादली.
**बालतोड**—पु.केसतोडा. [पेटाविणें.
**बालना**–क्रि. स. दिवा लावणें;
**बालभोग**–पु. नैवेद्य.
**बालम**–पु. १ पति. २ प्रियकर.
**बालमखीरा**–पु. काकडी.
**बाला**–वि. [ फा. ] वरील; वरचा. क्रि. वि. वर; वरती. (मु.) **बोलबाला रहना**–वाहवा होणें; प्रसिद्धि होणें.
**बाला** —स्त्री. १तरुण स्त्री. २पत्नी; भार्या. ३ स्त्री. ४ लहान मुलगी. ५ हातांत घालावयाचें कडें.

**बालाअी**–*वि.*[फा.] वरचा; वरील. *स्त्री.* मलअी; दुधावरील साय.
**बालाख़ाना**-*पु.*[फा.]बैठकीची माडी.
**बालाबाला**–*क्रि. वि* [फा.] वरवर.
**बालिग़**–*वि.* [अ.] वयांत आलेला.
**बालिश**–*स्त्री.* [फा.] तक्क्या; अुशी.
**बालिश्त**–*स्त्री.* [फा.] वीत (माप).
**बालीन**–*पु.* [फा.] अुशी.
**बालू** – *पु.* रेती; वाळू. **बालूदानी**–*स्त्री.* रेतीदाणी; वाळूदाणी.
**बालूसाही**-*स्त्री.*[फा.]अेक मिठाअी.
**बावन**–*पु.* बावन (५२).
**बावर्ची**–*पु.*[तु.] आचारी; बबर्जी.
**बावर्चीख़ाना**–*पु.* [तु. + फा.] स्वयंपाकघर.
**बावरा-बावला**–*वि.* १ बावळट; अजागळ. २वेडा;वेडपट. **बावलापन**–*पु.* बावळटपणा; वेडेपणा.
**बावली**–*स्त्री.* पायाविहीर; बावडी.
**बाश**–अव्य. [फा.] तथास्तु. **खुश-बाश**–सुखी अैस.
**बाशिंदा**—*पु.* [फा.] निवासी; रहिवासी.
**बास**–*पु.* वस्त्र. [वस्त्र.
**बास**–*स्त्री.* १ अग्नि. २ अेक प्रकारचें
**बास**–*स्त्री.* १निवास;वास. २ निवासस्थान; घर. ३ वास; गंध.
**बास**-*स्त्री.* वासना; अिच्छा.
**बासन**–*पु.* भांडें.
**बासर**–*पु.* दिवस.
**बासा**–*पु.* १ खानावळ. २ निवासस्थान.
**बासी**–*वि.* शिळेंपाकें, (मु.) **बासी कढी में अुबाल आना**–शिळ्या कढीस अूत येणें; म्हातारपणीं डोहाळे लागणें.
**बाहना**–*क्रि. स.* १ वाहून नेणें; ओझें नेणें. २ चालविणें (हत्यार); फेंकणें. ३ गाडी, घोडे हांकणें. ४ वाहणें (द्रव). ५ नांगरणें.
**बाहम**–*क्रि. वि.* (फा.) आपसांत; परस्पर. २ साथ; सहित.
**बाहर**–*क्रि. वि.* बाहेर. **बाहरी**–*वि.* १ बाहेरील. २ परका. ३ वरपांगी; वरवरचा.
**बाहरजामी**–*पु.* सगुणरूप.
**बाहिज***–*वि.* बाहेरील; वरवरचा.
**बाहीं**–*स्त्री.* १ बाहु. २ बाही.
**बिंजन***–*पु.* खाद्य वस्तु.
**बिंद***–*पु.*१ पाण्याचा थेंब. २ दोन भुंवयांमधील जागा. ३ टिकली.
**बिंदी**–*स्त्री.* १ अनुस्वार; बिंदु. २ टिकली. **बिंदुली**–*स्त्री.* टिकली.
**बिंधना**–*क्रि. अ.* १ भोंक पडणें. २ फसणें; अडकणें.
**बिआना**–*क्रि. अ.* विणें (पशु).
**बिकना, बिकाना**–*क्रि. अ.* विक्री होणें. (मु.) **किसी के हाथ**

**बिकना**–अेखाद्याचा सेवक बनणें.
**बिकवाना**–*क्रि. स.* विकविणें.
**बिकसना**–क्रि. अ. १ विकसणें; फुलणें. २ प्रफुल्लित होणें.
**बिकसाना**–*क्रि. स.* १ विकसविणें; फुलविणें. २ प्रसन्न करणें.
**बिकाअू**–*वि.* विकाअू.
**बिकार***—*पु.* १ विकार. २ रोग; पीडा. ३ दोष. ४ दुष्कृत्य. ५ दुर्वासना. [मिळणारें धन.
**बिक्री**—*स्त्री.* १ विक्री. २ विकून
**बिखरना**–*क्रि.अ.* विखुरणें; पसरणें.
**बिखराना, बिखेरना**—*क्रि. स.* विखुरविणें; पसरविणें.
**बिगखना**—*क्रि. अ.* १ बिघडणें. २ रागावणें; संतापणें. [कुमार्गी.
**बिगडेदिल**—*पु.* १ भांडखोर. २
**बिगडैल**—*वि.* १ तापट; संतापी. २ हट्टी; दुराग्रही. [लणें; फुलणें.
**बिगसना***–*क्रि.अ.* विकसणें; उम-
**बिगहा**—*पु.* बिघा.
**बिगाड, बिगार**-*पु.* १ दोष;खराबी. २ वैमनस्य; झगडा.
**बिगाडना**–*क्रि. स.* १ बिघडविणें. २ हानि करणें; तोटा करणें.
**बिगारी***–*स्त्री.* [फा.] १ बिगार; मजुरी न देतां घेतलेलें काम. २ निष्काळजीपणानें केलेलें काम.
**बिगास***—*पु.* विकास. [शिवाय.
**बिगिर***—*क्रि.वि.* [अ.] बिना;
**बिगुन***—*वि.* ठोंब्या; मूर्ख.
**बिगुरचिन***—*स्त्री.* १ बुचकळा; विवंचना. २ अडचण.
**बिगुरदा***–*पु.* [दे.] अेक प्रकारचें प्राचीन हत्यार.
**बिगोना**—*क्रि. स.* १ नाश करणें; बिघडविणें. २ लपविणें. ३ त्रास देणें. ४ भुलविणें. ५ कंठणें; घालवणें.
**बिचकाना**—*क्रि. अ.* [अनु.] १ चिडविणें; वेंगाडणें. २ तोंड वेडें-वाकडें करणें (बेचव पदार्थामुळें).
**बिचमों**—अव्य. मध्यें; आंत.
**बिचरना**–*क्रि. अ.* १ फिरणें; सहल करणें. २ यात्रा; प्रवास करणें.
**बिचलना**–*क्रि.अ.* १ विचलित होणें. २ हिम्मत खचणें.
**बिचला**—*वि.* मधला.
**बिचलाना**—*क्रि. स.* १ विचलित करणें. २ अव्यवस्थित करणें.
**बिचवान–नी** — *पु.* मध्यस्थ (सलोखा घडवून आणण्यासाठीं).
**बिचहुत**— *पु.* संदेह; द्विविधा मनःस्थिति.
**बिचार**—*पु.* विचार.
**बिचारना***—*क्रि. अ.* १ विचार करणें. २ विचारणें; प्रश्न करणें.

**बिचारी**-विचारी;समजूतदार. [अतर
**बिचाल**-पु· १अलग करणें. २ फरक;
**बिचेत***—वि· मूर्छित; बेशुद्ध.
**बिच्छू**—पु.१ विंचू.२ विषारी गवत.
**बिछना**—क्रि· अ· पसरलें जाणें.
**बिछलना**—क्रि·अ· घसरणें; सरकणें.
**बिछवाना**-क्रि· स· पसरवून घेणें; आंथरविणें.
**बिछाना**—क्रि· स· १ पसरविणें; फैलाविणें ( बिछाअीत ). २ लोळ-वणें ( मारून ). [३ करगोटा.
**बिछुआ**—पु· १ बिचवा. २ जोडवीं.
**बिछुडना**—क्रि· अ· १ वेगळें होणें; अलग होणें. २ वियोग किंवा विरह होणें. [विरह.
**बिछोडा, बिछोय**—ह—पु· वियोग;
**बिछौना**—पु· बिछाना; अंथरूण.
**बिज़न**—पु· [फा.] सरसहा कत्तल.
**बिजन***—पु· लहान पंखा.
**बिजन**—पु· अेकांत. **बिजन**—वि· अेकटा; अेकाकी.
**बिजली, बिजुरी; बिज्जु***-स्त्री· १ वीज. २ गळ्यांतला किंवा कानांतला दागिना. वि· १ चंचल; चपळ. २ चमकदार.
**बिजाती**—वि· विजाती; परजातीचा.
**बिजान***—पु· अज्ञान.
**बिजूका—खा**—पु· [ दे. ] पक्ष्यांना हुसकून लावण्याकरितां शेतांत टांगून ठेवतात तें मडकें; बुजगावणें.
**बिजोग***-पु· वियोग. [अशक्त.
**बिजोरा**—वि· [सं· + फा.] दुबळा;
**बिज्जुल**-पु· साल; टरफल.
**बिज्जू**-पु· [ दे. ] अूद; रानमांजर.
**बिझुकना**—क्रि· अ· १ भडकणें; चेतणें. २ भिणें; भयभीत होणें. ३ वांकणें; वांकडें होणें.
**बिझुकाना**—क्रि· स· भिवविणें.
**बिटिया**—स्त्री· मुलगी; बेटी.
**बिठलाना-बिठाना**—क्रि·स·बसाविणें.
**बिडर**—वि· विस्कटलेला.
**बिडर**—वि· बेडर; निर्भय.
**बिडरना**—क्रि· अ· १ अस्ताव्यस्त होणें; विस्काळित होणें. २ बुजणें; बिचकणें. ३ नष्ट होणें.
**बिडराना**—क्रि· स· १ विस्कटून टाकणें; अुधळून टाकणें. २पळविणें.
**बिडारना**—क्रि· स·बुजविणें; पळवून लावणें.
**बिडवना***—क्रि· स· तोडणें.
**बिढता**-पु· नफा; फायदा.
**बिढवना, बिढाना**—क्रि· स· १ कमाविणें; मिळविणें. २ संचय करणें; जमविणें.
**बित, बित्त**—पु· १ धन; द्रव्य. २ सामर्थ्य. ३ अुंची; ठेवण.

**बितरना**–क्रि. स. वांटणें.
**बिताना**–क्रि. स. १ समय व्यतीत करणें; कालक्रमण करणें. २ घालविणें.
**बित्त**–पु. पाहा ' बित. '
**बित्ता**–पु. [?] अेक वीत (माप).
**बिथकना**–क्रि. अ. १ थकणें. २ आश्चर्यचकित होणें. ३ मोहून जाणें.
**बिथरना**–क्रि. अ. विखुरणें.
**बिथा***–स्त्री. व्यथा; दुःख.
**बिथित**–वि. व्यथित.
**बिदकना**–क्रि. अ. १ फाटणें; चिरलें जाणें. २ घायाळ होणें; जखमी होणें. ३ बुजणें.
**बिदकाना**–क्रि. स. १ फाडणें. २ कापणें; चिरणें. ३ जखमा करणें.
**बिदर**–पु. विदर्भ देश.
**बिदा**–स्त्री. [अ.] १ निरोप; रजा. २ प्रस्थान. **बिदाअी**–स्त्री. रवानगी; निरोप. [२ नष्ट करणें.
**बिदारना**–क्रि. स. १ फाडणें; चिरणें.
**बिदुराना***–क्रि. अ. गालांतल्या गालांत हंसणें; स्मित करणें. **बिदुरानी**–स्त्री. हास्य; स्मित.
**बिदून**–अव्य. [फा.] खेरीज; शिवाय.
**बिदूषना**–क्रि. अ. दोष लावणें; दूषण देणें.
**बिदोख***–पु. वैमनस्य; वैर.
**बिद्दत**–स्त्री. [अ.] १ बिघाड; दोष. २ त्रास; दुःख. ३ आपत्ति संकट. ४ जुलूम; अत्याचार. ५ दुर्दशा.
**बिद्रुम**–पु. पोवळें; पवाळ.
**बिधँसना***–क्रि. स. विध्वंस करणें.
**बिध***–स्त्री. प्रकार.
**बिधना**–पु. ब्रह्मदेव; विधाता.
**बिन-नि-नु***–अव्य. शिवाय; विना.
**बिनअी***–पु. १ नम्र. २ विनंती करणारा.
**बिनअु***–स्त्री. विनय; विनंती.
**बिनति-ती**–स्त्री. विनंती; अर्ज.
**बिनना**–क्रि. स. १ निवडणें २ वेंचणें. **बिनन**–स्त्री. निवड; वेंचणी.
**बिनवना***–क्रि. अ. विनविणें; प्रार्थना करणें. [नष्ट करणें.
**बिनसना***–क्रि. अ. नष्ट होणें. क्रि. स.
**बिनसाना**–क्रि. स. बिघडवून टाकणें; नष्ट करणें.
**बिना**–अव्य. शिवाय. [वेंचणी.
**बिनाअी**–स्त्री. १ विणकाम. २ निवड;
**बिनानी***–वि. अज्ञानी; अजाण.
**बिनावट**–स्त्री. वीण.
**बिनासना**–क्रि. स. नाश करणें.
**बिनूठा***–वि. विलक्षण; चमत्कारिक.
**बिनौला**–पु. [?] सरकी.
**बिपच्छी**–पु. १ प्रतिपक्षाचा; विरोधी. २ शत्रु; वैरी.
**बिपत-द-दा***–स्त्री. विपत्ति; संकट.

**बिपर***--पु. विप्र; ब्राह्मण.
**बिफर***–वि. निष्फळ; व्यर्थ
**बिफरना***–क्रि. अ. १ बंड करणें. २ नाराज होणें; रागावणें.
**बिचछना***–क्रि.अ. विरोधी बनणें.
**बिबरन***–वि. १ रंग अुडालेला. २ निस्तेज;ज्याची चेहऱ्याची कांति नाहींशी झाली आहे असा.
**बिबिस***—वि. विवश; लाचार; परतंत्र. क्रि. वि. निरुपायानें.
**बिवहार***–पु. व्यवहार. [ पडणें.
**बिबाअी**—स्त्री. तळपायास चिरा
**बिबि***–वि. दोन. [ विमनस्क.
**बिमन***–वि. १ दुःखी. २ अुदास;
**बिमोहना**–क्रि. स. मोहून टाकणें; विमोहणें.
**बिय***–वि. १ दोन. २ दुसरा.
**बियाधा***–पु. पारधी.
**बियाधि***–स्त्री. व्याधि; पीडा.
**बियापना***–क्रि. स. व्यापणें.
**बियाबान**—पु. [फा.] १ ओसाड जागा. २ जंगल. ३ वाळवंट.
**बियारी, बियालू***—पु. रात्रीचें जेवण; फराळ.
**बियाह**–पु. विवाह; लग्न.
**बिरछ-रिछ***–पु. वृक्ष.
**बिरछिक***–पु. वृश्चिक; विंचू.
**बिरतत***–पु. वृत्तान्त; हकीकत.
**बिरताना***—क्रि. स. वांटणें; विभाग करणें.
**बिरथा**—क्रि. वि. वृथा; व्यर्थ.
**बिरदैत**—पु. विख्यात योद्धा. वि. विख्यात.
**बिरध-रिध***—वि. वृद्ध.
**बिरमना**–क्रि. अ. १ थांबणें. २ आराम करणें. [ टाकणें.
**बिरमाना**-क्रि.स.थांबविणें. २ मोहून
**बिरला**—वि. विरळा; अेखादाच.
**बिरही**—पु. विरही. [ सीनता.
**बिराग**–पु. वैराग्य; विरक्ति; अुदा-
**बिराजना**—क्रि. अ. १ शोभणें; विराजणें. २ बसणें.
**बिरादर**–पु. [फा.] भाअू (अनेक); भाअूबंद. **बिरादरी**–स्त्री.भाअूबंद; आप्तेष्ट.
**बिरान-ना***–वि. [फा.] १ परका. २ अपरिचित. ३ दुसऱ्याचा.
**बिरिया**—स्त्री. १ वेळ; समय. २ खेप; पाळी; वेळ.
**बिरी***—स्त्री. १ विडा. २ विडी.
**बिरुझना**–क्रि. अ. रागावणें; संतापणें. [ प्रतिज्ञा.
**बिरुद**—पु. १ प्रशंसा. २ ब्रीद;
**बिरुदावली**–स्त्री. प्रशंसा (अनेक). पदकें. [पु. प्रतिज्ञावाला; शूर वीर.
**बिरुदैत**—वि. विख्यात; प्रसिद्ध.

**बिल**–पु. १ बीळ; विवर. २ भुयार. ३ गुन्हा.
**बिलकुल**–क्रि. वि. [अ.] १ संपूर्ण; अेकंदर. २ सुरुवातीपासून शेवटपर्यंत. ३ अगदीं; बिलकुल.
**बिलखना**–क्रि. अ. १ दुःखी होणें. २ विलाप करणें; आक्रोश करणें. ३ संकोच पावणें; आक्रसणें.
**बिलग**–वि. विलग; वेगळा. **बिलग**–पु. वेगळेपणा.
**बिलगाना**—क्रि. अ. वेगळें होणें. क्रि. स. १ वेगळें करणें. २ निवडणें.
**बिलटना**–क्रि. अ. अुलटणें; अुपडें होणें.
**बिलटी**—स्त्री. पार्सल पाठविल्याची [रेल्वेरसीद; इनव्हॉइस; बीजक.
**बिलनी**–स्त्री. रांजणवाडी, (डोळयावरील फोड). [(किडा).
**बिलनी**—स्त्री. भ्रमरी; कुंभारीण
**बिलपना***–क्रि. अ. विलाप करणें.
**बिलफेल**—क्रि. वि. [अ.] सध्यां; यावेळीं.
**बिलबिलाना**—क्रि. अ. [अनु.] १ वळवळणें (किड्यांचें). २ आक्रोश करणें.
**बिलम**—पु. अुशीर; विलंब.
**बिलमना**–क्रि. स. १ अुशीर करणें. २ थांबणें. ३ प्रेमबद्ध होणें.
**बिलमाना**–क्रि. स. प्रेमामुळें अेकाद्यास जाअूं न देणें.
**बिलसना**—क्रि. अ. शोभणें. क्रि. स. अुपभोग घेणें.
**बिललाना**–क्रि. अ. पाहा 'बिलखना'.
**बिलसाना***–क्रि. स. १ अुपभोग घेणें. २ अुपभोग घ्यावयास लावणें.
**बिलहरा**—पु. पानांचा करंडा.
**बिला**–अव्य. [अ.] विना; खेरीज.
**बिलाअी**—स्त्री. १ मांजर. २ गळ (पोहरा काढण्याचा). ३ दाराची खिटी. [२ अदृश्य होणें.
**बिलाना**—क्रि. अ. १ नाश पावणें.
**बिलायत**—स्त्री. [अ.] विलायत; परदेश.
**बिलारी**—स्त्री. मांजरी
**बिलाव**—पु. बोका; रानमांजर.
**बिलासना**–क्रि. स. अुपभोग घेणें.
**बिलैया**—स्त्री. मांजर.
**बिलोडना**—क्रि. स. १ घुसळणें (दूध, दहीं अि.). २ अस्ताव्यस्त करणें; विस्कटणें.
**बिलोन**–वि. १ आळणी. २ कुरूप.
**बिलोना**–क्रि. स. १ घुसळणें. २ मिसळणें; ढवळणें. ३ ओतणें
**बिलोल**—वि. चंचल. [होणें.
**बिलोलना**–क्रि. अ. हलणें; विचलित
**बिल्ला**—पु. बिल्ला; पट्टा.

**बिल्ला**—पु· बोका. **बिल्ली**—स्त्री· १ मांजर. २ दाराची खिटी.
**बिल्लौर**—पु· १ स्फटिक. २ बिलोरी आरसा. ३ स्वच्छ कांच. **बिल्लौरी**—वि· बिलोरी.
**बिवराना**—क्रि· स· केसांचा गुंता सोडविणें; गुंतावळ काढणें.
**बिसंच**✻—पु· १ वस्तूंची निगा न ठेवणें; निष्काळजीपणा. २ कार्य-नाश. ३ भय. [ विषारी प्राणी.
**बिसखपरा**—पु· घोरपडीसारखा
**बिसमिल, बिस्मिल**—वि· [फा.] घायाळ; जखमी.
**बिसमिल्ला**—पु· [अ.] अीश्वराच्या नांवानें (प्रत्येक कार्यारंभीं मुसलमान लोक याचा अुच्चार करितात).
**बिसरना**—क्रि· स· विसरणें.
**बिसरात**—पु· खेचर. [पाडणें.
**बिसराना**—क्रि· स· विसरणें; विसर
**बिसवासी**✻—वि· विश्वास ठेवण्यास पात्र; विश्वासू.
**बिसवासी**✻—वि· विश्वास ठेवण्यास अपात्र; अविश्वासू.
**बिससना**✻—क्रि· स· विश्वास ठेवणें.
**बिससना**—क्रि· स· १ वध करणें; मारणें. २ शरीराचे तुकडे तुकडे करणें. [ विकत घेणें.
**बिसहना, बेसहना**✻—क्रि· स·
**बिसात**—स्त्री· [अ.] अंथरण्याची वस्तु (चटअी, सतरंजी अि.). २ बुद्धिबळाचा किंवा सोंगट्याचा कागदी अथवा कापडी पट. ३ सामर्थ्य; दर्जा. ४ जमा; दौलत. ५ शक्ति; ताकत. ६ भांडवल.
**बिसाती**—पु· [अ.] स्टेशनरी माल विकणारा दुकानदार.
**बिसास**✻—पु· विश्वास.
**बिसासी**✻—वि· अविश्वासू; दगा-बाज; कपटी. **बिसासिन**—स्त्री·
**बिसाहना**—क्रि· स· खरेदी करणें; विकत घेणें. पु· विकत घेतलेली वस्तु; सामान. [केलेली वस्तु
**बिसाहनी**—स्त्री· सौदा; खरेदी
**बिसिख**✻—पु· बाण.
**बिसियर**—वि· विषारी.
**बिसूरना**—क्रि· अ· खेद करणें स्त्री· चिंता; काळजी. [स्त्री· विशेषता.
**बिसेख**✻—वि· विशेष. **बिसेखता**—
**बिसेखना**✻—क्रि· अ· १ विस्तार-पूर्वक वर्णन करणें. २ निर्णय करणें.
**बिसेसर**✻—पु· विश्वेश्वर.
**बिस्तर**—पु· बिछाना; अंथरुण.
**बिस्तरना**✻—क्रि· स· विस्तार करणें; फैलावणें. क्रि· अ· फैलणें.
**बिस्तुअिया**—स्त्री· पाल.

**बिस्वा**–पु. बिघ्याचा विसावा भाग. (मु.) **बीसबिस्वा**—निःसंशय; नक्की.

**बिस्वास**—पु. विश्वास.

**बिहंग, बिहग**–पु. विहंग; पक्षी.

**बिहंडना**—क्रि. स. १ तुकडे तुकडे करणें. २ नष्ट करणें.

**बिहँसना**—क्रि. अ. हंसणें.

**बिहँसाना**—क्रि. अ. १ मंदस्मित करणें. २ प्रफुल्लित होणें. ३ फुलणें; खिलणें (फूल) क्रि. स. हंसविणें; खुष करणें.

**बिहद्द***—वि. [फा.] बेहद्द; अपरिमित. [बेचैन.

**बिहबल***–वि. व्याकुळ; अस्वस्थ,

**बिहरना**—क्रि. अ. सहल करणें; फिरावयास जाणें. [होणें.

**बिहरना**–क्रि. अ. फाटणें; विदीर्ण

**बिहराना***—क्रि. स. फाडणें.

**बिहान**–पु. १ प्रभात; सकाळ. २ उद्यां.

**बिहाना***–क्रि. स. सोडणें; त्यागणें. क्रि. अ. कंठणें; व्यतीत करणें.

**बिहारना**—क्रि. अ. विहार करणें; क्रीडा करणें; खेळणें.

**बिहाल**—वि. [फा.] १ अस्वस्थ; बेचैन. २ हलाखीच्या स्थितींत असलेला.

**बिहिश्त**–पु. [फा.] स्वर्ग.

**बिही**—स्त्री. [फा.] पेरूसारखें अेक फळ किंवा झाड. **बिहीदाना**–पु. अेक औषधी बीज. [विना.

**बिहीन, बिहून**–वि. विहीन; रहित;

**बिहुरना, बिहोरना***—क्रि. अ. सोडणें; त्यागणें; टाकणें.

**बींधना, बीधना***–क्रि. अ. १ अडकणें २ छेद होणें. क्रि. स. छेद करणें; वेध करणें.

**बी**—स्त्री. पाहा 'बीबी'.

**बीघा**—पु. बिघा.

**बीच**—पु. मध्यभाग. (मु.) **बीच करना**–भांडण सोडविणें; मध्यस्थी करणें. **बीच पडना**–अंतर पडणें. **बीच में पडना**–मध्यस्थी होणें. **बीच-सकता** मध्यंतर; अिंटरव्हल. अव्य. मध्यें; आंत.

**बीच**—स्त्री. लाट; तरंग.

**बीचु***—पु. १ संधि; अवसर. २ अंतर; फरक.

**बीचोंबीच**–क्रि. वि. मधोमध.

**बीछना***–क्रि. स. निवडणे.

**बीछी***–स्त्री. विंचू. **बीछू**–पु. विंचू.

**बीजक**—पु. १ यादी. २ मालाची किंमत, माहिती वगैरेची यादी. ३ बीजक. ४ कबीराचा अेक पद्यसंग्रह

**बीजन***–पु. पंखा.

**बीजा**–वि. दुसरा.

**बीजी**–स्त्री॰ १ कोय. २ गीर.
**बीजु***–स्त्री॰ बीज.
**बीडा**–पु॰ विडा; तांबूल. (मु.) **बीडा अुठाना**–विडा अुचलणें; निश्चय करणें.
**बीडी**–स्त्री॰ १ विडी. २ विडा. ३ दांत घांसण्याची मिश्री; दांतवण.
**बीतना**–क्रि॰ अ॰ १ व्यतीत होणें; गुजरणें. २ दुःख कोसळणें.
**बीथित***–वि॰ व्यथित. दुःखी
**बीन**–स्त्री॰ वीणा; बीन; **बीनकार**–पु॰ बीन वाजविणारा. [डणें.
**बीनना**–क्रि॰ अ॰ १ वेचणें. २ निव-
**बीफै**–पु॰ गुरुवार.
**बीबी**–स्त्री॰ [फा.] १ पत्नी; बायको. २ मोठ्या घरची स्त्री. [दुष्ट.
**बीभत्स**–वि॰ १ किळसवाणें. २पापी;
**बीमा**–१ पु॰ [फा.] १ विमा. २ विमा अुतरविलेलें पत्र किंवा पार्सल वगैरे.
**बीमार**–वि॰ [फा.] रोगी; आजारी. **बीमारी**–स्त्री॰ १ आजार; रोग. २वाअीट संवय. ३ भानगड; बखेडा.
**बीमारदार**–वि॰ [फा.] रोग्याची सेवा शुश्रूषा करणारा. **बीमारदारी**– स्त्री॰ रोग्याची सेवाशुश्रूषा.
**बीय-या***–पु॰ बीं; बीज.
**बीय-या***–वि॰ दुसरा.
**बीरज***–पु॰ वीर्य; शक्ति.
**बीरन***–पु॰ भाअू. [माळी किडा.
**बीरबहूटी**–स्त्री॰ अेक लाल पाव-
**बीबी**–स्त्री॰ पाहा 'बीबी'
**बीस**–वि॰ १ वीस. २ अुत्तम; श्रेष्ठ. **बीसी**–स्त्री॰ विसाचा गट.
**बीहड**–वि॰ अुंच-सखल; खडबडीत. २ बिकट; अवघड. वि॰ अलग.
**बुँदकी**–स्त्री॰ १ टिकली. २ लहान. ठिपका; डाग.
**बुंदा**–पु॰ १ कानांत घालावयाचा दागिना (बुलक, डूल, लोलक अि.). २ कपाळाची टिकली.
**बुँदिया**–स्त्री॰ १थेंब. २बुंदी(पक्वान्न).
**बुआ**–स्त्री॰ [दे.] १ आत्या. २ वडील बहिण.
**बुकचा**–पु॰ [तु] गाठोडें. **बुकची**–स्त्री॰ १ पोटळी. २ सुअी, दोरा वगैरे ठेवण्याची शिंप्याची पिशवी.
**बुकनी**–स्त्री॰ [दे.] पूड; भुकटी.
**बुकन**–पु॰ [दे.] १ भुकटी; बुकणी. २ पाचक चूर्ण. [बुकणी.
**बुक्का**—पु॰ [दे.] अभ्रकाची पूड;
**बुखार**–पु॰ [अ.] १ ज्वर; ताप. २ वाफ. ३ शोक, क्रोध अित्यादींचा आवेग.
**बुज़**—स्त्री॰ शेळी; बकरी.
**बुज़ादिल**–वि॰ [फा.] भित्रा; भेकड. **बुज़दिली**–स्त्री॰ भ्याडपणा.

**बुजुर्ग**–*वि.* [फा.] १ वडील; वृद्ध, २ श्रेष्ठ. **बुजुर्गवार**–*वि.* श्रेष्ठ; वडीलधारें. **बुजुर्गी**-*स्त्री.* वडीलकी; मोठेपणा. [मंदावणें. ३ थंड पडणें.

**बुझना**–*क्रि. अ.* [?] १ विझणें. २

**बुझाना**––*क्रि. स.* १ विझविणें. २ शांत करणें. ३ समजाविणें. **बुझाअी**–*स्त्री.* विझाविण्याचें काम.

**बुडबुडाना**––*क्रि. अ.* [अनु.] पुटपुटणें; कुरकुरणें.

**बुढाअी**—*स्त्री.* म्हातारपण.

**बुढाना**–*क्रि. अ.* म्हातारपण येणें; वृद्ध होणें.

**बुढापा**—*पु.* म्हातारपण.

**बुढौती**-*स्त्री.* वृद्धत्व. म्हातारपण.

**बुत**–*पु.* [फा.] १ मूर्ति; प्रतिमा. २ प्रेमिका; प्रेयसी. ३ बुभ्या. ४ मूर्ख.

**बुतपरस्त**–*पु.* [फा.] मूर्तिपूजक. **बुतपरस्ती**–*स्त्री.* मूर्तिपूजा.

**बुतकदा**—*पु.* [फा.] देअूळ. २ प्रेमिकेचें निवासस्थान.

**बुतखाना**—*पु.* [फा.] १ मंदिर. २ प्रेमिकेचें निवासस्थान. [भंजक.

**बुत-शिकन**––*वि.* [फा.] मूर्ति-

**बुत्ता**--*पु.* [दे.] १ फसवणूक; लबाडी. २ बहाणा; ढोंग; आव.

**बुद्धू**–*वि.* मूर्ख; बावळट;

**बुधि*** *स्त्री.* बुद्धि.

**बुन**–*पु.* [अ.] १ कॉफीचें बीं. २ झाडाचें मूळ.

**बुनना**–*क्रि. स.* विणणें **बुनाअी**–*स्त्री.* १ विणकाम. २ विणण्याची मजुरी. [घेणें.

**बुनवाना–बुनाना**–*क्रि. स.* विणवून

**बुनावट**–*स्त्री.* वीण.

**बुनियाद**––*स्त्री.* [फा.] १ पाया; मूळ. २ अस्सलपणा; वास्तविकता. (यौ) **बुनियादी तालीम**– *स्त्री.* मूलोद्योगी शिक्षण.

**बुबुकना**–*क्रि. स.* [अनु.] ओक्साबोक्शीं रडणें; हंबरडा फोडणें. **बुबुकारी**–*स्त्री.* आक्रोश; हंबरडा.

**बुरकना**–*क्रि. स.* [अनु.] भुरभुरणें; हलक्या हातानें थोडी थोडी पसरणें (पूड वगैरे).

**बुरका, बुर्क़ा**–*पु.* [अ.] बुरखा.

**बुरा**–*वि.* वाअीट; निकृष्ट. (मु.) **बुरा मानना**–१ वाअीट मानणें; राग मानणें. २ द्वेष करणें. (यौ.) **बुराभला**–१ हानिलाभ. २ शिवीगाळ.

**बुराअी**–*स्त्री.* १ वाअीटपणा. २ दोष; दुर्गुण. ३ निंदा.

**बुरादा**–*पु.* [फा.] १ लांकडाचा भुसा. २ चूर्ण; चुरा.

**बुर्क़ा**–*पु.* पाहा 'बुरका'.

**बुर्ज**–पु· [अ·] १ बुरूज. २ घुमट.
**बुर्द**–स्त्री· [फा.] १ वरची मिळकत. २ पैज. ३ बुर्जी (बुद्धिबळांतील).
**बुलंद**–वि· [फा.] १ उंच. २ श्रेष्ठ.
**बुलबुल**–स्त्री· [अ·] अेक पक्षी. (बुलबुल).
**बुलबुला**–पु· बुडबुडा.
**बुलाक**–स्त्री· [तु.] लोलक.
**बुलाना**–क्रि· स· १ बोलाविणें. २ हांक मारणें. ३ बोलावयास लावणें.
**बुलावा**–पु· निमंत्रण; बोलावणें.
**बुलेटिन**–पु· [अि.] पत्रक.
**बुवा**—स्त्री· पाहा 'बुआ'.
**बुहारना**—क्रि· स· झाडणें; केर काढणें. **बुहारी**-स्त्री·झाडू;केरसुणी.
**बूँद**–स्त्री· थेंब; बिंदु. (मु.) **बूँदें गिरना** अथवा **पडना**–झिमझिम पाऊस पाडणें. **बूँदाबांदी**–स्त्री· पावसाची बुरबुर. [साचे थेंब.
**बूँदी**–स्त्री· १ बुंदी पक्वान्न. २ पाव-
**बू**—स्त्री· [फा.] १ वास; गंध. २ दुर्गंध; घाण. [२ मोठी बहीण.
**बूआ**—स्त्री· [दे.] १ आत्या.
**बूकना**–क्रि· सं· [दे.] १ पूड करणें. २ बोलण्यात अुसनी अैट आणणें.
**बूचड**- पु· [अि.] कसाअी; खाटीक.
**बूचडखाना**—पु· [अि. + फा.] कसाअीखाना. [विद्रूप. ३ बुचा.
**बूचा**-वि· १ कान कापलेला. २
**बूजना**–क्रि· स· [?] धोका देणें; फसविणें. [२ कोडें.
**बूझ**-स्त्री· १ अक्कल; बुद्धि; ज्ञान.
**बूझना** क्रि·स· १ जाणणें; समजणें. २ विचारणें.
**बूट**–पु· १ डहाळा (हरभऱ्याचा). २ हरभऱ्याचा दाणा; घाटा.
**बूट**—पु· [अि.] बूट (पायांत घालण्याचा).
**बूटा**–पु· १ रोपटें. २ वेलबुट्टी.
**बूटी**–स्त्री· १ वनस्पति. २ वेलबुट्टी.
**बूढा**—पु· म्हातारा; बुड्ढा.
**बूता**–पु· कुवत; शक्ति.
**बूदोबाश**–स्त्री· [फा.] राहाणी-करणी; निवास.
**बूरा**–पु· १ पिठीसाखर. २ पूड.
**बृहत्**—वि· मोठा. **बृहत्तर**–वि· अधिक मोठा.
**बेगँ**—पु· बेडूक.
**बेंच**—स्त्री· [अि.] बाक.
**बेंट-ठ**–स्त्री· [दे.] १ लांकडी मूठ. २ दस्ता.
**बेंत**–पु· १ वेत. २ वेताची छडी.
**बेंदा**—पु· १ टिळा. २ टिकली. ३ बिंदी.

**बे**–अव्य. [ फा. ] विना; खेरीज. निषेधसूचक उपसर्ग.
**बे**–अव्य. लहानांसाठीं संबोधन;अरे.
**बेअकल**–वि. [फा.+अ.] बेअकली; मूर्ख.
**बेअदब**–[ फा. + अ. ] बेअदबी; मोठ्या माणसांचा मान न ठेवणारा; अशिष्ट. **बेअदबी**–स्त्री. असभ्यता; अमर्यादा.
**बेआब**–वि. [ फा. + अ. ] निस्तेज. २ तुच्छ. [ नित. २ अप्रतिष्ठित.
**बेआबरू**–वि. [फा.+अ.] १अपमा-
**बेअिज्जत**–वि. [फा.+अ.] १ अपमानित.अप्रतिष्ठित २ **बेअिज्जती**-स्त्री. अपमान; अप्रतिष्ठा.
**बेअिन्तहा**–वि. [फा.+अ.]अमर्याद.
**बेअीमान**–वि.[फा.+अ.]१ अधर्मी. २ अप्राम णिक. **बेअीमानी**–स्त्री. बेअिमानी; अप्रामाणिकता.
**बे-अुज्र**–वि. [फा.+अ.] आक्षेपरहित; बिनहरकत. [ अप्रतिष्ठित.
**बेकदर**–वि. [फा.] अब्रू नसलेला;
**बेकरार**- वि.[फा.] बैचैन; अस्वस्थ.
**बेकल*** –वि. विकल; अस्वस्थ. बेकली–स्त्री. व्याकुळता. [निर्दोष.
**बेकसूर**–वि. [फा.+अ.] निरपराध;
**बेकहा**–वि. [फा. + सं.] दुसऱ्याचें न ऐकणारा; अुद्धट; अुच्छृंखल.
**बेकाबू**–वि. [फा.+अ.] १ लाचार. २ ताब्यांत नसलेला.
**बेकाम**–वि. [फा. + सं.] १ निरुपयोगी; कुचकामाचा. २ निरुद्योगी.
**बेकार**–वि.[फा.] १ काम नसलेला; २ निरर्थक; व्यर्थ. ३ निष्फळ क्रि. वि. निरुपयोगी; व्यर्थ. **बेकारी**–स्त्री. बेकारी; निरुद्योगीपणा.
**बेखटके**–क्रि. वि. [ फा.+ अनु. ] निःसंकोचपणें; बेधडक; बेलाशक.
**बेखबर**–वि. [फा.] १ बेफिकीर; निष्काळजी. २ भानावर नसलेला; बेहोष;बेशुद्ध.३ अजाणता; नेणता.
**बेग**–१ वेग; शीघ्रता. २ प्रवाह.
**बेगम**–स्त्री. [तु.] १ राणी. २ अुच्च कुळांतील स्त्री.
**बेगर**–अव्य. वेगळा; निराळा.
**बेगरज**–वि. [फा.+अ.] १ तमा न बाळगणारा; बेफिकीर. २निःस्वार्थी.
**बेगाना**–वि. [फा.] १ परका; अपरिचित. २ दुसऱ्याचा; परक्याचा.
**बेगार**–स्त्री.[फा.] बिगार; वेठ.(मु.) **बेगार टालना**–चालढकल करणें; कसें तरी काम करणें. **बेगारी**–स्त्री. बिगारी.
**बेगि***–क्रि.वि.लौकर; शीघ्र; झटपट.
**बेगुनाह**–वि. [ फा. ] निरपराध; निर्दोष.

**बेचना**–क्रि. स. विकणें. (मु.) **बेच खाना**–गमावणें; हरवणें.
**बेचाना**–क्रि.स. विकविणें. [गरीब.
**बेचारा**–वि. [फा.] बिचारा; दीन;
**बेचिराग़**–वि. [फा.] बेचिराख; उध्वस्त.
**बेजड**–वि. [फा.+सं.] निराधार; बिनबुडाचा; पाया नसलेला.
**बेज़बान**–वि. [फा.]१ मुका; बोलतां न येणारा. २ दीनदुबुळा.
**बेज़ा**–वि. [फा.] १ अवेळीं झालेला. २ अनुचित; अयोग्य. (मु.) **जा बेजा**–योग्यायोग्य.
**बेजान**–वि. [फा.]१ निर्जीव मृतवत्. २ कोमेजलेला. ३ दुबळा; अशक्त.
**बेज़ाब्ता**–वि. [फा.+अ.] बेकायदा; नियमाविरुद्ध.
**बेज़ार**—वि. [फा.] १ नाखुष; अप्रसन्न. २ दुःखी.
**बेझा***—पु. लक्ष्य; निशाण.
**बेटला***–पु. मुलगा; पुत्र. **बेटली**–स्त्री. मुलगी. [मुलगी; कन्या.
**बेटा**–पु. मुलगा; पुत्र. **बेटी**–स्त्री.
**बेठन**–पु. वेष्टनाचें वस्त्र; रुमाल.
**बेठिकाने**– वि. [फा. + सं.] १ स्थानभ्रष्ट. २ व्यर्थ; निरर्थक.
**बेड**—पु. कुंपण
**बेडा**–पु. १ जहाजांचा किंवा नावांचा तांडा; आरमार. (मु.) **बेडा पार करना** अथवा **लगाना**– संकटांतून पार पाडणें. वि. कठिण; मुश्किल.
**बेडिन–नी**—स्त्री. कलावंतीण.
**बेडौल**—वि. पाहा 'बेढंगा'
**बेढंग–गा**–वि. [फा. + सं.] १ अशिष्ट; चालरीत न जाणणारा. २ बेडौल; बेढब. ३ कुरूप.
**बेढ** – पु. [?] नाश.
**बेढई**—स्त्री. कचोरी. [गुरें वळणें.
**बेढना**–क्रि. स. १ कुंपण घालणें. २
**बेढब**–वि. १ बेडौल; विजोड. २ कुरूप.
**बेढा**–पु. १ हातांतील कडें. २ परस; परसूं.
**बेतकल्लुफ़**–वि. [फा. + अ.] १ मनमोकळा. २ अशिष्ट; निःसंकोची.
**बेतना**–क्रि. अ. माहीत होणें; कळणें.
**बेतमीज़**–वि. [फा.+अ.] असभ्य; अशिष्ट; उद्धट.
**बेतरह**—क्रि. वि. [फा. + अ.] १ अनुचित रूपानें; गैरवाजवी. २ असाधारण रीत्या. वि. पुष्कळ; अधिक.
**बेतरीक़ा**—वि., क्रि.वि. [फा. + अ.] अनुचित; नियमाविरुद्ध.
**बेतहाशा**–क्रि. वि. [फा. + अ.] १ अधिक वेगानें; भरधांव. २

गर्भगळित होऊन ३ अविचारानें.

**बेताब**–*वि*. [फा.] १ दुर्बल; अशक्त. २ व्याकुळ; विव्हळ.

**बेतार**–*वि*. [फा.+सं.] बिनतारी. (मु.) **बेतार का तार**–बिनतारी संदेश.

**बेताल**—*पु*. भाट.

**बेताल**—*पु*. वेताळ.

**बेतुका**—*वि*. [फा. + सं.] १ विजोड; विसंगत. २ बेढब, बेडौल; ३ निर्यमक.

**बेद्** – *पु*. वेद.

**बेद्**–*स्त्री*. [फा] वेत; वेताचें झाड.

**बेदखल**–*वि*. [फा. + अ.] तावा किंवा अधिकार नसलेला; अधिकार-च्युत **बेदखली**-*स्त्री*. १ संपत्तीवरील मालकी हक्क नसणें किंवा नाहींसा होणें. २ कुळांना जमिनीवरून हुसकून लावणें; काढून टाकणें.

**बेदम**–*वि*. [फा] १ मृतवत्; मरणोन्मुख. २ जर्जर. ३ मृत; मेलेला.

**बेदर्द**—*वि*. [फा.] निर्दय; कठोर.

**बेदाग**–*वि*. [फा.] १ न डागळ-लेला; स्वच्छ. २ निर्दोषी; निरपराधी.

**बेदाद**–*पु*. [फा.] जुलूम; अन्याय.

**बेदाना**–*पु*. [फा.] १ बीन बियांचें अुत्तम काबुली डाळिंब. २ दारूहळद.

**बेदाना**–*वि*. [फा.] मूर्ख; बेवकूफ.

**बेदार**–*वि*. [फा.] जागृत; जागा.

**बेदारी**–*स्त्री*. जागृति.

**बेधना**—*क्रि. स*. टोचणें; भोंक [पाडणें.

**बेधिया**—*पु*. अंकुश.

**बेनसीब**–*वि*. [फा. + अ.] अभागी; दुर्दैवी.

**बेनमूना–बेनिमून***–*वि*. [फा.] [अनुपम; अद्वितीय.

**बेनी**–*स्त्री*. १ वेणी. २ त्रिवेणी. ३ दाराची खिटी.

**बेपरद, बेपर्द**—*वि*. [फा.] १ आवरण नसलेला; उघडा. २ नग्न

**बेपरवाह**—*वि*. [फा.] निष्का-ळजी; बेपर्वा.

**बेपाअि***— *वि*. [घाबरलेला. भांबावलेला;

**बेपेंदी**—*वि*. [फा. + सं.] बिन-बुडाचा (मु.) **बेपेंदी का लोटा**–हलक्या कानाचा; घटकेंत विचार बदलणारा.

**बेफिक्र**—*वि*. [फा.] बेफिकीर; निष्काळजी.

**बेबस**—*वि*. [२ पराधीन. १ विवश; लाचार.

**बेबहा**–*वि*. [फा] अमूल्य; मौल्यवान्.

**बेबाक**–*वि*. [फा.] फेडलेलें (ऋण).

**बेमौका**—*वि*. [फा.] अयोग्य वेळीं; अवेळींचा; *पु*. अयोग्य वेळ.

**बेर**–*स्त्री*. बोर किंवा बोराचें झाड.

**बेर, बेरी**–*स्त्री*. १ वेळ; खेप. २ अुशीर; विलंब.

**बेरबेर**— *क्रि. वि.* वारंवार.
**बेरहम**–*वि.* [फा.] निष्ठुर; निर्दयी.
**बेरुख**–*वि.* [फा.] १ बेमुर्वतखोर; प्रसंगीं उपयोगी न पडणारा. २ नाखुश; रागावलेला.
**बेरोक**–*वि.* [फा.+ *सं.*] निर्विघ्न; अडथळा नसलेला.
**बेल**—*पु.* [फा] १ फावडें; कुदळ. २ सडक मोजतांना चुन्याची ओढलेली रेघ. [बेलफळ.
**बेल**—*पु.* १ बेलाचें झाड. २
**बेल**–*स्त्री.* १ वेल; लता. २ संतान; वंश. ३ भिंतीवर अगर कपड्यावर काढलेलीं फुलें; वेलबुट्टी. ४ वल्हें.
**बेलचा**–*पु.* [फा.] कुदळ.
**बेलदार**–*पु.* [फा.] १ कुदळ व खोरें यांनीं काम करणारा मजूर. २ मजुरांवरील मुकादम.
**बेलन**—*पु.* १ सडक किंवा जागा सपाट करण्याचा दगडी किंवा लोखंडी रूळ; रोलर. २ यंत्रांतील रोलर. ३ पिंजाऱ्याचें लाटणें. ४ गुऱ्हाळाचा ओंडका. ५ लाटणें.
**बेलना**—*पु.* लाटणें.
**बेलना**–*क्रि. स.* १ लाटणें. (पोळी वगैरे) २ नष्ट करणें. (मु.) **पापड बेलना**—१ कार्यनाश करणें. २ आपत्ति सहन करणें.
**बेला**—*पु.* मोगरा.
**बेला**–*स्त्री.* समय; वेळ.
**बेलाग**—*वि.* [फा. + *सं.*] १ साफ; सडेतोड. २ बिलकुल; अगदीं.
**बेलि**—*स्त्री.* वेली; वेल; लता.
**बेली**—*पु.* सहचर; साथीदार.
**बेलौस**–*वि.* [फा.] स्पष्ट वक्ता. निःपक्षप.
**बेवकूफ़**–*वि.* [फा.] मूर्ख; नालायक.
**बेवक्त**–*क्रि. वि.* [फा.] अवेळीं.
**बेवफ़ा**—*वि.* [फा. + *अ.*] १ कृतघ्न. २ बेमुर्वतखोर.
**बेवरा**—*पु.* विवरण. **बेवरेवार**–*वि.* तपशीलवार; विस्तृत.
**बेवहरना**—*क्रि. अ.* व्यवहार करणें; वागणें. २ सावकारी करणें.
**बेवहरिया***–*पु.* १ सावकार. २ सावकाराचा कारकून.
**बेवहार**–*पु.* व्यवहार.
**बेवा**–*स्त्री.* [फा.] विधवा.
**बेवान***–*पु.* १ विमान. २ तिरडी.
**बेश**—*वि.* [फा.] १ अधिक; ज्यादा. २ श्रेष्ठ; सुंदर. [निःसंशय.
**बेशक**–*क्रि. वि.* [फा.] निःसंदेह;
**बेश-कीमत**–*वि.* [फा.] मौल्यवान्.
**बेशरम**–**बेशर्म**–*वि.* [फा.] निर्लज्ज.
**बेशी**–*स्त्री.* [फा.] अधिकता, वृद्धि. *वि.* जास्त.

**बेशुमार**—*वि*. [ फा. ] बेसुमार; अमर्याद.

**बेसन**—*पु*. [ दे. ] डाळीचें पीठ. **बेसनी**—*स्त्री*. डाळीच्या पिठाची रोटी किंवा पुरी.

**बेसबरा, बेसब्र** *वि*. [फा. + अ.] १ अधीर; अुतावीळ. २ असंतुष्ट.

**बेसमझ**—*स्त्री*. [ फा. + सं. ] निर्बुद्ध; मूर्ख; अडाणी.

**बेसर**—*पु*. [ ? ] १ खेचर. २ नथ.

**बेसरा**—*वि*. [ फा. ] निराश्रित.

**बेसवा**—*स्त्री*. वेश्या. [ निराश्रित.

**बेसहारा**—*वि*. [ फा. ] निराधार;

**बेसा***—*स्त्री*. वेश्या.

**बेसा***—*पु*. वेष; पोषाख.

**बेसारा**—*वि*. १ बसणारा. २ स्थापणारा.

**बेसाहना**—*क्रि.अ*. [ दे. ] १ विकत घेणें; खरेदी करणे. २ ओढवून घेणें (विरोध, संकट अि.) **बेसाहनी**—*स्त्री*. मालाची खरेदी.

**बेसुध**—*वि*. बेशुद्ध; ताळ्यावर नसलेला.

**बेह**—*वि*. [ फा. ] अुत्तम.

**बेह***—*पु*. छिद्र; भोंक

**बेहतर-बेहतरीन**—*वि*. [ फा. ] बेहेत्तर; अेखाद्यापेक्षां अधिक चांगलें.

**बेहतरी**-*स्त्री*.[फा.]भलाओी;कल्याण.

**बेहद**-*वि*. [फा.]बेसुमार; अपरिमित.

**बेहया**-*वि*. [ फा. + अ. ] निर्लज्ज; बेशरम. **बेहयाओी**-*स्त्री*. निर्लज्जता.

**बेहर**—*वि*. [दे ] १ अचल; स्थावर. २ अलग; पृथक्.

**बेहराना**—*क्रि.अ*. [ ? ] फाटणें.

**बेहरी**—*स्त्री*. १ पोस्त; वर्गणी. २ जमीनदारीचा अेक भाग.

**बेहला**—*पु*. [ अिं. ] व्हायोलिन (अेक तंतुवाद्य ).

**बेहाल**—*वि*. *क्रि. वि*. [ फा. + अ. ] १ हलाखीच्या स्थितीस पोंचलेला. २ व्याकुळ; बेचैन.

**बेहिचक**—*क्रि. वि*. [ फा.+सं. ] निःसंकोचपणें; न डगमगतां.

**बेहुनरा**-*वि*.[फा.] मूर्ख;अशिक्षित.

**बेहूदगी**—*स्त्री*. [ फा. ] असभ्यता; अशिष्टता.

**बेहूदा**-*वि*. [फा.] असभ्य; अशिष्ट.

**बेहूदापन**—*पु*. अशिष्टता.

**बेहैफ**—*वि*. [ फा. ] निष्काळजी; बेफिकीर.

**बेहोश**—*वि*. [फा.] बेशुद्ध. **बेहोशी**-*स्त्री*. बेशुद्धि; मूर्च्छितावस्था.

**बैंगन**—*पु*. वांगें. [ रंगाचा.

**बैंगनी, बैंजनी**—*वि*. लाल निळ्या

**बै***—*स्त्री*. वय.

**बैखानस, बैषानस***—*पु.* तपस्वी; ऋषि. [ काळी तुळस.

**बैजंती–बैजयंती**—*स्त्री.* वैजयंती;

**बैठक**—*स्त्री.* १ बैठक; उठाबशी २ बसण्याची जागा. ३ आसन. ४ आधार. ५ अधिवेशन.

**बैठका**—*पु.* बैठकीची जागा; दिवाणखाना. [ प्रकार ).

**बैठकी**—*स्त्री.* बैठका ( व्यायामाचा

**बैठना**—*क्रि. अ.* १ बसणें. २ जम बसणें. ३ पिचणें. ४ व्यवस्था बिघडणें. ५ खर्च होणें. ६ बेकार होणें; रिकामें राहणें. ७ बरोबर नेम लागणें; अचूक लागणें. (मुं.) **बैठे बैठाअे**–१ अकारण; निरर्थक. २ अचानक. **बैठे बैठे**–१ निष्प्रयोजन. २ अचानक. ३ अकारण.

**बैठन**—*स्त्री.* १ आसन. २ बसण्याची तऱ्हा; बैठक.

**बैठवाना, बैठाना**—*क्रि. स.* १ बसविणें. २ संवय लावणें. ३ जम बसविणें. [ २ छंद; श्लोक.

**बैत**—*स्त्री.* [ अ. ] १ कविता.

**बैद**—*पु.* वैद्य. **बैदकी**–*स्त्री.* वैद्यकी.

**बैन***—*पु.* वचन; वाणी.

**बैना**—*पु.* अुत्सव किंवा मंगलकार्यानिमित्त अिष्टमित्रांना वांटली जाणारी मिठाअी.

**बैनामा**—*पु.* [ अ. ] १ विक्रीपत्र; साठेखत. २ विक्री.

**बैपार**—*पु.* व्यापार; व्यवसाय.

**बैपारी**—*पु.* व्यापारी; धंदेवाअीक

**बैयर***—*स्त्री.* स्त्री; बाअी.

**बैर**—*पु.* वैर; शत्रुत्व. (मु.) **बैर काढना, निकालना या भँजाना**—सूड अुगविणें. **बैर ठानना**—शत्रुत्व करणें. **बैर बिसाहना** अथवा **मोल लेना**—निष्कारण वैर पत्करणें. **बैर लेना**—सूड घेणें.

**बैर**–*पु.* बोर.

**बैर**–*पु.* [ दे. ] पाभर. [ ध्वज.

**बैरक–ख**—*पु.* [तु.] फौजेचा झेंडा;

**बैरक**—*स्त्री.* [ अिं. ] बराक.

**बैराग**—*पु.* वैराग्य. **बैरागी**–[ *पु.* ] वैरागी. [ वकील.

**बैरिस्टर**—*पु.* [ अिं. ] बॅरिस्टर;

**बैरूनी**—*वि.* [ फा. ] १ बाहेरील. २ परकीय.

**बैल**—*पु.* बैल. ( यौ. ) **बैलगाडी**—*स्त्री.* बैलांची गाडी.

**बैसंदर***—*पु.* अग्नि

**बैस**—*स्त्री.* १ वय; आयुष्य. २ तारुण्य.

**बैसना***—*क्रि. अ.* बसणें.

**बैसर**–*स्त्री.* मागाची फणी.

**बैसाख**—*पु.* वैशाख.

**बैसाखी**—*स्त्री.* कुबडी.

**बैसिक***–पु· १ वेश्येवर प्रेम करणारा. २ विषयी

**बैहर***–*वि·* भयंकर.

**बैहर***–पु· वायु. [ण्याची मजुरी.

**बोआई**–*स्त्री·* १ पेरणी. २ पेर-

**बोआना**—*क्रि·* स· पेरविणें.

**बोझ**–पु· १ओझें; भार. २ कामाचा बोजा; जबाबदारी.

**बोझना**-*क्रि·* स· [?] भार टाकणें.

**बोझल-बोझिल**-*वि·* वजनदार; जड.

**बोगदान**—पु· [फ़ा.] गारुड्याची पिशवी.

**बोटी**–*स्त्री·* मांसाचा लहान तुकडा. (मु.) **बोटी बोटी काटना**–शरीराचे तुकडे तुकडे करणें.

**बोडा**–पु· [दे.] अजगर.

**बोडा**-पु· [दे.] चवळीची शेंग.

**बोडी**–*स्त्री·* [?] १ दमडी; कवडी. २ अल्प धन.

**बोतल**–पु· [अं.] बाटली.

**बोदा**-*वि·* १ आळशी; सुस्त. २ मूर्ख; मंद बुद्धीचा. ३ फोफसा; भुसभुशीत.

**बोना**—*क्रि·* स· पेरणें.

**बोर**—पु· बुडविण्याची क्रिया.

**बोरना**-*क्रि·*स· १ बुडविणें;बुचकळणें. २ बदनामी करणें. ३ रंगविणें.

**बोरसी**-*स्त्री·* शेगडी.

**बोरा**–पु· पोतें. **बोरी**–*स्त्री·* लहान पोतें. [२ अंथरूण.

**बोरिया**—पु· [फा.] १ चटई.

**बोलचाल**—*स्त्री·* १ संभाषण. २ व्यवहाराची भाषा. ३ कुरापत.

**बोलना**-*क्रि·* स· १ सांगणें; कथन करणें. २ निश्चय करणें; ठरविणें. ३ अडविणें; रोखणें; प्रतिरोध करणें. *क्रि· अ·* १ बोलणें; भाषण करणें. २ आवाज होणें. (मु.) **बोल जाना**–राम म्हणणें; मरणें (अशिष्ट).

**बोलबाला**–पु· नांव; प्रसिद्धि.

**बोली**–१ भाषा; बोली. २ टोमणा; छद्मी भाषण. ३ लिलांव बोलणें.

**बोवाना**—*क्रि·* स· पेरणी करविणें.

**बोश**–पु· [अ·] १ वजन; रुबाब; दबदबा. २ हलकट माणूस.

**बोसा**–पु· [फा.] चुंबन; मुका.

**बोसीदा**-*वि·* [फा.] जुना; खराब.

**बोस्ताँ**–पु· [फा.] बाग.

**बोह**–*स्त्री·* बुडी.

**बोहतान**–पु· [अ.] मिथ्या आरोप; दूषण. (मु.) **बोहतान जोडना**–कलंक लावणें. [जहाज.

**बोहित***-पु· १ मोठी नाव. २

**बौआना**–*क्रि· अ·* १ झोंपेंत बडबडणें. २ वेड्यासारखें बडबडणें.

**बौखल**–वि· १ रागीट. २ विक्षिप्त ३ चिडखोर.
**बौखलाना**–क्रि· अ· रागावून बोलणें; कातावणें; चिडणें.
**बोखलाहट**–स्त्री· चीड; जळफळाट.
**बौछाड–बौछार**–स्त्री· १ तुषार; बुरबुर. २ वर्षाव.
**बौना**–पु·खुजा माणूस;बुटका माणूस; वामनमूर्ति.
**बौर**–पु· मोहोर. [ येणें.
**बौरना**–क्रि· अ· आंब्याला मोहोर
**बौरा***–वि· १ विक्षिप्त; वेडा. २ बावळट; भोळा; अजागळ.
**बौराअी**–स्त्री· विक्षिप्तपणा.
**बौराना**–क्रि· अ· १ वेड लागणें; विक्षिप्त होणें. २ मनावरचा ताबा जाणें; विवेक सुटणें. *क्रि· स·* १ अेखाद्याला बनविणें; फजिती करणें. २ वेड लावणें.
**ब्याना**–क्रि· स· विणें.
**ब्यालू***–पु· रात्रीचा फराळ.
**ब्याह**–पु· लग्न; विवाह.
**ब्याहता**–वि·विवाहित;लग्न झालेला.
**ब्याहना**–क्रि· स· १ लग्न करणें. २ लग्न करून देणें.
**ब्योत**–पु· १ सोय; व्यवस्था. २ युक्ति; अुपाय ३ कार्य-पद्धति. ४ कपडे बेतण्यासाठीं कापड फाडणें.
**ब्योतना**–क्रि· स· कपडे बेतणें.
**ब्योपार, ब्यौपार**––पु· व्यापार; उद्योगधंदा.
**ब्योरन**–स्त्री· केस विंचरणें.
**ब्योरा**–पु· १ तपशील; विवरण. २ वृत्तान्त; खबर. (यौ.) **ब्योरेवार**–तपशीलवार; सविस्तर.
**ब्योहरिया**–पु· सावकार; देण्याघेण्याचा व्यवहार करणारा.
**ब्योहार, ब्यौहार**–पु·व्यवहार.
**ब्रज**–पु· ब्रज; गोकुळ.
**ब्रह्मा**––पु· ब्रह्मदेव.
**ब्राह्मसमाज**––पु· केवळ ब्रह्म मानणाऱ्या लोकांचा संप्रदाय; प्रार्थना समाज. [ प्राचीन लिपि.
**ब्राह्मी**–स्त्री· १ दुर्गा. २ भारताची
**ब्रीड–ब्रीडा**–स्त्री· लज्जा; लाज.

## भ

**भंकार***–पु·[अनु.]१ बिकट हास्य. २ घोर शब्द.३ अेक राग (संगीत).
**भंग**––पु· १ लाट. २ पराजय. ३ तुकडा; खंड. ४ कुटिलता. ५ भय. ६ अडचण; बाधा. ७ भांग.
**भंगड, भंगडी**–वि· भांगेचें व्यसन

असलेला; भंगिष्ठ; भंगड.
**भंगना**—*क्रि. अ.* १ भंग होणें; तुटणें. २ दबलें जाणें. *क्रि. स.* १ तोडणें. २ दाबणें.
**भंगी**—*वि.* नाश पावणारें.
**भंगी**—*वि.* भाग पिणारा.
**भंगेडी**—*वि.* पाहा 'भंगड'.
**भँजना**—*क्रि. अ.* १ तुकडे तुकडे होणें; तुटणें. २ मोडणें; खुर्दा होणें (नाण्याचा). [(रुपयांची).
**भँजाना**—*क्रि.स.* वटाविणें; मोड करणें
**भंटा**—*पु.* वांगें. [शब्द बोलणारा.
**भंड**—*वि.* १ धूर्त; पाखंडी. २ अश्लील
**भंडताल**—*पु.* नाच-गाण्याचा एक प्रकार, ज्यात टाळा वाजवितात.
**भंडना**—*क्रि. स.* १ हानि पोहोंचविणें; बिघडविणें. २ नष्ट-भ्रष्ट करणें. ३ तोडणें. ४ बदनाम करणें.
**भँडसार-साल**—*स्त्री.* धान्याचें कोठार.
**भंडा**—*पु.* १ भांडें. २ रहस्य. (मु.) **भंडा फुटना**—गौप्यस्फोट होणें.
**भंडाफोड**—*पु.* गौप्यस्फोट; बेंड फुटणें; नाचक्की.
**भंडार**—*पु.* भांडार; कोठार.
**भंडारा**—*पु.* १ स्वयंपाक घर. २ रमणा. ३ साधूंचें भोजन.
**भंडारी**—*स्त्री.* १ लहान खोली. २ खजिना. *पु.* १ खजिनदार. २ आचारी. [भाटाचें काम.
**भंडैती**—*स्त्री.* विदूषकाचें काम;
**भंडौआ**—*पु.* भाटांचें गीत.
**भँभीरी**—*स्त्री.* [अनु.] लाल रंगाचा पावसाळी किडा.
**भंभेरि**—*स्त्री.* भय; भीति.
**भँवना**—*क्रि. अ.* फिरणें.
**भँवर**—*पु.* १ भुंगा. २ पाण्याचा भोंवरा. ३ खळगा.
**भँवरजाल**—*पु.* संसारपाश.
**भँवरी**—*स्त्री.* १ पाण्याचा भोंवरा. २ केसांतील भँवरा. [वाल्याची).
**भँवरी**—*स्त्री.* फेरी, खेप (फेरी-
**भँवाना**—*क्रि. स.* १ फिरविणें; चकरा देणें; बुचकळ्यांत पाडणें.
**भँसना**—*क्रि. अ.* पाण्यांत फेंकले जाणें.
**भअिया**—भाअू. [अहो, अरे.
**भअी**—*क्रि. अ.* झाली—*पु.* भाअी;
**भअुजाअी**—*स्त्री.* भावजय.
**भकुआना**—*क्रि. स.* घाबरें होणें. *क्रि. अ.* १ घाबरविणें. २ बनविणें थट्टा करणें.
**भकोसना**—*क्रि. स.* बकाबक खाणें; बोकणा भरणें.
**भकषना, भखना***—*क्रि.स.* खाणें.
**भख**—*पु.* आहार; भोजन.

पणा. २ भडकदारपणा. ३ बह-कणें; तावा सुटणें.

**भडकदार**-*वि.* [अनु. + फा.] १ भडकदार. २ रुबाबदार; चमक-दार.

**भडकना; भरकना**--*क्रि. अ.* [अनु.] १ पेटणें; भडकणें. २ बुजणें (पशु). ३ रागावणें.

**भडकाना**- *क्रि. स.* [अनु.] १ प्रज्वलित करणें; पेटविणें २ फूस देणें. ३ बुजगावणें; भयभीत करणें (जनावराना).

**भडकीला**-*वि.* [अनु.] भडकदार.

**भडभडाना**-*क्रि. अ.* [अनु.] १ भडभड शब्द करणें. २ भडभडून येणें.

**भडभडिया**-बडबड्या.

**भडभूँजा**-*पु.* भुजारी; भडभुंज्या.

**भडास**—*स्त्री.* १ मळमळ. २ द्वेष. तिरस्कार; राग.

**भडिहाओ***--*क्रि. वि.* १ लपून; छपून २ चोरटेपणानें.

**भडुआ**-*पु.* वेश्येचा दलाल.

**भणना***-*क्रि. अ.* बोलणें; सांगणें.

**भतीजा**-*पु.* पुतण्या.

**भत्ता**-*पु.* भत्ता. [होणारें पीक.

**भदओं**—*स्त्री.* भाद्रपद महिन्यांत

**भद्दा**-*वि.,पु.* [अनु.] कुरूप; मद्दड.

**भद्दापन**-*पु.* कुरूपता.

**भद्र**-*वि.* सभ्य; सज्जन. [माणुसकी.

**भद्रता**—*स्त्री.* शिष्टता; सभ्यता;

**भद्री***-*वि.* भाग्यवान्. [आवाज.

**भनक**-*स्त्री.* १ अफवा. २ खालचा

**भनकना, भनना**-*क्रि. स.* सांगणें. बोलणें.

**भनभनाना**-*क्रि. अ.* [अनु.] १ भणभण करणें. २ गुणगुणणें.

**भनभनाहट**—*स्त्री.* भणभण.

**भन्नाना***-*क्रि. अ.* [अनु.] १ फणा काढून अंगावर येणें. २ रागावणें; वमकन अंगावर येणें. ३ डोकें गरगरणें.

**भबका**-*पु.* अर्क काढतांना अुपयो-गांत आणलें जाणारें मडकें.

**भभकना**-*क्रि. अ.* [अनु.] १ भड-कणें; पेटणें. २ अुष्णतेमुळें फुटणें; तडकणें. ३ अुकळी फुटणें.

**भभकी**-*स्त्री.* [अनु.] पोकळ दम; दटावणी. [खेंचाखेंची.

**भम्भड-भ्भड**—*स्त्री.* दाटी; गर्दी;

**भभरना***--*क्रि. अ.* १ भयभीत होणें; घाबरणें. २ बुचकळ्यांत पडणें.

**भभूका**-*पु.* ज्वाला.

**भया***-*वि.* झालें. [भीतिप्रद.

**भयान, भयावना***-*वि.* भयानक;

**भय्या**-*स्त्री.* भाअू.

**भरंत***—स्त्री· संदेह; संशय.
**भर**—पु· भार; बोजा; वजन.
**भर***—क्रि· वि· कडून; द्वारा.
**भर**—वि· अेकंदर; संपूर्ण.
**भरता**—पु· [दे.] भरीत; रायतें.
**भरतार**—पु· पति; नवरा.
**भरती**—स्त्री· १ भर. २ प्रवेश; भरती. (मु.) **भरती का**—साधारण; मामुली.
**भरना**—क्रि· स· १ भरणें; घालणें. २ पूर्ण करणें. ३ कर्ज फेडणें; चुकतें करणें. ४ अुपरोध, निंदा करणें. ५ भरून जाणें. ६ शरीराला लावणें; लेपणें. ७ निभावणें. क्रि· अ· शरीर घष्टपुष्ट होणें.
**भरना**—पु· लांच.
**भरनि***—स्त्री· पोशाख, पेहराव.
**भरपूर**—वि· भरपूर; परिपूर्ण; भरलेला. क्रि· वि· पूर्णपणें; अुत्तम प्रकारें.
**भरपेट**—क्रि.वि· पोट भरून; यथेच्छ.
**भरभेंटा***—पु· सामना; लढाअी.
**भरम***—पु· १ भ्रम; घोटाळा. २ रहस्य. (मु.) **भरम गँवाना**—रहस्य प्रकट करणें.
**भरमना***—क्रि· अ· १ भ्रमण करणें; फिरणें. २ दारोदार हिंडणें; भटकणें. ३ संशयांत पडणें. स्त्री· १ चूक; भूल. २ बुचकळा.
**भरमाना**—क्रि· स· १ भुलविणें; फूस लावणें, २ दारोदार हिंडविणें; भटकविणें. ३ धोक्यांत पाडणें.
**भरमार**—स्त्री· भडिमार; अधिकता.
**भरराना**—क्रि· अ· [अनु.] कोसळणें.
**भरवाना**—क्रि· स· भरविणें.
**भरसक**—क्रि· वि· यथाशक्ति; अैपतीप्रमाणें. [व्यवस्थित.
**भरापुरा-भरापूरा**-वि· भरपूर;
**भराअी**-स्त्री· भरण्याची क्रिया किंवा मजुरी. [रुपया भाराचें वजन.
**भरी**- स्त्री· भार (दहा मोसे किंवा अेक
**भरोसा**—पु· १ भरंवसा; विश्वास. २ आशा; अुमेद. ३ साहाय्य; अवलंब.
**भर्ती**—स्त्री· पाहा, 'भरती'.
**भर्त्सन—ना**—स्त्री· १ निंदा; निर्भर्त्सना. २ दटावणी.
**भर्राना**—क्रि· अ· कोसळणें, कडाड आवाज करीत पडणें.
**भर्म***—पु· भ्रम.
**भर्मन***—पु· भ्रमण.
**भलमनसत, भलमनसाहत, भलमनसी**—स्त्री· सज्जनता; माणुसकी.
**भला**—वि· १ चांगला; भला. २ उत्तम; पहिल्या प्रतीचा. पु· कल्याण; कुशल. अव्य. बरें; अस्तु.
**भलाअी**—स्त्री· चांगुलपणा.

**भलामानुस**–*वि.* भला; चांगला.
**भल्लूक**–*पु.* अस्वल.
**भले**–*क्रि. वि.* चांगल्या तऱ्हेनें. अव्य. वाहवा; भलें शाबास !
**भवंग***–*पु.* साप.
**भवँर**–*पु.* भ्रमर; भोंवरा; भुंगा.
**भव**–*पु.* १ अुत्पत्ति; जन्म. २ मेघ; ढग. ३ कुशल. ४ जगत्. ५ संसार. वि. शुभ.
**भव***–*पु.* भय; भीति.
**भवदीय**–सर्व. आपला. [४ जग.
**भवन**–*पु.* १ घर. २ महाल. ३ मंदिर.
**भवनी**–*स्त्री.* भार्या; स्त्री.
**भविष***–*पु.* भविष्य.
**भविष्यत्**––*पु.* भविष्य. [तिरपा.
**भवीला**–*वि.* १ भावपूर्ण २ वांकडा;
**भष***–*पु.* भोजन; आहार.
**भषना***–*क्रि. स.* खाणें; जेवणें.
**भस्म**–*पु.* भस्म; राख. **भस्मसात्**–*वि.* नष्ट; राखरांगोळी झालेला.
**भहराना***–*क्रि. अ.*[अनु.] १ तुटून पडणें. २ कोसळणें.
**भाँज**–*स्त्री.* नाण्याची मोड करण्याबद्दल दिला जाणार बट्टा.
**भाँजना**–*क्रि. स.* १ घडी घालणें. २ जोडी फिरविणें (व्यायामाचा प्रकार). ३ मोडणें.
**भाँजी**–*स्त्री.* कामांत व्यत्यय आणणें.
**भाँड**–*पु.* भाट.
**भाँडना***–*क्रि. अ.* दारोदार हिंडणें; भटकणें. *क्रि.स.* १ अेखाद्याची बदनामी करणें. २ नाश करणें.
**भाँडा**–*पु.* भांडें.(मु.) **भाँडे में जी देना**––अेखाद्यावर प्रेम जडणें. **भाँडे भरना**–१ द्रव्य सांठविणें. २ अेखाद्याला खूप देणें. ३ पश्चात्ताप करणें. [२ पद्धत; रीत.
**भाँत–ति**–*स्त्री.* १ प्रकार; तऱ्हा.
**भाँपना**–*क्रि. स.* [?] १ ताडणें; ओळखणें. २ पाहणें.
**भाँरी, भाँवरी**–*स्त्री.* सप्तपदी; विवाह.
**भा**–*स्त्री.* १ कांति; तेज. २ शोभा. ३ किरण. ४ वीज.
**भाअि***-*पु.* १ प्रेम; स्नेह. २ स्वभाव. ३ विचार. **भाअिप***–*पु.* १ स्नेहसंबंध. २ आप्तसंबंध.
**भाअि**–*पु.* भाअू.
**भाअीचारा**–*पु.* स्नेहसंबंध; मैत्री.
**भाअीदूज**–*स्त्री.* भाअूबीज.
**भाअीबिरादरी**–*पु.* जातभाअी.
**भाअु***–*पु.* १ चित्तवृत्ति. २ भावना. ३ प्रेम; स्नेह.
**भाअू**–*पु.* १ प्रेम; स्नेह. २ भावना. ३ स्वभाव. ४ स्थिति; अवस्था. ५ महत्त्व. ६ रूप. ७ सत्ता. ८ वृत्ति.
**भाअें***–*क्रि. वि.* समजुतीप्रमाणें.

**भाकसी**–*स्त्री.* भट्टी.
**भाख**–*पु.* भाषण; बोलणें.
**भाखना***–*क्रि. स.* कथन करणें; बोलणें.
**भाग**–*पु.* १ भाग्य; नशीब. २ भागाकार. ३ वांटणी. [पळापळ.
**भागड़, भागदौड**–*स्त्री.* धांवपळ;
**भागना***–*क्रि. अ.* पळणें. (मु.) **सिरपर पैर रखकर भागना**–जीव घेऊन पळणें.
**भागनेय***–*पु.* भाचा. [नशीबवान.
**भागवंत–भागवान्**- *वि.* भाग्यवंत;
**भागी**—*पु.* हिस्सेदार.
**भाटा**—*पु.* १ अुतार; पाण्याचा ओसर. २ समुद्राची ओहोटी.
**भाट्यौ***–*पु.*यशोगान;भाटाचें काम.
**भाड**–*पु.* भडभुंजाची भट्टी. (मु.) **भाड में झोंकना** अथवा **डालना**–नाश करणें.
**भाडा**—*पु.* भाडें. (मु.) **भाडे का टट्टू**–१ क्षणिक.२ निकामी.
**भात**—*पु.* १ भात. २ प्रकाश. ३ प्रभात. [२ भाता (आगीचा).
**भाथा**–*पु.* १ भाता (बाणांचा)
**भाथी**–*स्त्री.*भट्टी पेटविण्याचा भाता.
**भादों**–*पु.* भाद्रपद महिना.
**भान**–*पु.*१ प्रकाश. २ दीप्ति; चमक. ३ आभास; प्रतीति.
**भानजा**–*पु.* भाचा.
**भानजी**—*स्त्री.* भाची.
**भानना***--*क्रि. स.* १ तोडणें; भंग करणें. २ नष्ट करणें. [गारीण-
**भानमती, भानुमती**—*स्त्री.* जादू-
**भाना**--*क्रि. अ.* १ बरें वाटणें. आवडणें. २ शोभणें. ३ माहीत होणें. *क्रि. स.* चमकविणें. [नदी.
**भानुजा, भानुसुता**--*स्त्री.* यमुना
**भाप, भाफ**—*स्त्री.* वाफ.
**भाभी**—*स्त्री.* वहिनी; भावजय.
**भाय*** —*पु.* भाअू. [२ प्रकार.
**भाय***–*पु.* १ भावना. २ परिणाम.
**भाया**—*वि.* प्रिय; आवडता.
**भार**—*पु.* १ बोजा. २ रक्षण; सांभाळ. ३ जबाबदारी. (मु.) **भार अुठाना**–जबाबदारी आपल्या शिरावर घेणें. **भार अुतरना**–कर्तव्याच्या ॠणांतून मुक्त होणें.
**भारत**—*पु.* भारत; हिंदुस्थान.
**भारती**--*स्त्री.* १ भाषा; वाणी. २ सरस्वती.
**भारी**—*वि.* १ भारी; वजनदार. २ मूल्यवान. ३ कठिण. ४अधिक. (मु.) **भारी भरकम**–भरभक्कम; जाडजूड. [३ अस्वल.
**भाल**–*पु.*१भाळ; कपाळ. २ भाला
**भाला**–*पु.* भाला.

**भालाबरदार**—पु. [ सं. + फा. ] भाला चालविणारा; भालाईत.
**भालू**—पु. अस्वल. [ असल्यास.
**भावअि***—अव्य. वाटल्यास; अिच्छा
**भावक**—वि. भावपूर्ण. क्रि. वि. किंचित्; थोडेसें. [ प्रेमी.
**भावक**—पु. १ भाविक. २ भक्त;
**भावज**—स्त्री. भावजय.
**भावता**—वि. प्रिय; आवडता.
**भावताव**-पु. भाव; दराची घासाघीस.
**भावन***—वि. प्रिय; आवडता.
**भावभंगी**—स्त्री. हावभाव; चेहऱ्यावरील भाव.
**भावी**—स्त्री. भविष्यकाळ. २ भाग्य.
**भावुक**—वि. १ भावनाप्रधान. २ भाविक.
**भाषना***—क्रि. अ. भाषण करणें; बोलणें. [ खाणें.
**भाषना***—क्रि. अ. भोजन करणें,
**भाषी**—पु. बोलणारा.
**भाषांतर**—पु. अनुवाद; भाषांतर.
**भास**—पु. १ दीप्ति; प्रकाश. २ किरण. ३ अिच्छा.
**भासना**—क्रि. अ. १ प्रकाशमान होणें. २ माहित होणें; समजणें. ३ नजरेस येणें. ४ रुतणें. [ विणें.
**भिंगाना, भिंजाना**—क्रि. स. भिज-
**भिंडी**—स्त्री. भेंडी.
**भिक्षु-भिक्षुक**-पु. १ भिकारी. २ बौद्ध संन्यासी. ३ भिक्षुक.
**भिखमंगा**—पु. भिकारी.
**भिखारिणी**—स्त्री. भिकारीण.
**भिखारी**—पु. भिकारी.
**भिगाना, भिगोना**—क्रि. स. भिजविणें. [ भिजवून घेणें.
**भिजवना***—क्रि. स. अेखाद्याकडून
**भिजवाना**—क्रि. स. पाठविणें; रवानगी करणें. [ विणें.
**भिजाना, भिजोना**—क्रि. स. भिज-
**भिज्ञ**—वि. तज्ज्ञ.
**भिड**—स्त्री. गांधीलमाशी.
**भिडना**—क्रि. अ. [ अनु. ] १ टक्कर होणें. २ लढणें, झगडणें. ३ चिकटणें.
**भितल्ला**—पु. अस्तर. वि. आंतला; आंतील.
**भित्ति**—स्त्री. १ भिंत. २ भीति; भय.
**भिद्**—पु. भेद; अंतर; फरक.
**भिदना**-क्रि. अ. १ टोंचणें; बोंचणें. २ घायाळ होणें. ३ शिरणें; घुसणें.
**भिनकना—भिनभिनाना**—क्रि. अ. [ अनु. ] भणभणणें; घोंघावणें.
**भिनसार**—पु. प्रभात; सकाळ.
**भिन्न**—वि. १ अन्य; दुसरा. २ अलग; पृथक्. पु. अपूर्णांक.
**भिलावाँ**—पु. भिलावा; बिब्बा.
**भिश्त***—स्त्री. [ फा. ] स्वर्ग.

**भिश्ती**–पु. [?] पखाली.
**भींगना, भीगना**–क्रि. अ. ओलें होणें; भिजणें.
**भींजना***–क्रि. अ. १ भिजणें. २ आनंदित होणें. ३ स्नेह जोडणें. ४ स्नान करणें. ५ सामावणें.
**भी**–स्त्री. भय; भीति. अव्य. १ देखील; हि; सुद्धां. २ अवश्य; जरूर. ३ अधिक; जादा. ४ पर्यंत.
**भीख, भोष***–स्त्री. भीक.
**भीखन***–वि. भीषण; भयानक.
**भीगना–भीजना**–क्रि. अ. भिजणें; आर्द्र होणें.
**भीटा**–पु. [दे.] १ अुंचवटा. २ पानमळ्याकरितां अुंच केलेली जमीन.
**भीड**–*स्त्री. [अनु.] गर्दी; दाटी. (मु.) **भीड छँटना**–गर्दी कमी होणें. **भीड लगना**–गर्दी जमणें.
**भीडना***–क्रि. १ लावणें २ चोळणें.
**भीत**–स्त्री. भिंत. (मु.) **भीत में दौडना**—आकाशाला गवसणी घालणें.
**भीत**–वि. भ्यालेला.
**भीतर**–क्रि. वि. आंत. पु. १ अंतःकरण. २ अंतःपुर.
**भीतरी**–वि. १ आंतील. २ गुप्त.
**भीति**–स्त्री. १ भय; भीति. २ थरकांप.
**भीति**–स्त्री. भिंत.
**भीती***-स्त्री. भिंत.
**भीती**–स्त्री. भय; भीति.
**भीना**–वि. भिजलेला; ओला; आर्द्र.
**भीनी**–वि. १ आर्द्र. २ मधुर; मंद.
**भीमकाय**–वि. अवाढव्य शरीराचा.
**भीमसेन**—पु. भीम; अर्जुनाचा मोठा भाअू. [अुत्तम कापूर.
**भीमसेनी कपूर**–पु. अेक प्रकारचा
**भीर**–स्त्री. [अनु.] १ गर्दी, २ दुःख, कष्ट. ३ संकट; आपत्ति. वि. १ भयभीत; भ्यालेला. २ भित्रा; भ्याड.
**भीरु**—वि. भित्रा. [समीप.
**भीरे**–क्रि. वि. [अनु.] जवळ;
**भील**—पु. भिल्ल.
**भीलनी**—स्त्री. भिल्लीण.
**भीषज***—पु. वैद्य. [२ दुष्ट.
**भीषण**—वि. १ भयंकर; भयानक.
**भुँअि***–स्त्री. भुअी; जमीन.
**भुँअिहरा**–पु. तळघर.
**भुअंग***–पु. भुजंग; सर्प.
**भुअन–वन**–पु. १ भवन; मोठें घर. २ जग; लोक.
**भुआर–ल***–पु राजा.
**भुअिँडोल**–पु. भूकंप.
**भुक्तभोगी**–वि. (त्रास, दुःख) भोगलेला; अनुभवी. [सुख. ३ अधिकार.
**भुक्ति**–स्त्री. १ भोजन. २ लौकिक

**भुक्खड**–पु. १ भुकेलेला; बुभुक्षित. २ अधाशी. ३ दरिद्री; गरीब.
**भुखमरा**–वि. १ भुकेकंगाल; अुपासमार झालेला. २ अधाशी.
**भुखमरी**–स्त्री. अुपासमार; दुष्काळ.
**भुगतना**–क्रि. स. भोगणें; सहन करणें.
**भुगतना**–क्रि. अ. पूर्ण होणें.
**भुगतान**–पु. १ परतफेड. २ भरपाअी. ३ निकाल; निवाडा.
**भुगताना**–क्रि. स. १ भोगावयास लावणें. २ व्यतीत करणें; घालविणें. ३ परतफेड करणें.
**भुच्च, भुच्चड**–वि. मूर्ख; बेअकली.
**भुजंग**–पु. साप; नाग.
**भुजपाश**–पु. गळ्यांत हात घालणें.
**भुजबाथ***–पु. कूस; अुत्संग; मांडी.
**भुजा**–स्त्री. १ हात. २ बाहु; दंड.
**भुजाली**–स्त्री. बरची; कट्यार.
**भुजिया**–पु. कोरडी भाजी.
**भुट्टा**–पु. कणीस. [पतंग ( किडा ).
**भुनगा**–पु. [ अनु. ] १ भुंगा. २
**भुनना**–क्रि. अ. भाजणें.
**भुनभुनाना**–क्रि. अ. [ अनु. ] १ पुटपुटणें २ कुढणें.
**भुनाना**–क्रि. स. मोड करणें.
**भुनाना**–क्रि. स. भाजविणे.
**भुवि***–स्त्री. भूमि; जमीन.
**भुरकना**–क्रि. अ. १ सुकून भुरकट होणें. २ विसरणें.
**भुरकाना**–क्रि. स. १ भुरभुरणें. २ बिखुरणें; टाकणें. ३ भुलविणें; फूस लावणें.
**भुरकुस** — पु. भुसकट; चुरा.
( मु. ) **भुरकुस निकालना**– १ कंबरडें मोडणें. २ चुराडा होणें.
**भुरता**–पु. १ कोचा पडलेली वस्तु. २ भरीत; रायतें.
**भुरभुरा**—वि. [ अनु. ] फुसका; भुसभुशीत. [ फसविणें.
**भुरवना***—क्रि. स. भुलविणें;
**भुराअी***—स्त्री. भोळेपणा.
**भुराना***—क्रि. स. १ विसरणें. २ भुलविणें; फसविणें.
**भुलक्कड** — वि. विसराळू.
**भुलसना**–क्रि. अ. करपणें; पोळणें.
**भुलाना**–क्रि. स. विसरविणें; विसर पाडणें. क्रि. अ. भुलणें; विसरणें.
**भुलावा**–पु. १ दगा; धोका. २ थाप.
**भुवन**–पु. १ जग. २ लोक (तीन).
**भुवपाल, भुवाल***-पु. भूपाल; राजा.
**भुस**—पु. भुस्सा.
**भुसी***—स्त्री. भुसकट, तूस.
**भूँकना**–क्रि. अ. [अनु.] १ भुंकणें. २ बडबड करणें. [ फुग्गाणे अि.
**भूँजा**—पु. १ भडभुंजा २ लाह्या,

**भूअी**—स्त्री· [ दे. ] कापसासारखा मअू लहान तुकडा.
**भूकप**—पु· धरणीकंप; भूकंप.
**भूख**-स्त्री· १ भूक; क्षुधा. २ आवश्यकता; जरूरी. ३ अिच्छा; लालसा.
**भूखना*** क्रि.स· सजावणें; शृंगारणें.
**भूखा**—वि.पु· १ भुकेलेला. २ गरजू ३ गरीब; दरिद्री.
**भूचाल**—पु· भूकंप.
**भूडोल**—पु· भूकंप.
**भूत**-पु· १ भूत. २ प्राणी. ३ पंचतत्त्व.
**भूतपूर्व**—वि· माजी; यापूर्वीचा.
**भूतल**—पु· पृथ्वी; जग.
**भूति**—स्त्री· १ वैभव. २ राख. ३ अुत्पत्ति. ४ वृद्धि; अधिकता.
**भूधर**—पु· १ पर्वत; डोंगर. २ शेषनाग. ३ विष्णु. ४ राजा.
**भूनना**—वि.स· १ भाजणें. २ तळणें. ३ सतावणें.
**भूभल**—स्त्री· गरम रेती.
**भूभुरि***—स्त्री· तापलेली रेती.
**भूमंडल**—पु· पृथ्वीचा गोल.
**भूमि**—स्त्री १ जमीन. २ पृथ्वी.
**भूमिका**—स्त्री· प्रस्तावना. [देवता.
**भूमिया**—पु· १ जमीनदार. २ ग्राम-
**भूर**—पु· रेती; वाळू.
**भूर-रि**—वि· पुष्कळ; अधिक.
**भूरा**—पु· १ भुरा; करडा रंग. २ साखर. वि· मळकट रंगाचा; खाकी.
**भूरि, भूरी**—वि· पुष्कळ; अधिक; मोटा.
**भूल**—स्त्री· १ विस्मरण. २ चूक; कसूर. ३ अपराध. ४ अशुद्धि.
**भूलना**—क्रि.स· १ विसरणें. २ चूक करणें. ३ हरविणें; गमविणें. क्रि.अ· १ विस्मरण होणें. २ चूक होणें. ३ गर्विष्ठ होणें. ४ हरवणें.
(मु.) **भूलाभटका**—वाट चुकलेला; चुकून आलेला.
**भूलभुलैया**—स्त्री· चक्रव्यूह.
**भूवा**—पु· कपाशी. [प्रसिद्ध महाकवि.
**भूषण**—पु· १ दागिना. २ हिन्दीचे
**भूषना***—क्रि. स· भूषविणें; सजविणें.
**भूषा**—स्त्री· १ दागिना; अलंकार. २ सजावट.
**भूसन**—पु· भूषण; दागिना.
**भूसा**—पु· भूस. [ २ तूस; कोंडा.
**भूसी**—स्त्री· १ भूस; भुसकट.
**भृकुटि**—स्त्री· भिंवअी; भुंवअी.
**भेंटना**—क्रि· स· १ भेटणें. २ आलिंगन देणें.
**भेंट**—स्त्री· १ भेट; मुलाखत. २ भेट; नजराणा. (मु.) **भेंट करना**—देणें; अर्पण करणें. [करणें.
**भेंवना**—क्रि· स· भिजविणें; ओलें

**भेजना**—क्रि. स. पाठविणें; रवाना करणें.
**भेजवाना**—क्रि. स. रवाना करविणें.
**भेजा**—पु. मेंदू; मगज.
**भेड**—स्त्री. मेंढी. **भेडा**—पु. मेंढा.
(मु.)**भेडिया धसान**-अंधानुकरण.
**भेडिया**—पु. लांडगा.
**भेद**—पु. १ भेद; फरक. २ रहस्य.
**भेदिया, भेदी**—पु. १ हेर; गुप्तचर. २ रहस्य जाणणारा. ३ घरभेद्या.
**भेरी**—स्त्री. नगारा; दुंदुभी.
**भेरीकार**—पु. नगारा वाजविणारा.
**भेला***—पु. १ भेट. २ टक्कर.
**भेली**—स्त्री. [ ? ] गुळाचा खडा; लहान ढेप.
**भेव***—पु. रहस्य; गौप्य.
**भेवना**—क्रि. स. भिवविणें.
**भेषज**—पु. औषध.
**भेषना***—क्रि. स. १ सोंग घेणें; वेषांतर करणें. २ कपडे घालणें.
**भेस**—पु. वेष. [ कपडे घालणें.
**भेसना***—क्रि. स. पोषाक करणें;
**भैंस**—स्त्री. म्हैस. **भैंसा**—पु. रेडा.
**भै***—पु. भय.
**भैक्ष**—पु. भीक.
**भैचक—क्क***—वि. चाकित.
**भैजन***—वि. भयावह.
**भैना**—स्त्री. बहीण.
**भैयस**—पु. संपत्तींतील भावाचा हिस्सा.
**भैया**—पु. भाऊ.
**भैयादूज**—स्त्री. भाऊबीज.
**भैरव**—वि. भयकर. पु. शंकर
**भैरवी**—स्त्री. १ दुर्गा; चामुंडा. २ एक रागिणी. [ करणें; खुपसणें.
**भोंकना**— क्रि.स. [ अनु. ] भोस-
**भोंडा**—वि. [ दे. ] कुरूप. **भोंडापन**—पु. कुरूपता.
**भोंदू**—वि. मूर्ख; बेअक्कल.
**भोंपू**—पु. [ अनु. ] तुतारी; भोंगा.
**भोई**—पु. भोई; कोळी; पालखी वाहाणारा. [ उपभोग घेणारा.
**भोक्ता**—वि. भोजन करणारा;
**भोग**—पु. १ सुखदुःखाचा अनुभव. २ दुःख; कष्ट. ३ नैवेद्य.
**भोगना**—क्रि. अ. भोगणें; सहन करणें; उपभोग घेणें.
**भोगबंधक**—पु. भोगवटा. [चमकी.
**भोगली**—स्त्री. [ दे. ] नाकांतील
**भोगवना**—क्रि. अ. उपभोगणें.
**भोज—भोजन-भोजू***—पु. १ भोजन. २ मेजवानी; जेवणावळ.
**भोटिया**—पु. भूटान (भूतान) देशचा राहाणारा.
**भोटिया—बादाम**—पु. [दे.] १ अमसूल. २ भुईमुगाची शेंग.

**भोथरा**—*वि.* बोथट.
**भोपा**—*पु.* [अनु.] १ भोंगा (गिरणीचा वगैरे). २ मूर्ख.
**भोर**—*पु.* पहाट.
**भोर**—*वि.* स्तिमित; चकित.
**भोरा***—*वि.* भोळा; **भोराअी**—*स्त्री.* भोळेपणा.
**भोराना***—*क्रि. स.* फसविणें; धोक्यांत पाडणें. *क्रि. अ.* फसणें; धोक्यांत पडणें.
**भोला**—*वि.* १ भोळा; सरळ. २ मूर्ख.
**भोलाभाला**—*वि.* भोळा; सरळ.
**भौं**—*स्त्री.* भुवअी. [ २ बडबडणें.
**भौंकना**—*क्रि. अ.* [अनु.] १ भुंकणें.
**भौंर**—*पु.* १ पाण्याचा भोंवरा. २ भुंगा. ३ काळा घोडा.
**भौंरा**—*पु.* १ भोंवरा. २ मधमाशी. ३ खेळण्याचा भोंवरा. ४ धनगरानें बाळगलेला कुत्रा.
**भौंरी**—*स्त्री.* १ गाकर; बाटी. २ पाण्यांतील किंवा केसांतील भोंवरा.
**भौंरा**—*पु.* १ तळघर. २ पेंव; कोठार.
**भौंह**—*स्त्री.* भुंवअी. **भौंह चढाना**—अथवा **तानना**—नाराज होणें; रागावणें. **भौंह जोहना**—खुशामत करणें.
**भौ**—*पु.* भय; भीति.
**भौ**—*पु.* जग; दुनिया.
**भौचक**—*वि.* आश्चर्यचकित; स्तंभित.
**भौज, भौजाअी, भौजी**—*स्त्री.* भावजय
**भौन***—*पु.* घर.
**भौना***—*क्रि. अ.* चकरा मारणें; फिरणें. [ २ लहान नाव.
**भौलिया**—*स्त्री.* १ छपरी नाव.
**भौसा**—*पु.* [दे.] १ दाटी; गर्दी. २ गडबड.
**भ्रमण**—*पु.* फिरणें; हिंडणें.
**भ्रमना**—*क्रि. अ.* १ फसणें. २ भटकणें.
**भ्रष्ट**—*वि.* पतित; बिघडलेला; वाअीट.
**भ्रांत**—*वि.* १ भ्रमिष्ट. २ व्याकुळ; अस्वस्थ. [**मान**—*वि.* शोभायमान.
**भ्राजना***—*क्रि. अ.* शोभणें **भ्राज**-
**भ्रात-भ्राता**—*पु.* १ भाअू; बंधु. २ मित्र.
**भ्रामर**—*पु.* मध.
**भ्रू**—*स्त्री.* भुंवअी.
**भ्वहरना***—*क्रि. अ.* भयभीत होणें.

## म

**मँगन**—*पु.* भिकारी.
**मँगनी**—*स्त्री.* १ मागणी. २ साखरपुडा (लग्नाचा). ३ अुसनी वस्तु.
**मँगवाना, मँगाना**—*क्रि. स.* मागविणें. [ घातलेली.
**मँगेतर**—*वि.* मागणी घातलेला किंवा

**मंच**–*पु·* १ खाट. २ रंगमंच; रंगभूमि; स्टेज. ३ मंडप. [ पावडर.
**मंजन**–*पु·* दंतमंजन; राखुंडी; टूथ
**मँजना**–*क्रि· अ·* १ घांसलें जाणें; स्वच्छ होणें. २ अभ्यास होणें; तयारी होणें.
**मँजाना**–*क्रि· स·* घांसवून घेणें.
**मंजिल**–*स्त्री·* [ *अ·* ] १ मुक्कामाची जागा. २ अिमारतीचा मजला. ३ टप्पा; मजल. [ अधिकार.
**मंजिलत**–*स्त्री·* [ *अ·* ] हुद्दा; पद;
**मंजीर**–*पु·* नूपुर; घागऱ्या.
**मंजु**–*वि·* सुन्दर; मनोहर; स्वच्छ.
**मंजूर**-*वि·*[*अ·*]मान्य;स्वीकृत;कबूल.
**मंजूरी**–*स्त्री·*[*अ·*]स्वीकृति; मान्यता; परवानगी.
**मँझधार**–*स्त्री·* प्रवाहाचा मध्यभाग *क्रि· वि·* प्रवाहाच्या मधोमध.
**मँझना**–*क्रि· अ·* पाहा 'मँजना'.
**मंझला**–*वि·* मधला.
**मंझा***–मधला; मधोमध असलेला.
**मँझार**-*क्रि· वि·* मध्यभागीं.
**मँझियाना**–*क्रि· स·* [ ? ] ओलांडणें; पलीकडे जाणें.
**मँझियार**–*वि·* मधला.
**मंडना**–*क्रि· स·* १ सजविणें. २ समर्थन करणें. [ येणें.
**मंडरना**–*क्रि·अ·* घेरून येणें; भरून
**मँडराना, मँडलाना**–*क्रि· अ·* १ सभोंवतीं अुडविणें. २ सभोंवतीं फिरणें; घिरट्या घालणें.
**मंडल**–*पु·*१ मंडळ;संस्था. २ परीघ; घेर; वर्तुळ. ३ खळें ( सूर्य-चंद्रांना पडणारें. ) ४ क्षितिज.
**मँडवा**–*पु·* मांडव; मंडप.
**मंडार**–*पु·* करंडा; पेटारा.
**मंडी**-*स्त्री·* बाजार.
**मंत**–*पु·* १ सल्ला. २ मंत्र. [मनीषा.
**मंतव्य**–*पु·* १ मत; विचार. २ हेतु;
**मंत्र**–*पु·* १ मंत्र; गुरुमंत्र. २ सल्ला; परामर्श; वेदाची अृचा. ( यो. ) **मंत्रयंत्र-यंत्रमंत्र**–मंत्रतंत्र; जादूटोणा.
**मंत्रणा**–*स्त्री·* १ सल्ला. २ मसलत.
**मंत्री**–*पु·* सचिव; अमात्य; मंत्री; सल्लागार. [ निवासस्थान.
**मंदिर**–*पु·* १ मंदिर; देअूळ. २
**मंशा, मंसा**–*स्त्री·* [*अ·*] १ अिच्छा; मनीषा. २ आशय; हेतु.
**मंसब**–*पु·*[*अ·*]·१ दर्जा;पदवी;हुद्दा. २ कर्तव्य. ३ अधिकार.
**मंसूख**–*वि·* [ *अ·* ] रद्द केलेला; काढून टाकलेला.
**मअल्ल**–*वि·* [ *अ·* ] तर्कानें किंवा युक्तिवादानें सिद्ध केलेला. *पु·* निष्कर्ष.

**मआज़-अल्लाह**-[अ.] परमेश्वर रक्षण करो. [२ अुद्देश्य; हेतु.
**मआनी, मानी**-पु. [अ.] १ अर्थ.
**मआश**-स्त्री. [अ.] १ अुपजीविकेचें साधन. २ जमीनदारी.
**मअी**-पु. [अिं.] मे महिना.
**मकडा**-पु. मोटा कोळी (किडा).
**मकडी**-स्त्री. १ कोळी. २ कातीण.
**मकतब**-पु. [अ.] १ लहान मुलांची शाळा. २शाळा; विद्यालय.
**मकतल**-पु. [अ.] १ वधस्थान; फांशीची जागा. २ प्रियकरणीचें विहार-स्थल. [लिखाण. २ पत्र.
**मकतूब**-वि. [अ.] लिखित. पु. १
**मकदूर**-पु. [अ.] १ सामर्थ्य; शक्ति. २ ताबा; अधिकार. ३ समावेश.
**मकनातीस**-पु. [अ.] लोहचुंबक.
**मकफूल**-वि. [अ.] गहाण ठेवलेला.
**मकबरा**-पु. [अ.] समाधिस्थान; थडगें.
**मकबूल**-वि. [अ.] १ कबुली दिलेला. २ पसतीस योग्य; छान. ३ निवड केलेला; लोकप्रिय.
**मकरतार**-पु. [दे.] कलाबतू.
**मकरूज़**-वि. [अ.] ऋणकरी; देणेदार.
**मकसद**-पु. [अ.] १ अुद्देश; ध्येय. २ आकांक्षा; कामना.
**मकसूद**-वि. [अ.] अुद्दिष्ट; आभिप्रेत; गर्भित.
**मकान**-पु. [अ.] १ घर. २ स्थान.
**मकाम**-पु. [अ.] १ स्थान; जागा. २ मुक्कामाची जागा. [स्थानिक.
**मकामी**-वि. [अ.] १ स्थिर. २
**मकु***-अव्य. १ वाटेल तें. २ अुलट पक्षीं. ३ कदाचित्. ४ जरी; यद्यपि. ५ अितकेंच नव्हे तर.
**मकुना**-पु. १ बिन-दांताचा हत्ती (नर). २ बिन-मिशांचा माणूस.
**मकुनी**-स्त्री. बेसनरोटी.
**मकोडा**-पु. किडा.
**मकोय**-स्त्री. बोराअेवढें अेक आंबट रसाळ फळ; राजबेरी. [पिरगळणें.
**मकोरना**-क्रि. स. मुरगळणें;
**मक्का**-पु. [अ.] अरबस्तानांतील अेक प्रसिद्ध शहर; हें मुसलमानांचें सर्वांत मोठें तीर्थस्थळ आहे.
**मक्कार**-वि. [अ.] १ कपटी. २ धूर्त; लबाड.
**मक्खन**-पु. लोणी. (मु.) **कलेजे पर मक्खन मला जाना**-शत्रूची हानि पाहून आनंद मानणें.
**मक्खी**-स्त्री. १ माशी. २ मधमाशी. (मु.) **जीती मक्खी निगलना**-जाणून बुजून हानिकारक काम करणें.
**मक्खीचूस**-वि. कंजूष; चिक्कू.

**मख**—पु. यज्ञ.
**मखज़न**—पु. [अ.] १ कोष; खजिना. २ शब्दकोश.
**मखतूल**—पु. काळें रेशीम.
**मखतूली**—वि. काळ्या रेशमापासून बनलेला.
**मखनिया**-पु. लोणीविक्या.
**मख़मल**—स्त्री. मखमल.
**मखलूक**—वि. [अ.] रचलेलें; निर्माण केलेलें.—स्त्री. १ निर्माण केलेली वस्तु. २ सृष्टींतील जीवजंतु वगैरे. **मखलूकात**—स्त्री. सृष्टींतील प्राणी.
**मखाना**—पु. मकाणा (अेक औषध).
**मखौल**—पु. [दे.] थट्टामस्करी.
**मग**—पु. मार्ग; रस्ता. [द्वीपी ब्राह्मण.
**मग**—पु. १ मगध देश. २ शाक-
**मगज़ी**—स्त्री. [दे.] किनारीला लावण्याचा गोटा; जर.
**मगदल**—पु. मुगदळाचा लाडू.
**मगन**—वि. १ निमग्न; मग्न; तल्लीन. २ प्रसन्न.
**मगफ़ूर**—वि. [अ.] कैलासवासी.
**मग़मूम**-वि. [अ.] दुःखी; उदास.
**मगर**—पु. मगर; सुसर. (यौ.)
**ममगरमच्छ**—पु. १ सुसर. २ मोठा मासा.
**मगर**—अव्य. [अ.] परंतु; पण.
**मग़रिब**—पु. [अ.] पश्चिम दिशा.
**मग़रिबी**—वि. [अ.] पाश्चात्य.
**मगरूर**—वि. [अ.] घमेंडखोर.
**मगहर**—पु. मगध देश.
**मगु**—पु. मार्ग.
**मगज़, मग्ज़**—पु. [अ.] १ मेंदू; मगज. २ गीर. **मगज़-पच्ची**-डोकेंफोड.
**मग्ज़ी**—स्त्री. [अ.] समास; मार्जिन.
**मग्न**—वि. पाहा ‘मगन’
**मचक**—स्त्री. [अनु.] दाब.
**मचकना**—क्रि. स. [अनु.] १ दाबणें; चेपणें; चिरडणें. क्रि. अ. दबणें; चेपलें जाणें.
**मचना**—क्रि. अ. [अनु.] १ माजणें; गडबड होणें. २ फैलणें; पसरणें.
**मचलना**—क्रि. अ. [अनु.] हट्ट करणें; अडून बसणें.
**मचला**—वि. [अनु.] १ अैन बोलण्याच्या वेळीं जाणून बुजून गप्प राहणारा. २ मळमळ करविणारी वस्तु. [मळणें.
**मचलाना**—क्रि. अ. [अनु.] मळ-
**मचान**—स्त्री. मचाण.
**मचाना**—क्रि. स. [अनु.] माजविणें; गडबड करणें.
**मचिया**—स्त्री. लहान बाज.
**मच्छड-मच्छर**—पु. डांस; मच्छर.

**मच्छरता***-स्त्री· मत्सर; असूया.
**मछली**–स्त्री· मासा; मासळी.
**मछुआ–वा**—पु· १ मासे धरणारा कोळी. २ नावाडी.
**मज़दूर**—पु· [फा.] मजूर; हमाल. **मजदूरी**—स्त्री· मजुरी; ·मजुरीचे पैसे किंवा काम.
**मजना**-क्रि· अ· १ निमग्न होणें; तल्लीन होणें. २ अनुरक्त होणें.
**मजनूँ**-वि· [अ·] १ प्रेमवेडा. २ रोडका; सडसडीत अंगाचा. पु· प्रेमवीर. [पक्का. २ सबळ.
**मजबूत**-वि· [अ·] १ दृढ; टिकाऊ;
**मज़बूती**—स्त्री· [अ·] मजबुती; दृढता.
**मजबूर**-वि· [अ·] लाचार; विवश. **मजबूरी**-स्त्री· लाचारी; विवशता; नाअिलाज. **मजबूरन्**-क्रि· वि· अनिच्छापूर्वक; निरुपायास्तव.
**मजमा**—पु· [अ·] १ लोकांची गर्दी; दाटी. २ जमाव; समुदाय.
**मज़मून**--पु· [अ·] १ मजकूर. २ निबंध. ३ विषय.
**मजलिस**--स्त्री· [अ·] १ सभा; बैठक. २ समारंभ. ३ नाच-गाण्याची बैठक; मैफल. ४ समिति.
**मज़लूम**--वि· [अ·] जुलमानें त्रासलेला; अत्याचार-पीडित.
**मज़हब**-वि· [अ·] १ धर्म. २ धार्मिक संप्रदाय; पंथ. **मज़हबी**-वि· १ धार्मिक. २ सांप्रदायिक.
**मज़हबी**—पु· [अ·] शीख भंगी.
**मज़ा**-पु· [फा.] १ मौज, आनंद; गंमत. २ थट्टा. ३ स्वाद; लज्जत. (मु.) **मज़ा चखाना**–हात दाखविणें; अद्दल घालविणें.
**मज़ाक**—पु· [अ·] थट्टामस्करी.
**मज़ाकन्**—क्रि· वि· [अ·] हंसत हंसत; थट्टेनें.
**मज़ाकिया**-वि· [अ·] १ विनोदी; थट्टेखोर. २ गमतीचें; थट्टेवाअीक.
**मज़ार**—पु· [अ·] १ समाधि. २ कबर; थडगें. [प्राज्ञा; सामर्थ्य.
**मजाल**—स्त्री· [अ·] बिशाद,
**मजीठ**–स्त्री· अेक वनस्पति (हिच्यापासून लाल रंग निघतो); मंजिष्ट.
**मजीद**—वि· [अ·] १ पवित्र; पूज्य. २ मोठा; श्रेष्ठ. पु· कुराण.
**मज़ीद्**–पु· [अ·] अधिकता; वि· वाढविलेला; अधिक.
**मजीर**—स्त्री· मंजिरी.
**मजीरा**—पु· टाळ (लहान).
**मजूर**—पु· १ मोर. २ मजूर.
**मज्जन**-पु· स्नान; बुडी मारणें.
**मज्झ***—क्रि· वि· मध्यें; मधोमध.

**मझधार**–*स्त्री*· १ नदीची मध्यधारा. २ कार्याचा मध्य.

**मझला-मझोला** —*वि*· १ मधला. २ मध्यम आकाराचा.

**मझोली**·*स्त्री*· अेक प्रकारची बैलगाडी.

**मटक**–*स्त्री*· १ नखरा; हावभाव. २ नखरेल चाल.

**मटकना**—*क्रि*· *अ*· १ हावभाव करीत चालणें; अंगविक्षेप करणें. हावभाव दाखविणें; मुरडणें.

**मटका**—*पु*· मडकें. **मटकी**–*स्त्री*· लहान मडकें. [ हावभाव करणें.

**मटकाना**-*क्रि*· *स*· नखरे करणें;

**मटकीला**—*वि*· नखरेबाज.

**मटकौअल-वल**—*स्त्री*· नखरा; हावभाव.

**मटमैला**–*वि*· मळखाअू; खाकी.

**मटर**–*पु*· मटार; वाटाणा. [फटका.

**मटरगश्त**—*पु*· [*सं*· + फा.] फेर-

**मटिया-मसान**—*वि*· १ चुथडा झालेला. २ नष्टप्राय. **मटियामेट**-*वि*· मातीस मिळालेला; सत्यानाश.

**मटुका**–*पु*· मडकें.**मटुकी**·*स्त्री*·मडकें.

**मट्टी**—*स्त्री*· माती.

**मट्ठा**—*पु*· ताक. [ महंत.

**मठी**—*स्त्री*· लहान मठ. *पु*· मठाचा

**मठोर**—*स्त्री*· दह्याचें मडकें.

**मडुआ-वा**—*पु*· [ दे. ] नाचणी.

**मढ**—*वि*· अडेलतट्टू; हट्टी.

**मढना**—*क्रि*· *स*· १ मढविणें. २ माथीं मारणें. ३ गळ्यांत घालणें. ४ वाद्याला चामडें बसवणें.

**मढवाना**–*क्रि*·*स*· मढवून घेणें.

**मढाअी**—*स्त्री*· मढविण्याचें काम किंवा मजुरी.

**मढी**—*स्त्री*· १ लहानसा मठ. २ झोंपडी. ३ लहान देअूळ. ४ लहान मंडप.

**मणि**—*स्त्री*· १ रत्न. २ मणि.

**माणि**–*पु*· जीभ (धनुकलींतील चाम-ड्याचा तुकडा ). [ पंथ.

**मत**-*पु*· १ मत; विचार. २ सिद्धांत;

**मत**–*क्रि*·*वि*· नको; नाहीं.

**मतना**–*क्रि*· *अ*· मत बनविणें.

**मतना**—*क्रि*· *अ*· अुन्मत्त होणें; माजणें. [ छापखाना.

**मतबा**—*पु*· [ *अ*· ] मुद्रणालय;

**मतलब** -*पु*· [*अ*·] १तात्पर्य;आशय. २ अर्थ. ३ स्वार्थ. ४ विचार; हेतु. ५ संबंध. **मतलबी**—*वि*· स्वार्थी; आप्पलपोट्या.

**मतली**—*स्त्री*· [ अनु. ] मळमळ.

**मतवाला**–*वि*· *पु*·, १ मदोन्मत्त. २ निशेंत चूर; झिंगलेला. ३ वेडा; अुन्माद झालेला. [ अधिकार.

**मताधिकार**—*पु*· मत देण्याचा

**मतावलंबी**-पु. विशिष्ट मताचा किंवा संप्रदायाचा.
**माति** अव्य. समान; सदृश; तुल्य.
**माति**—स्त्री. १ बुद्धि. २ सल्ला; संमति. **मातिमंत**-वि. बुद्धिवान्.
**मतीरा**—पु. टरबूज.
**मतेअी**—स्त्री. सावत्र आअी.
**मत्त**-वि. १ माजलेला; मस्त. २ वेडा. ३ अुन्मत्त; मग्रूर. ४ प्रसन्न.
**मत्था**—पु. कपाळ; माथा. (मु.) **मत्थे मढना**-माथीं मारणें; दोष चिकटविणें.
**मथना**-क्रि. स. १ घुसळणें. २ अेकजीव करणें. ३ कालवणें. ४ अुध्वस्त करणें. ५ शोध लावणें. ६ अेखादी गोष्ट पुनः पुन्हां करणें.
**मथनियाँ***-स्त्री. १ दहीं घुसळण्याचें भांडें; डेरा. २ रवी.
**मथनी**—स्त्री. दह्याचें मडकें.
**मथानी**-स्त्री. रवी. (मु.) **मथानी पडना** अथवा **बहना**-खळबळ अुडणें. [मद्य. ३ आनंद; हर्ष.
**मद**-पु. १ नशा; मस्ती; गुंगी. २
**मद**-पु. [फा.] भरती (समुद्राची).
**मद**-स्त्री. [अ.] १ विभाग. २ खातें.
**मदक**-स्त्री. अफूच्या सत्त्वापासून बनलेला अेक मादक पदार्थ.
**मदकची**-वि. मदक पिणारा.
**मदकल**-वि. १ अुन्मत्त. २ मस्त; मदोन्मत्त. [केलेला.
**मदखला**-वि. [अ.] दाखल; जमा
**मदखूला**—स्त्री. [अ.] रखेली; अुपपत्नी. [मदोन्मत्त.
**मदगल**-वि. १ अुन्मत्त. २ मस्त;
**मदद**—स्त्री. [अ.] मदत; साहाय्य. **मददगार** — वि. मदतनीस; साहाय्यक.
**मदरसा**—पु. [अ.] शाळा.
**मदवा***-पु. मदिरा; दारू.
**मदहोश**-वि. [अ.] १ निशेंत चूर असलेला; मस्त. २ हतबुद्ध.
**मदोवै***-स्त्री. मंदोदरी.
**मद्देनज़र**—क्रि. वि. [अ.] दृष्टीसमोर; लक्षांत. [३ मंद.
**मद्धिम**-वि. १ मध्यम. २ साधारण;
**मध***-पु. मध्य. **माधिम** वि. मध्यम.
**मधुकर**—पु. भुंगा भ्रमर.
**मधुकरी**-स्त्री. १ भ्रमरी. २ भिक्षा; मधुकरी. [स्त्री.
**मधुबाला**—स्त्री. मद्य पाजविणारी
**मधुमक्खी**-स्त्री. मधमाशी.
**मधूक**-पु. १ मनुका; बेदाणा; द्राक्ष. २ मोहाचीं फुलें.
**मन**—पु. १ मन; अंतःकरण. २ अिच्छा; वासना. ३ विचार; कल्पना. (मु.) **किसीसे मन**

**अटकना, अुलझना या लगना**—अेखाद्यावर मन बसणें; प्रेम जडणें. **मनके मोदक या लड्डू खाना, मनके पुलाव पकाना**—मनांतले मांडे खाणें. **मन टूटना**—हताश होणें. **मन बहलाना**-मन गुंतविणें; करमणूक करून घेणें. **मनमाना**—अिच्छेप्रमाणें; यथेच्छ. **मन मैला करना**——अप्रसन्न होणें. **मन लगाना**——लक्ष लावणें. **मनसे अुतरना**—मनांतून अुतरणें. **मन ही मन**-मनांतल्या मनांत.

**मनका**—पु. मणका. (मु.) **मनका ढलना** अथवा **ढलकना**—मेल्यानंतर मान तुटणें.

**मनका**—पु. मणी.

**मनकूला**—वि. [अ.] १ स्थावरच्या अुलट; जंगम. **जायदाद मनकूला** जंगम अिस्टेट. **गैर मनकूला**—स्थावर (अिस्टेट). [कपोलकल्पना.

**मनगढंत**—वि. कपोलकल्पित. स्त्री.

**मनचला**—वि. १ रसिक. २ धाडशी. ३ निर्भय.

**मनचाहा**-वि. आवडीचा; पसंतीचा.

**मनचीता**—वि. १ विचारांतीं ठरलेलें. २ मनाजोगता; मनास येअील तसा.

**मनभाया**-वि. आवडीचा; मनोनुकूल.

**मनमाना**—वि. १ मनास येअील तसें. २ मनाजोगता; पसंतीचा. ३ खूप; यथेच्छ. [बेबनाव.

**मनमुटाव**——पु. आपसांतील तेढ;

**मनमौजी**—वि. खुशालचेंडू.

**मनवाना**—क्रि. स. समजूत घालणें.

**मनशा**—स्त्री. [अ.] १ मनीषा; अिच्छा. २ विचार; अिरादा. ३ हेतु.

**मनसना**—क्रि. स. १ अिच्छा करणें. २ संकल्प करणें.

**मनसब**——पु. [अ.] १ दर्जा; हुद्दा. २ काम. ३ अधिकार. **मनसबदार**—पु. हुद्देदार; अधिकारी

**मनसूख**-वि. [अ.] १ अप्रामाणिक ठरलेला. २ टाकाअू. ३ रद्द.

**मनसूबा**——पु. [अ.] १ युक्ति; कल्पना. २ अिरादा; विचार. (मु.) **मनसूबा बाँधना**—युक्ति योजणें.

**मनहुँ***—अव्य. जणूं; जसा.

**मनहूस**—वि. [अ.] १ अुदास. २ रड्या. ३ अशुभ.

**मना**-वि. [अ.] १ मनाअी केलेला; वर्ज्य. २ अनुचित.

**मनाक-ग***——वि. थोडा; अल्प.

**मनाना**—क्रि. स. १ स्वीकार करावयास लावणें. २ खुष करणें. ३ समजूत घालणें. ४ देवाला आळविणें. ५ नवस करणें.

**मनाही**—स्त्री. [अ.] मनाअी; बन्दी.

**मनिया**–स्त्री· १ मणी. २ मण्यांची माळ. [ २ सुंदर; शोभिवंत.
**मनियार***–वि· १ लखलखीत.
**मनिहार**–पु· कासार; बांगड्या विकणारा.
**मनी***–स्त्री· अहंकार; घमेंड. [मनु.
**मनु**–पु· १ मन. २ विष्णु. ३ वैवस्वत
**मनु***–अव्य. जणूं.
**मनुआँ***–पु· मनुष्य.
**मनुआँ–वाँ**–पु· मन.
**मनुष–स**–पु· मनुष्य; माणूस.
**मनुसाअी***–स्त्री· १ पराक्रम; पुरुषार्थ. २ माणुसकी.
**मनुहार–रि**–स्त्री· १ मनधरणी; खुशामत. २ आदरसत्कार.
**मनुहारना***–क्रि· स· १ खुशामत करणें. २ विनंती करणें. ३ आदर-सत्कार करणें.
**मनोज्ञ**–वि· सुंदर; मनोहर.
**मनोनीत**–वि· १ निवडून आलेला. २ पसंतीचा; मनपसंत.
**मनोनीत–सभापति**–पु· निवडून आलेला अध्यक्ष. [ अवधान.
**मनोयोग**–पु· लक्ष; ध्यान; अेकाग्रता;
**मनोरंजन**–पु· मनोरंजन; करमणूक.
**मनोरा**–पु· भिंतीवर पूजा करण्या-करितां शेणानें काढतात तीं चित्रें ( दिवाळीनंतर ).
**मनोहारी**–वि· मनोहर; सुंदर.
**मनौती**–स्त्री· नवस.
**मन्नत**–स्त्री· नवस. ( मु. ) **मन्नत अुतारना** किंवा **चढाना**–नवस फेडणें. **मन्नत मानना**–नवस करणें.
**ममता**–स्त्री· १ आत्मीयता; आपले-पणा. २ प्रेम, मोह, लोभ; वात्सल्य. [वगैरे ).
**ममेरा**–वि· मामाचा; मामे ( भाअू
**मयंक**–पु· चंद्र.
**मय**–स्त्री· अव्य. पाहा ' मै '
**मयन***–पु· मदन; कामदेव.
**मयस्सर**–वि· [अ.] १ अुपलब्ध. २ सुलभ. [ जग. ३ प्रेमपाश.
**मया***–पु· स्त्री· १ मायाजाल. २
**मयार**–वि· दयाळू.
**मयारी**–स्त्री· [ दे. ] तुळअी. ( विशेषतः झोपाळ्याची ).
**मय्या***–स्त्री· आअी.
**मरकज़**–पु·[अ.] १ केंद्र, मध्यस्थान. २ अुर्दू लिपींत कांहीं अक्षरांवर असणारी लहान तिरपी रेघ.
**मरगजा***–वि· चुरगळलेला.
**मरघट**–पु· स्मशान. [ संवय.
**मरज़**–पु· [अ.] १ रोग. २ वाअीट
**मरजाद***–स्त्री· १ मर्यादा;, सीमा. २ मान; प्रतिष्ठा. ३ रीत; नियम.

**मराजिया**—*वि.* १ काळाच्या दाढें-तून वांचलेला. २ मरणासन्न; प्राण देण्यास तयार झालेला.

**मराजिया**—*पु.* समुद्रांतून मोती काढणारा.

**मरज़ी**—*स्त्री.* [*अ.*] मर्जी, अिच्छा.

**मरतबा**—*पु.* [ *अ.* ] १ वेळ; पाळी. २ चक्कर. ३ पदवी. [ करणें.

**मरदना**—*क्रि. स.* चोळणें; मर्दन

**मरदानगी**—*स्त्री.* [ फा. ] वीरता; शौर्य; धाडस.

**मरदाना**—*वि.* [ फा. ] १ पौरुषी; मर्दानी. २ वीरोचित. ३ पुरुषी.

**मरदूद**—*वि.* [ *अ.* ] १ तिरस्कृत; तुच्छ. २ नीच; अधम.

**मरना**—*क्रि. अ.* १ मरणें. २ हाल-अपेष्टा सोसणें; ३ कोमेजणें. ४ शरमिंधें होणें. ५ निरुपयोगी होणें. ६ हरणें. ७ आवेग थांबणें; थंडावणें.

**मरनी**—*स्त्री.* १ मरण; मृत्यु. २ मृत्युलोक. ३ क्लेश.

**मरफा**—*पु.* [ फा. ] ढोलकें.

**मरभुक्खा**—*वि.* १ अुपासमार झालेला; बुभुक्षित. २ दरिद्री; कंगाल.

**मरम-मरमु**—*पु.* मर्म; रहस्य.

**मरमर**—*पु.* [*अ.*] संगमरवर.

**मरम्मत**—*स्त्री.* [ *अ.* ] दुरुस्ती.

**मरवाना**—*क्रि. स.* मारविणें.

**मरसिया** —*पु.* १ अुर्दूतील शोक-गीत. २ मृत्युशोक.

**मरहट** —*पु.* स्मशान.

**मरहबा**—*अव्य.* [*अ.*] शाबास; वाहवा.

**मरहम, मलहम**—*पु.* [*अ.*] मलम.

**मरहला** — *पु.* [ *अ.* ] १ मजला. २ टप्पा; मजल.

**मरातिब**—*पु.* [ *अ.* ] १ घराचा मजला. २ दर्जा; मान, पद. ३ झेंडा.

**मरायल***—*वि.* १ मारखाअू. २ निर्बल.

**मराल**—*पु.* १ हंस. २ बदक. ३ घोडा. ४ हत्ती. **मराली**—*स्त्री.*

**मरिंद*** —*पु.* मकरंद. [ मरतुकडा.

**मरियल**—*वि.* अशक्त; दुबळा;

**मरी**—*स्त्री.* पटकी; महामारी.

**मरीचिका**—*स्त्री.* १ मृगतृष्णा. २ मृगजळ.

**मरीज़**—*पु.* [ *अ.* ] रोगी.

**मरु**—*वि.* कठिण; दुष्कर.

**मरुथल**—*पु.* वाळवंट.

**मरुभूमि**—*स्त्री.* वाळवंट.

**मरोड**—*पु.* १ पिरगळा. २ मुरड; पीळ. ३ दुःख. ४ मुरडा ( पोटांत होतो तो ).

**मरोडना**—*क्रि. स.* १ पिरगळणें. २ मोडणें; चुरगाळणें. ३ त्रास देणें.

**मरोडा**–पु. १ पीळ; मुरड. २ मुरडा (पोटांतील).
**मर्ग**- पु. [फा] मृत्यु.
**मर्ज़**–पु. [अ.] रोग; आजार.
**मर्तबा**–पु. पाहा 'मरतबा'
**मर्तबान**–पु. [अ.] १ चिनी मातीची बरणी (लोणचें वगैरे ठेवण्याची). २ कांचेची बरणी.
**मर्त्य**–पु. १ मनुष्य. २ शरीर. ३ भूलोक. *वि.* मरणारा.
**मर्द**—पु. [फा.] १ पुरुष. २घाडसी पुरुष. ३ पति. ४ शूर योद्धा.
**मर्दाना**—*वि.* पाहा 'मरदाना'
**मर्दुम**—पु. [फा.] मनुष्य. **मर्दुमी**- *स्त्री.* मर्दुमकी; शौर्य.
**मर्दुमशुमारी**–*स्त्री.* [फा.] १ खाने-सुमारी. २ जनसंख्या.
**मर्म**–पु. १ रहस्य. २ शरीरांतील नाजुक स्थान.
**मर्मज्ञ**–*वि.* रहस्य जाणणारा; तत्त्वज्ञ.
**मर्मर**–पु. [अ.] पाहा 'मरमर'.
**मर्मर**—पु. झुळझुळ ध्वनि; सौम्य आवाज. [मर्म; मख्खी.
**मर्मवाक्य**–पु. १ रहस्य; गौप्य. २
**मर्मान्तक**—*वि.* मर्मभेदी.
**मर्यादा–मर्य्यादा**—*स्त्री.* १ हद्द; सीमा. २ शिष्टाचार; सदाचार.
**मलंग**–पु.[फा.]अेक मुसलमान साधु.
**मल्ल**—पु. मळ; घाण.
**मलका**—*स्त्री.* [अ.] १ राणी. २ बादशाहाची पट्टराणी.
**मलखम**—पु. १ मल्लखांब. मल्ल-खांबाचा व्यायाम.
**मलना**–*क्रि. स.* १ घांसणें; रगडणें. २ चोळणें; मळणें. ३ चुरगळणें. ४ दाबणें. [किंवा धर्मगुरूचें वचन.
**मलफूज़**—पु. [अ.] महात्म्याचें
**मलबा**—पु. १ अिमारत पडल्यावर सांचलेला दगड, विटा, चुना अि. चा ढीग. २ केरकचरा.
**मलवाना**—*क्रि. स.* चोळून घेणें; चोळविणें.
**मलय**–पु. १ मलबार प्रदेश; केरळ. २ नंदनवन; चंदनवन. ३ अेक पर्वत.
**मलयसमीरण–मलयानिल**—पु. मलय पर्वतावरून येणारा सुगंधित वारा; मादक पवन; वसंत ऋतूं-तील वारा.
**मलाअी**–*स्त्री.* [दे.] १ दुधावरील साय; मळअी. २ सत्त्व; सार.
**मलान***—*वि.* म्लान; अुदास.
**मलामत**—*स्त्री.* [अ.] १ झिड-कारणें; धुडकावणी. २ घाण. ३ दूषित अंश.
**मलार**—पु. मल्हार राग.

**मलाल**—पु. [अ.] १ दुःख; अुद्विग्नता. २ अुदासीनता.
**मलाहत**—स्त्री. [अ.] १ सांवळेपणा २ चेहऱ्यावरील आभा; कांति.
**मलिंद**—पु. भुंगा.
**मलिक**—पु. [अ.] बादशाह; सम्राट.
**मलिका**—स्त्री. [अ.] राणी; सम्राज्ञी.
**मलिन**—वि. १ मळका; घाणेरडा. २ अुदास.
**मलिनाना***—क्रि. अ. मळणें.
**मलियामेट**—पु. सत्यानाश; नासधूस.
**मलीदा**—पु. [फा.] १ मअू लोकरीचें कापड. २ चुरमा.
**मलोला**—पु. [अ.] मनोव्यथा; दुःख. २ आतुरता. ३ प्रबल अिच्छा. (मु.) **मलोला** अथवा **मलोले आना**—१ दुःख होणें; पस्तावणें. **मलोले खाना**-मानसिक कष्ट सहन करणें. [२ कोळी.
**मल्लाह**—पु. [अ.] १ नावाडी.
**मल्लू**—पु. वानर; माकड.
**मल्हराना**—क्रि. स. चुचकारणें.
**मवक्किल**—पु. [अ.] अशील.
**मवाजिब**—पु. [अ.] ठराविक वेळीं मिळणारी वस्तु (पगार वगैरे).
**मवाद**—पु. [अ.] १ पू; घाण. २ सामग्री.
**मवास**—पु. १ आश्रयस्थान; किल्ला; गड. **मवास करना**—निवास करणें. **मवासी**—स्त्री. १ लहान किल्ला. २ किल्लेदार. ३ पुढारी.
**मवेशी**—पु. [अ.] गुरेढोरें.
**मवेशीखाना**-पु. [अ.+फा.] गोठा.
**मशक**—पु. १ मच्छर; डांस. २ मस.
**मशाक, मश्क**—स्त्री. [फा.] पखाल.
**मशक्क़त**—स्त्री. [अ.] १ मेहनत; परिश्रम. २ कष्ट. [मग्न.
**मशगूल**—वि. [अ.] कार्यव्यग्र;
**मशरिक़**—पु. [अ.] पूर्व; पूर्वदिशा.
**मशविरा**—पु. [अ.] सल्ला.
**मशहूर**—वि. [अ.] प्रसिद्ध; महशूर.
**मशीन**—स्त्री. [अिं.] यंत्र.
**मशीर**—पु. [अ.] १ अिशारा करणारा. २ सल्लागार. ३ मंत्री; अमात्य.
**मश्क**—पु. [अ.] अभ्यास.
**मष्ट**-वि. १ संस्कार विसरलेला. २ अुदास. (मु.) **मष्ट करना, धारना**-अथवा **मारना**—चुप राहणें; गप्प बसणें.
**मसक**—पु. मच्छर.
**मसकना**—क्रि. अ. [अनु.] टरकणें; फाटणें. क्रि. स. टरकावणें; फाडणें.
**मसकला**—पु. [अ.] १ धार लावण्याचें चाक. २ धार लावणें.
**मसकीन**—वि. [अ.] १ गरीब; अनाथ. २ साधु; सज्जन. ३ दरिद्री. ४ भोळा. ५ सुशील.

**मसखरा**–पु.[अ.] थट्टेखोर; विनोदी.
**मसखरापन**–पु. थट्टा; मस्करी.
**मसखरी**–स्त्री. थट्टामस्करी.
**मसजिद्**–स्त्री. [फा.] मशीद.
**मसनद्**–स्त्री. [अ.] १ भोगतक्क्या. २ लोड. ३ बैठकीची गादी.
**मसरफ**–पु. [अ.] १ अुपयोग. २ खर्चाची बाब.
**मसरूफ**–वि. [अ.] कार्यव्यग्र.
**मसल**–स्त्री. [अ.] म्हण; लोकोक्ति.
**मसलन**–क्रि.वि. [अ.] अुदाहरणार्थ.
**मसलना**–क्रि. स. १ चुरगळणें. २ दाबणें; तिंबणें.
**मसलहत**–स्त्री. [अ.] गुप्त मसलत. [२ विचारणीय विषय.
**मसलहतन्**–क्रि.वि. विशेष अुद्देशानें.
**मसला**–पु.[अ.] १ म्हण; लोकोक्ति.
**मसविदा, मसौदा**–पु.[अ.] मसुदा; कच्चा खर्डा. २ अुपाय; युक्ति.
**मसौदेबाज़**–पु. [अ. + फा.] १ मसुदा करणारा. २ हुशार; चलाख.
**मसहरी**–स्त्री. १ मच्छरदाणी. २ मच्छरदाणीचा पलंग.
**मसा**–पु. मस.
**मसान**–पु. स्मशान.
**मसाना**–पु. मूत्राशय.
**मसानी**–स्त्री. पिशाचिनी; डाकीण.
**मसायल**–पु. [अ.] प्रश्न, समस्या.
**मसाला**–पु [अ.] १ मसाल २ सामुग्री. ३ तेलें. ४ आतिषबाजी.
**मसावात**–स्त्री. [अ.] १ समता. २ बेपर्वाअी. ३ गणितांतील समीकरण.
**मसि**–स्त्री. १ शाअी. २ काजळ.
**मसिजीवी**—पु. लेखनावर अुपजीविका चालविणारा.
**मसिबिंदु-मसिबुंदा**–पु. १ काजळाचें गालबोट. २ शाअीचा थेंब.
**मसीह-हा**–पु. [अ.] येशू ख्रिस्त.
**मसूडा**–पु. हिरडी (दाताची).
**मसूसना**– क्रि. [अ.] १ मनोवेग आवरणें. २ कुढणें. ३ मुरगळणें. ४ पिळणें.
**मसृण**–वि. मृदु; गुळगुळीत; मऊ.
**मसोसना**-क्रि.अ. पाहा 'मसूसना'
**मस्ताना**–वि. [फा.] १ गुंग; चूर. २ अुन्मत्त; मस्त. ३ निमग्न.
**मस्तूर**–वि. [अ.] १ लिहिलेलें; आंखलेलें. २ अुल्लिखित; वरील.
**मस्तूल**—पु. [पोर्तु.] शीडाचा मधला खांब. [महागाअी; दुष्काळ.
**महँगा**—वि. महाग. **महँगी**–स्त्री.
**महक**—स्त्री. सुवास; सुगंध.
**महकना**–क्रि. अ. सुवास येणें.
**महकमा**—पु. [अ.] विभाग; डिपार्टमेंट.

**महक़ूम**–*वि.* [*अ.*] शासित; अधीन; आश्रित.

**महज़**–*वि.* [*अ.*] १ केवळ; निव्वळ. २ शुद्ध; निर्भेळ.

**महज़र**–*पु.* [*अ.*] घोषणापत्र; सूचनापत्र.

**महज़ूज़**–*वि.* [*अ.*] प्रसन्न; खुश.

**महजूब**–*वि.* [*अ.*] लपलेला; गुप्त.

**महजूर**–*वि.* [*अ.*] विरही; वियोगी.

**महताब**—*पु.* [फा.] चंद्र.

**महताब**—*स्त्री.* [फा.] १ चांदणें. २ पाहा 'महताबी'.

**महताबी**—*स्त्री.* १ [फा.] बागेंतील चबुतरा. २ अेक प्रकारची शोभेची दारु.

**महत्तम**–*वि.* सर्वांत मोठा.

**महत्तर**—*वि.* अधिक मोठा.

**महत्ता**–*स्त्री.* मोठेपणा; श्रेष्ठता.

**महत्त्व**—*पु.* महत्त्व; मोठेपणा.

**महदूद**–*वि.* [*अ.*] मर्यादित; सीमित परिमित.

**महना***–*क्रि.स.* ताक घुसळणें.

**महनु***—*पु.* नाश करणारा.

**महफिल**—*स्त्री.* [*अ.*] १ मैफल; गाण्याची बैठक. २ अुत्सव. ३ सभा.

**महफ़ूज़**—*स्त्री.* [*अ.*] राखून ठेवलेला; जतन ठेवलेला; सुरक्षित.

**महबूब**—*पु.* [*अ.*] प्रियकर.

**महमत***—*वि.* मदोन्मत्त.

**महमह**–*क्रि.वि.* [दे.] सुगंधयुक्त.

**महमहा**–*वि.* सुगंधित.

**महमहाना**–*क्रि. अ.* सुवास येणें.

**महमा**—*स्त्री.* महिमा.

**महमेज़**–*स्त्री.* [*अ.*] जोड्याचा नाल.

**महर**–*पु.* जमीनदाराकरितां आदरसूचक शब्द (ब्रज भाषा)

**महरम**–*स्त्री.* [*अ.*] चोळी.

**महरम**–*पु.* [*अ.*] १ जीवश्च कंठश्च मित्र. २ जनानखान्यांत जाण्याची परवानगी असलेला विशिष्ट नातलग. ३ स्नेही. ४ जवळचा नातलग; ज्याचेबरोबर लग्नसंबंध होअूं शकत नाहीं ५ गौप्य जाणणारा.

**महशर**–*पु.* [*अ.*] मुसलमानी धर्मानुसार जगाचा अंतिम, न्यायनिवाड्याचा दिवस. (मु.) **महशर बरपा करना**–खूप चळवळ करणें; आकाश पाताळ अेक करणें.

**महरा**—*पु.* १ भोअी. २ सरदार. ३ पुढारी.

**महराना**–*पु.* भोअी लोकांची राहण्याची जागा.

**महराब**—*स्त्री.* [*अ.*] मेहिराप.

**महरि–री**–*स्त्री.* [*अ.*] १ स्त्रियांकरितां आदरसूचक शब्द (ब्रज भाषा). २ मालकीण. ३ अेक पक्षी.

**महरूम**–*वि.* [*अ.*] १ वंचित. २ दुर्दैवी.

**महल**–पु. [अ.] १ महाल. २ अंतःपुर. ३ मोठा दिवाणखाना. ४ वाडा.

**महलसरा**–स्त्री. [ अ. ] अंतःपुर; जनानखाना.

**महल्ला**—पु. [ अ. ] पेठ; गज; [ मोहल्ला.

**महसूल**–पु. [अ.] महसूल. सारा.

**महसूस**—वि. अ. १ ज्ञात; अनुभवास आलेला. २ ज्ञातव्य.

**महाजन**—पु. १ श्रीमंत; धनी. २ सावकार. ३ वाणी. ४ साधु. ५ भला माणूस. **महाजनी**–स्त्री. १ सावकारी. २ सावकारी वह्या लिहिण्याची विशिष्ट लिपि.

**महात्मा**—पु. महात्मा; श्रेष्ठ पुरुष.

**महान्**—वि. मोठा; श्रेष्ठ.

**महानद**—पु. मोठी नदी.

**महापात्र**–पु.अंत्यविधि चालविणारा किंवा त्यानिमित्त दान घेणारा ब्राह्मण.

**महाबत**—पु. [अ.] भय; भीति.

**महाभिनिष्क्रमण**—पु. मृत्यु.

**महामात्र**--पु. १ माहुत. २ मुख्य चालक.

**महामारी**–स्त्री.पटकी;रोगाची सांथ.

**महाराज**—पु. १ महाराज; मोठा राजा. २ महाशय.

**महाल**—पु. [अ.] १ पेठ; गंज. २ भाग; हिस्सा. ३ गांवांचा गट.

**महावट**—स्त्री. पौष-माघांत पडणारा पाऊस; हिंवाळ्यांत पडणारा पाऊस.

**महावत**—पु. माहूत.

**महावर**--पु. सवाष्ण स्त्रिया पायांना लावतात तो रंग. **महावरी**–पु. लाल रंगाची गोळी.

**महाशय**–पु. महाराज; महाशय.

**महासागर**--पु. मोठा सागर.

**महिमा**--स्त्री. १ महिमा; मोठेपणा. २ महत्त्व; प्रभाव.

**महियां***--अव्य. आंत; मध्यें.

**महिष**--पु. रेडा. **महिषी**–स्त्री. १ म्हैस. २ पट्टराणी.

**महिषेश**—पु. महिषासुर.

**महीन**--वि. १ बारीक. २ पातळ; तलम. ३ मंद. ४ कोमल.

**महीना**--पु. १ महिना. २ मासिक पगार; वेतन. ३ मासिक धर्म (स्त्रियांचा).

**महीसुर**—पु. ब्राह्मण.

**महुँ**–अव्य. आंत; मध्यें. [ मंत्र.

**महुँअर**–पु.१ पुंगी. २ जादुगाराचा

**महुआ**–पु. मोहाचें झाड [ज्येष्ठमध.

**महूख**—पु. १ मोहाचें झाड. २

**महूरत***--पु. मुहूर्त.

**महेर**—पु. झगडा; भांडण.

**महोगनी**—पु. [अं.] अेक मजबूत लांकूड. शिसवीचें लांकूड.

**महोदय**—पु. १ आधिपत्य. २ स्वर्ग. ३ महाशय.

**महोला**—पु. [अ.] १ बहाणा. २ दगा.

**माँखना**—क्रि. अ. रागावणें; संतापणें.

**माँखी**—स्त्री. माशी.

**माँग**—स्त्री. [?] भांग (केसांतील). (मु.) **माँगपट्टी करना**—वेणी फणी करणें.

**माँग**—स्त्री. मागणी.

**माँगन***—पु. १ मागणी. २ भिकारी.

**माँगना**—क्रि. स. मागणें.

**माँजना**—क्रि. स. १ घासणें. २ माँजा (पतंगाच्या दोरीला लावायचा) लावणें. [अंतर; फरक.

**माँझ***—अव्य. आंत; मध्यें. पु.

**माँझा**—पु. १ नदींत पडलेलें वाळंवट; रेताड. २ पगडीचा तुरा किंवा दागिना. ३ लग्नांत वधूवरांना नेसवतात तीं पिवळीं वस्त्रें. ४ पतंगाचा मांजा.

**माँझी**—पु. १ नावाडी २ खलाशी. ३ मध्यस्थ (भांडण तोडणारा).

**माँठ**—पु. माठ; मडकें. [**माँडी**—स्त्री.

**माँड**—पु. भाताची पेज; खळ.

**माँडना**—क्रि. स. १ मर्दन करणें; चोळणें. २ लिंपणें. ३ रचणें; सजविणें. ४ कणसांतून दाणे काढणें. ५ माजविणें; गडबड करणें. ६ तिंबणें.

**माँडा**—पु. १ लग्नमंडप. २ परोठा. ३ मांडा (पक्वान्न) ४ मोतीबिन्दु.

**माँडी**—स्त्री. पाहा 'माँड'.

**माँड्यो**—पु. १ पाहुणे अुतरण्याची जागा. २ लग्नमंडप. ३ देवप्रतिष्ठेची जागा. [**माँता**—वि. मदोन्मत्त.

**माँतना**—क्रि. अ. अुन्मत्त होणें.

**माँद**—स्त्री. [दे.] गुहा; गुंफा.

**माँद**—वि. १ निस्तेज; उदास. २ तुलनेंत हलका; कमी प्रतीचा. ३ पराजित; पराभूत.

**माँदगी**—स्त्री. [फा.] रोग; आजार.

**माँदा**—वि. [फा.] १ थकलेला; भागलेला. २ अुरलासुरला. ३ आजारी.

**माँपना**—क्रि. अ. निशेंत चूर होणें.

**माँस, माँसु**—पु. मांस. **माँसाहारी** वि. मांस खाणारा.

**माँह***—अव्य. आंत; मध्यें.

**मा**—स्त्री. माता; आओ.

**माअिका**—पु. माहेर.

**माअि, माओ**—स्त्री. आआ, माता. (मु.) **माओका लाल**—अुदार पुरुष; शूर वीर.

**माकूल**—वि. १ अुचित; योग्य. २ लायक. ३ अुत्तम; अुत्कृष्ट. ४ प्रति-

पक्षाची गोष्ट कबूल करणारा.
**माख**–*पु.* १ अप्रसन्नता; नाखुशी. २ घमेंड. ३ पस्तावा. ४ दोष झांकणें.
**माखन**—*पु.* लोणी. **माखन चोर** *पु.* कृष्ण.
**माखना**–*क्रि.अ.* नाराज होणें.
**माखी**—*स्त्री.* माशी.
**माच**—*पु.* माचा; मचाण.
**माचना**—*क्रि. अ.* १ माजविणें; गडबड करणें. २ चालू करणें.
**माचल**–*वि.* १ हट्टी. स्वच्छंदी.
**माचा**–*पु.*लहान खाटलें.**माची**-*स्त्री.*
**माछर**—*पु.* मच्छर.
**माजरा**–*पु.* [*अ.*] १ घटना; गोष्ट. २ स्थिति; खबर. [माननीय.
**माजिद्**–*वि.* [*अ.*] प्रतिष्ठित;
**माज़ी**–*वि.* [*अ.*] माजी; भूतपूर्व.
**माजूर**–*वि.* [*अ.*] १ आक्षेपार्ह. २ कुचकामाचा; निरुपयोगी. ३ असमर्थ.
**माट**—*पु.* १ रंग तयार करण्याचें मडकें. २ मोठें मडकें.
**माटी**—*स्त्री.* १ माती. २ शव; प्रेत. ३ शरीर; देह. ४ पृथ्वी. ५ धूळ; रज.
**माडना**—*क्रि. अ.* १ माजविणें; गडबड करणें. *क्रि. स.* १ भूषविणें; २ आदर करणें.
**माड़ना**—*क्रि. स.* १ चुरगाळणें. २ फिरविणें.
**माढी**–*स्त्री.* मठ; आश्रम.
**मातदिल**–*वि.* [*अ.*] १ शांत. २ समजूतदार.
**मातबर**—*वि.* [*अ.*] विश्वासास पात्र. **मातबरी**–*स्त्री.* विश्वासूपणा.
**मातम**—*पु.* [*अ.*] मृत्युशोक (कोणी मेलें असतां); धाय मोकलून रडणें. **मातमी**-*वि.*शोकसूचक.
**मातमपुरसी**—*स्त्री.* [*अ.* + *फा*] १ दारावर जाणें. २ मृतकाच्या आप्ताबद्दल समवेदना प्रगट करणें.
**मातहत**—*वि.* [*अ.*] अधीन; हाताखालचा.
**मातहती**–*स्त्री.* [*अ.*] अधीनता.
**माता**—*स्त्री.* १ माता; आई. २ देवी (रोग). [वेडा; उन्मत्त.
**माता**—*वि.* माजलेला; मातलेला;.
**मातु**—*स्त्री.* आई; माता.
**मातृभूमि**–*स्त्री.*मातृभूमि; जन्मभूमि.
**मात्र**–*अव्य.* केवळ; फक्त. [मात्रा.
**मात्रा**–*स्त्री.* १ परिमाण; प्रमाण. २
**माथ***—*पु.* डोकें.
**माथा**—*पु.* १ शिर; डोकें. २ वस्तूचा वरचा भाग. **माथे**–*क्रि. वि.* १ शिरावर. २ भरंवशावर.
**माथापच्ची**–डोकेफोड.

**मादरज़ाद**—*वि.* [फा.] १ जन्मतः; अुपजत. २ सहोदर; सख्खा; ३ नग्न.
**मादा**—*स्त्री.* [फा.] मादी. [३ पू.
**माद्दा**—*पु.* [अ.] १ तथ्य. २ योग्यता.
**माधुरअी***—*स्त्री.* माधुर्य.
**माधैया***—*पु.* माधव.
**माध्यम**—*वि.* मधला.
**माध्यम**—*पु.* माध्यम; साधन; वाहन.
**मानाचित्र**—*पु.* १ रूपरेषा; आराखडा. २ नकाशा.
**मानता**—*स्त्री.* नवस. [ऑनरेरियम.
**मानधन**—*पु.* १ मानाची वस्तु. २
**मानना**—*क्रि.स.* १ स्वीकारणें; मान्य करणें. मंजूर करणें. २ मान देणें; आदर करणें. ३ श्रद्धा किंवा विश्वास ठेवणें. ४ नवस करणें. ५ लक्षांत घेणें; समजावून घेणें. ६ प्रमाणभूत मानणें. ७ पारंगत समजणें.
**माननीय**—*वि.* पूज्य; वंद्य.
**माननीय**—*वि.* सन्मान्य; श्रेष्ठ. २ आमदार (विधिमंडळ).
**मानमंदिर**—*पु.* वेधशाळा.
**मानमंदिर**—*पु.* कोधागार.
**मानमनौती**—*स्त्री.* १ मनधरणी; विनवणी. २ नवस.
**मानव**—*पु.* मनुष्य; माणूस.
**मानवी**—*स्त्री.* स्त्री; नारी. *वि.* मानवी.
**मानवीय**—*वि.* मानवी; मनुष्यासंबंधीं.
**मानस**—*पु.* १ मन. २ मानस-सरोवर. ३ कामदेव. ४ मनुष्य. *वि.* मनापासून उत्पन्न झालेलें; काल्पनिक. [करा. २ जणूं.
**मानहुँ**—अव्य. १ समजा, कल्पना
**मानिंद**—*वि.* [फा.] समान; तुल्य.
**मानिक**—*पु.* माणिक.
**मानिकचंदी**—*स्त्री.* लहान सुपारी.
**मानिक-रेत**—*स्त्री.* दागिना साफ करण्याचा माणकाचा चूर.
**मानिनी**—*वि. स्त्री.* १ गर्विष्ठ. २ नाखुश. ३ रुष्ट. [२ अभिप्राय; हेतु.
**मानी**—*पु.* बहु. [अ.] १ अर्थ.
**मानुख-ष***—*पु.* मनुष्य.
**मानूस**—*वि.* [अ.] स्नेही.
**माने**—*पु.* बहु. पाहा 'मानी'.
**मानो**—अव्य. जणूं; जणूं काय.
**मान्य**—*वि.* माननीय; पूज्य.
**मान्यता**—*स्त्री.* १ मोठेपणा; मान. २ स्वीकृति.
**माप**—*स्त्री.* परिमाण; मोजमाप.
**मापना**—*वि. स.* मोजणें; मापणें.
**माफकत**—*स्त्री.* [अ.] १ अनुकूलता. २ मैत्री.
**माफिक**—*वि.* [अ.] १ अनुसार. प्रमाणें; अनूकूल. २ योग्य.
**माफी**—*स्त्री.* [अ.] १ क्षमा; माफी. २ जमीनमहसूल माफ असलेली जमीन.

**माफीदार**—पु· [अ·+फा.] जमीनं महसूल माफ असलेला मालक.

**मामला**—पु· [अ·] १ धंदा; व्यवसाय. २ परस्परव्यवहार. ३ भानगड; ४ भांडण; तंटा. ५ मुकदमा; खटला.

**मामा**—स्त्री· [फा.] १ आओी. २ स्वयंपाकीण बाओी. ३ म्हातारी बाओी. ४ मोलकरीण. **मामागरी**-स्त्री· स्वयंपाकाचा धंदा. [मामी.

**मामा-मामूँ**—पु· मामा. **मामी**—स्त्री·

**मामूर**—वि· [अ·] भरलेलें; परिपूर्ण.

**मामूल**—पु· [अ·] पद्धत; रीत.

**मामूली**—वि· [अ·] मामुला; सामान्य.

**मायका**—पु· माहेर. [२ मिश्रित.

**मायल**—वि· [अ·] १ प्रवृत्त.

**माया**—स्त्री· १ धन;संपत्ति.२ भ्रम. ३ प्रकृति. ४ ओीश्वरी शक्ति. ५ माता. ६ ममता.

**मायिक**—वि· मायावी; कपटी.

**मायूस**—वि· [अ·] निराश; नाअुमेद.

**मायूसी**—स्त्री· [अ·] निराशा.

**मारका**—पु· [अ·] १ रणांगण; युद्धक्षेत्र. २ महत्त्वाची घटना.

**मारका**—पु· [अं·] चिह्न; खूण.

**मारकाट**—स्त्री· १ मारामारी. २ लढाओी; युद्ध.

**मारना**—क्रि· स· १ मारणें; चोपणें. २ वध करणें; हत्या करणें. ३ सतावणें; त्रास देणें. ४ चीत करणें. ५हत्यार चालविणें. ६संयम करणें. ७ नाश करणें.

**मारपेंच**—पु· धूर्तपणा.

**मारव**—पु· मालव देश.

**मारा**—वि·१ ठार मारलेला. २गांज-लेला.(मु.) **मारा मारा फिरना**—वाओीट स्थितींत वणवण हिंडणें.

**मारामार**—क्रि·वि· घाओीनें; लवकर.

**मारी**—स्त्री· पटकी; महामारी.

**मारु***—स्त्री· मार.

**मारुत**—पु· वारा; पवन.

**मारूफ़**—वि· [अ·] प्रसिद्ध; प्रख्यात.

**मारे**—अव्य. मुळें; कारणानें.

**मार्ग**—पु· रस्ता; वाट. [मर्मज्ञ.

**मार्मिक**—वि· प्रभावशाली; मार्मिक;

**मालखाना**—पु· [फा.] मालधक्का; गुदाम.

**मालगुजार**—पु· [अ· + फा.] जमीनदार; सरकारला सारा गोळा करून देणारा.

**मालगुज़ारी**—स्त्री· [अ· + फा.] जमीनदार सरकारला जो कर देतो तो; धारा; सारा.

मालगोदाम—पु. [अ. + अं] मालधक्का; मालगुदाम. [श्रीमंत.
मालदार- वि. [अ. + फा.] धनिक;
मालन—स्त्री. माळीण.
मालपुआ-मालपूवा—पु. पुरी सारखें एक पक्कान्न.
माला—स्त्री. माळ; माळा.
मालामाल-वि. [फा.] १ संपन्न. २ भरपूर. [स्वामी; मालक. ३ पति.
मालिक-पु. [अ.] १ अीश्वर. २
मालिक अराजी- पु. [अ.] जमिनीचा मालक; जमीनदार.
मालिकाना-पु. [फा.] मालकी. क्रि. वि. मालकासारखा.
मालिकी—स्त्री. [फा.] मालकी.
मालियत-स्त्री. [अ.] १ किंमत; मूल्य. २ संपत्ति. ३ मूल्यवान् वस्तु.
मालिश—स्त्री. [फा.] चोळणें; मालिश.
माली- पु. माळी.
मालूम-वि. [अ.] माहितीचा.
मावस—स्त्री. अमावास्या.
मावा-पु. १ पेज. २ सत्त्व; सार. ३ खवा. ४ दुधाची साय.
माशा-पु. मासा (वजन). [करो.
माशाअल्लाह—पु. अीश्वर रक्षण
माशूक-वि. [अ.] १ प्रेमपात्र; २. प्रेयसी.
मासूम-वि. [अ.] १ निरपराधी. २ निरागस. ३ साळसूद. [पक; मास्तर.
मास्टर-पु. [अिं.] शिक्षक; अध्या-
माह-पु. [फा.] १ महिना. २ चंद्र.
माह-पु. माघ महिना.
माहताब-पु. [फा.] १ चंद्र. २ चांदणें.
माहर-वि. [अ.] माहितगार; तज्ज्ञ.
माहवार-क्रि. वि. [फा.] मासिक. वि. मासिक. माहवारी-वि. मासिक वेतन.
माहिं-हीं—अव्य. मध्यें; आंत. (सप्तमीचा प्रत्यय).
माहिर-वि. [अ.] तज्ज्ञ; निपुण.
माहिला-पु. १ नावाडी. २ कोळी.
माहीं—अव्य. मध्यें; आंत.
माही-स्त्री. [फा.] मासोळी.
माहुर-पु. विष.
मिकदार- स्त्री. [अ.] प्रमाण; मात्रा.
मिंगनी-स्त्री. [दे] लेंडी (पशूंची).
मिचकाना-क्रि. स. डोळे मिचकाविणें.
मिचना-क्रि. अ. डोळे बंद होणें.
मिचलाना-क्रि. अ. [?] मळमळणें.
मिचु*-स्त्री. मृत्यु.
मिजराब-स्त्री. [अ.] सतार वाजविण्याची तारेची आंगठी.
मिज़ाज-पु. [अ.] १ स्वभाव. २ प्रकृति; तब्येत. ३ घमेंड. ४

गुणधर्म. ( मु ) **मिज़ाज पाना**-स्वभाव ओळखणें.

**मिज़ाजदार**-*वि.* [ *अ.* + फा. ] घमेंडखोर; गर्विष्ठ; मिजासखोर. (मु.) **मिज़ाज शरीफ**—खुशाल आहांत ना ? [ २ मिटणें.

**मिटना**-*क्रि. अ.* १ नाश होणें.

**मिटाना**-*क्रि. स.* १ मिटविणें. २ पुसणें. ३ नाश करणें. ४ खराब करणें.

**मिटिया**-*स्त्री.* मडकें.

**मिट्टी**-*स्त्री.* १ जमीन; भुअी. २ माती. ३ धूळ. ४ राख; भस्म. ५ शरीर. ६ शव; प्रेत. ७ शरीराचा बांधा. (मु.) **मिट्टी करना**-नष्ट करणें; खराब करणें. **मिट्टी का पुतला**-माणसाचें शरीर. **मिट्टी के मोल**-मातीमोलानें; अत्यंत स्वस्त. **मिट्टी देना**-माती देणें; मृत शरीर गाडणें; पुरणें. **मिट्टी पलीद करना**-दुर्दशा करणें; धुळधाण करणें. **मिट्टीमें मिलना-मिलाना**-नष्ट होणें करणें. [तेल.

**मिट्टी का तेल**-*पु.* घासलेट; रॉकेल

**मिट्ठू**-*पु.* पोपट; *वि.* गोडबोल्या. ( मु. ) **अपने मुँह मियाँ मिट्ठू बनना**-स्वतःच्या तोंडानें स्वतःची तारीफ करणें.

**मिठबोला**—*पु.* १ गोडबोल्या. २ वरपांगी गोड बोलणारा.

**मिठलोना**-*पु.* आळणी पदार्थ.

**मिठाअी**-*स्त्री.* मिठाअी; पक्वान्नें.

**मिठास**-*स्त्री.* गोडी; माधुरी.

**मिडाअी**-*स्त्री.* [दे.] १ मळणी. २ मळणीची मजुरी. ३ रंग-धुलाअीची क्रिया.

**मिताअी***-*स्त्री.* मित्रता.

**मित्र**-*पु.* दोस्त; मित्र.

**मिथ्या**-*वि.* खोटें; असत्य.

**मिथ्यावादी**-*पु.* खोटें बोलणारा.

**मिनकार**-*पु.* [ *अ.* ] १ पक्ष्याची चोंच. २ गिरमिट

**मिनट**—*पु.* [ अिं. ] मिनिट.

**मिनहा**—*वि.* [*अ.*] मजुरी काढून घेतलेली ( रक्कम ). [ मनधरणी.

**मिन्नत**—*स्त्री.* [ *अ.* ] विनवणी;

**मिमियाना**—*क्रि. अ.* [ अनु. ] शेळीचें ओरडणें.

**मिम्बर**--*पु.* [ *अ.* ] मशिदींतील अुंच चबुतरा. याच्यावर बसून मुल्ला वगैरे अुपदेश करतात.

**मियाँ**-*पु.* [फा.] १ मालक; स्वामी. २ पति. ३ महाशय. ( मुसलमानांकरितां ). ४ मुसलमान.

**मियाद**—*स्त्री.* पाहा, ' मीआद '

**मियाना**--*वि.* [ फा. ] मध्यम आकाराचा. *पु.* मेणा; पालखी.
**मियानी**--*स्त्री.* [ फा. ] विजारीचा मधला भाग. *वि.* मधला.
**मिरगी**--*स्त्री.* अपस्मार रोग [मिरची.
**मिरच, मिरचा, मिरिच**--*पु.*
**मिरज़ई**--*स्त्री.* [ फा. ] १ कमरे-पर्यंतचा अंगरखा. २ बंडी.
**मिरज़ा**--*पु.* [ फा. ] १ सरदाराचा मुलगा. २ मोगलांची पदवी.
**मिर्च**--*स्त्री.* पाहा ' मिरच '
**मिल**--*स्त्री.* [ अि. ] गिरणी.
**मिलन**--*पु.* १ भेट; मिलाफ; मीलन. २ मिसळ; मिश्रण. **मिलनसार**--*वि.* १ मनमिळाअू. २ सुशील.
**मिलना**--*क्रि. स.* १ मिसळणें; सम्मीलित होणें. २ पदार्थ अेक-जीव होणें. ३ जुळणें. ४ समस-मान असणें. ५ भेटणें. ६ सलोखा होणें. ७ आलिंगन देणें. ( मु ) **मिलना-जुलना**--भेटणें; मिस-ळणें; मिळून मिसळून असणें.
**मिलनी**--*स्त्री.* लग्नांत वर व वधू-पक्षांतील मंडळी अेकमेकांस भेट-तात ती रीत. [ लावणें.
**मिलवाना**--*क्रि. स.* भेटावयास
**मिलान**--*पु.* १ तुलना . ३ तपासणी. ३ पडताळून पाहणें.
**मिलाना**--*क्रि. स.* १ मिसळणें; अेकत्र करणें. २ जोडणें; चिकट-विणें; जुळविणें. ३ तुलना करणें. ४ तपासणें. ५ परिचय किंवा भेट करविणें. ६ सलोखा घडविणें. ७ फितविणें. ८ सूर मिळविणें.
**मिलाप**--*पु.* १ भेट; मुलाखत. २ मिलाफ; मैत्री.
**मिलावट**--*स्त्री.* भेसळ; मिसळ; मिश्रण.
**मिल्क**--*स्त्री.* [ अ. ] १ जमिनीची मालकी; जमीनदारी. २ माफीची जमीन. ३ मालकी.
**मिल्कियत**--*स्त्री.* [अ.] १ जमीन-मालकीचा हक्क. २ जहागीर; अिस्टेट.
**मिल्लत**--*स्त्री.* १ मिलाफ; मैत्री; घनिष्ठता. २ मनमिळाअूपणा.
**मिल्लत**--*स्त्री.* [अ.] १ धर्म. २ संप्रदाय.
**मिस**--*पु.* [फा.] तांबें.
**मिस**--*पु.* मिष; बहाणा.
**मिस**--*स्त्री.* [अिं.] कुमारी.
**मिसकीन**--*वि.* [अ.] १ गरीब; निर्धन. २ दीन; दुबळा.
**मिसरा**--*पु.* [अ.] अुर्दू किंवा फारसी कवितेचा अेक चरण.
**मिसरी**--*स्त्री.* [?] १ मिसर देशाचा निवासी; अिजिप्शियन. २ मिसर देशाची भाषा. ३ खडीसाखर.

**मिसाल**–स्त्री· [अ.] १ अुपमा. २ अुदाहरण; नमुना. ३ म्हण.
**मिसिल**–स्त्री· [अ.] खटला, दावा अित्यादींचें कागदपत्र; फाअील.
**मिसिल, मिस्ल**–वि· [अ.] समान; तुल्य. [शय. २ पति.
**मिस्टर**–पु·[अि.] १ श्रीयुत; महा-
**मिस्तरी**–पु·[अि.] हस्तकुशल कारागीर ( सुतार वगैरे ).
**मिस्तरीखाना**—पु· [ अ· + फा. ] सुतार, लोहार अित्यादींचें दुकान.
**मिस्र**–पु· [अ.] अिजिप्त देश.
**मिस्सी**–स्त्री·[फा.] मिश्री (दांतवण).
**मींगी**–स्त्री· बीच्या आंतील गीर.
**मींजना**—क्रि· स· १ चुरगाळणें; कुसकरणें. २ चोळणें.
**मीआद**–स्त्री· [अ.] अवधि मुदत. **मीआदी**–वि· मुदतीचा.
**मीचना**–क्रि· स· डोळे बंद करणें; डोळे मिटणें.
**मीज़ान**–स्त्री· [अ.] बेरीज.
**मीठा**–वि· १ गोड. २ स्वादिष्ट; रुचकर. ३ मंद; हळू. पु· मिठाअी.
**मीठा तेल**–पु· गोडें तेल (तिळाचें).
**मीठा नींबू**–पु·पपनस. **मीठापानी**–लेमन. [ बोलून घात करणारा.
**मीठीछुरी**–स्त्री· विश्वासघातकी; गोड

**मीन**–पु· १ मासा. २ मीन राशि. (मु.) **मीनमेष (मेख) करना**–टाळाटाळ करणें; सबबी सागणें. **मीनमेष ( मेख ) निकालना**–दोष काढणें; खुसपट काढणें. **मीनमेष होना**–गोंधळ असणें.
**मीना**–पु· [फा.] १ नीलमणी. २ रंगीत नक्षीकाम. ३ दारूचा पेला. **मीनाकार**— पु· सोनें–चांदीवर नक्षीकाम करणारा. **मीनाकारी**–स्त्री· सोन्याचांदीवरील रंगीत नक्षीकाम.
**मीयाद**–स्त्री· पाहा 'मीआद'.
**मीनार**–स्त्री· [अ.] मनोरा.
**मीर**—पु· [ फा. ] १ सरदार. २ धार्मिक आचार्य. ३ सय्यदांची पदवी. ४ पहिला ( चढाओढींत ).
**मीरफर्श**—पु· [फा.] १ पेपरवेट. २ दगड (वस्तु दाबून ठेवण्याकरितां).
**मीरमजलिस**–पु· [ फा. ] अध्यक्ष; सभापति.
**मीरमुंशी**–पु· [ फा. ] प्रधान मंत्री.
**मील**—पु· [ अि. ] मैल.
**मीलित**—वि· १ बंद केलेला. २ आकुंचित.
**मुँगरा**—पु· लाकडी हातोडा.
**मुँगौरी**—स्त्री· मुगवडी.
**मुँडचिरा**—पु· १ अंगावर जखम

करून भिक्षा मागणारे फकीर. २ हुज्जत घालणारा.

**मुँडना**—*क्रि. अ.* १ मुंडण होणें. २ लुटलें जाणें. ३ फसणें. *क्रि.स.* मुंडण करणें.

**मुंडा**—*पु.* १ टक्कल असलेला. २ हजामत केलेला. ३ विनशिंगाचा. ४ अेक प्रकारचा जोडा. ५ अेक लिपि. [ हजामतीची मजुरी.

**मुंडाअी**—*स्त्री.* १ हजामत. २

**मुंडासा**—*पु.* कोषा; रुमाल; मुंडासें.

**मुंडिया**—*पु.* संन्यासी.

**मुंडी**—*स्त्री.* सोवळी बाअी.

**मुंडेर-रा-री**—*पु.* वरवंडी (लहान भिंत); छपराच्या वर आलेला भिंतीचा भाग.

**मुंतजिम**—*वि.* [*अ.*] व्यवस्थापक; बंदोबस्त ठेवणारा. [ करणारा.

**मुंतज़िर**—*वि.* [*अ.*] प्रतीक्षा

**मुंदना**—*क्रि. अ.* १ बंद होणें. २ लपणें; गुप्त होणें; दृष्टीआड होणें. ३ भरलें जाणें; बुजणें ( छिद्र, खळगा अित्यादि ).

**मुँदरा**—*पु.* १ योग्याच्या कानांतील कुंडल. २ कानांतील दागिना.

**मुँदरी**—*स्त्री.* आंगठी.

**मुंशी**-*पु.* [*अ.*] १ लेखक. २ कारकून.

**मुंसरिम**—*पु.* [ *अ.* ] व्यवस्थापक.

**मुंसिफ**—*पु.* [ *अ.* ] १ मुन्सफ. २ न्याय करणारा. **मुंसिफी**—*स्त्री.* १ मुन्सिफी. २ मुन्सफ कचेरी. ३ न्याय.

**मुँह**—*पु.* १ तोंड. २ चेहरा. ३ वस्तूचा वरील भाग. ४ भोंक; छेद. ( मु. ) **मुँह अँधेरे**—भल्या पहांटे; सायंकाळीं. **मुँह आना**—तोंड येणें; तोंडांत फोड येणें. **मुँह अुतर जाना**—अुदास किंवा दुःखी होणें. **मुँह की खाना**—बदनाम होणें; तोंडघशीं पडणें. **मुँह खिल जाना**—कळी खुलणें; खुश होणें. **मुँह चढ़ाना**-डोक्यावर बसविणें. **मुँह चिढ़ाना**—नक्कल करणें; चिडविणें. **मुँह बनाना**—तोंड वेडें वांकडें करणें. **मुँह भरना**—लांच देणें. **मुँह मीठा करना**—तोंड गोड करणें; गोड पदार्थ खावयास देणें. **मुँहमें जबान होना**—बोलण्याची हिम्मत असणें. **मुँहमें पानी भर आना**—तोंडाला पाणी सुटणें; लोभ सुटणें. **मुँह मोडना**—तोंड फिरविणें; पाठ फिरविणें. **मुँह लगाना**—चढवून ठेवणें. **( अपनासा ) मुँह लेकर रह जाना**—अिवलेंसें तोंड करून बसणें. **मुँहसे फूल झडना**—गोड बोलणें; अुत्तम व्याख्यान देणें.

**मुँह-काला**–पु. बेअिज्जती; बदनामी.
**मुँहजोर**–वि. [सं. + फा.] १ तोंडाळ; मुजोर. २ फटकळ. ३ अुच्छृंखल; अुद्धट. [करणारा.
**मुँहतोड**–वि. ठणठणीत; निरुत्तर
**मुँहादिखाअी**–स्त्री. १ सुनमुख. २ सुनमुखाच्या वेळीं दिलेलें धन, दागिना अि.
**मुँह देखा**–वि. तोंडदेखला.
**मुँहनाल**–स्त्री. हुक्क्याची नळी.
**मुँहफट**–वि. फटकळ. [नाटें.
**मुँह बोला**–वि. तोंड देखलें; खोटें-
**मुँह भराअी**–स्त्री. लांच-लुचपत.
**मुँहमाँगा**–वि. मागितलें असेल तितकें; यथेच्छ. [कांठ.
**मुँहामुँह**–क्रि.वि. तोंडोतोंड; कांटो-
**मुँहासा**–पु. तारुण्यपीटिका; मुरुम.
**मुअज़्ज़म**–वि. [अ.] १ अत्यंत; आदरणीय. २ प्रतिष्ठित (व्यक्ति).
**मुअज़्ज़िज़**–वि. [अ.] अब्रूदार; प्रतिष्ठित.
**मुअज़्ज़िन**–पु. [अ.] नमाजाच्या वेळीं मशिदींतून लोकांना प्रार्थनेसाठीं बोलावणारा; बांग देणारा.
**मुअत्तल**–वि. [अ.] थोड्या मुदतीपुरता कामावरून दूर केलेला; सस्पेंड केलेला.
**मुअन्नस**–पु. [अ.] स्त्रीलिंग.
**मुअम्मा**–पु. [अ.] कोडें.
**मुअल्ला**–वि. [अ.] अुच्च; श्रेष्ठ; प्रतिष्ठित. [देणारा.
**मुअल्लिम**–वि. [अ.] शिकवण
**मुअस्सिर**–वि. [अ.] गुणकारक.
**मुआफ़**–वि. [अ.] माफी मिळालेला. **मुआफी**–स्त्री. माफी.
**मुआफिक**–वि. [अ.] १ समान; सदृश. २ अनुकूल; अनुसार.
**मुआयना**–पु. [अ.] तपासणी; निरीक्षण.
**मुआवज़ा**–पु. [अ.] १ नुकसानभरपाअीची रक्कम. २ मोबदला.
**मुकदमा**–पु. [अ.] खटला; दावा.
**मुकदमेबाज़**–पु. [अ. + फा.] मुकदमेबाज; फिर्यादी.
**मुकद्दमा**–पु. [अ.] १ खटला; दावा. २ प्रस्तावना.
**मुकद्दर**–वि. [अ.] १ मळकट; घाणेरडा. २ असंतुष्ट.
**मुकद्दर**–पु. [अ.] नशीब; भाग्य.
**मुकद्दस**–वि. [अ.] पवित्र.
**मुकम्मल**–वि. [अ.] संपूर्ण.
**मुकरना**–क्रि. [अ.] बोलण्याप्रमाणें न वागणें; दिलेलें वचन मोडणें.
**मुकर्रर**–क्रि. वि. [अ.] पुन्हा; फिरून. वि. १ ठराविक; निश्चित. २ नेमणूक झालेला; मुक्रर.

**मुक़ाबला-बिला**-पु. [अ.] १ सामना; बरोबरी. २ तुलना. ३ लढाओी; भांडण. ४ टक्कर.
**मुक़ाबिल**—क्रि. वि. [अ.] समोर; प्रत्यक्ष. पु. प्रतिस्पर्धी; शत्रु. **मुक़बिला**-पु. पाहा 'मुक़ाबला'.
**मुक़ाम**—पु. [अ.] १ मुक्काम. २ मुक्कामाची जागा. ३ अवसर; वेळ. ४ घर.
**मुकियाना**—क्रि.स. ठोसे लगावणें; मारणें; हळूहळू बुक्क्या मारणें.
**मुकुट**—पु. मुकुट; किरीट.
**मुकुर**—पु. १ आरसा. २ कळी.
**मुक्का**-पु. बुक्का; ठोसा. **मुक्की**—स्त्री. १ बुक्की. २ मुष्टियुद्ध.
**मुक्केबाज़ी**—स्त्री. [सं. + फा.] ठोसाठोशी.
**मुक्ता**-स्त्री. मोती; मोत्यें.
**मुखडा**-पु. चेहरा.
**मुखतार**--पु. [अ.] प्रतिनिधी; मुखत्यार. **मुखतारी**-स्त्री. मुखत्यारी.
**मुखतारनामा**--पु. [अ. + फा.] मुखत्यारपत्र; अधिकारपत्र.
**मुखबिर**-पु. [अ.] १ हेर; गुप्तचर. २ माफीचा साक्षीदार. **मुखबिरी**—स्त्री. हेरगिरी.
**मुखर**--वि. १ अप्रिय बोलणारा. २ मर्मभेदी बोलणारा. ३ बडबड्या.
**मुख़ातिब**-पु. [वि.] बोलणारा. अव्य. अुद्देशून.
**मुख़ालिफ़**—पु. [अ.] विरोधक; आक्षेपक. वि. विपरीत; अुलटा.
**मुख़ालिफ़त**---स्त्री. [अ.] विरोध.
**मुखिया**—पु. पुढारी.
**मुख़िल**—वि. [अ.] विघ्न आणणारा.
**मुख़्तालिफ़**—वि. [अ.] १ निरनिराळा. २ अन्य. ३ दुसरा.
**मुख़्तसर**-वि. [अ.] १ थोडक्यांत सांगितलेलें; संक्षिप्त. २ लहान.
**मुगद्र**—पु. जोडी; मुद्गल.
**मुगालता**—पु. [अ.] धोका; दगा.
**मुछंदर**—पु. १ मिशाळ. २ कुरूप. ३ मूर्ख.
**मुज़क्कर**—वि. [अ.] पुल्लिंग.
**मुज़बज़ब**—वि. [अ.] १ अनिश्चित; संदिग्ध. २ गोंधळलेला; घोंटाळ्यांत पडलेला.
**मुजरा**—पु. [अ.] १ नमस्कार; अभिवादन. २ नायकिणीचें बैठकीचें गाणें. ३ चालू केलेला कायदा अित्यादि.
**मुज़रिम**--वि. [अ.] अपराधी; गुन्हेगार.
**मुजस्सिम**—वि. [अ.] शरीरधारी; मूर्तिमंत.
**मुज़ायका**-पु. [अ.] हरकत; बिघाड.

**मुजावर-विर**—पु. [अ.] पुजारी; बडवा (मुसलमान). [ २ वाअीट.
**मुज़िर**—वि. [अ.] १ हानिकारक.
**मुझ**—स. 'मैं' चें सामान्यरूप.
**मुटका**—पु. [?] मुकटा (सोंवळें).
**मुटाअी**—स्त्री. १ स्थूलपणा. २ घमेंड.
**मुटाना**—क्रि. अ. १ लठ्ठ होणें; फुगणें; स्थूल होणें. २ घमेंड करणें.
**मुटापा**—पु. लठ्ठपणा.
**मुटिया**—पु. हमाल; मजूर.
**मुट्ठा**—पु. १ कवळी; पेंढी; जुडी. २ कागदाचें भेंडोळें. ३ जुडगा. ४ मूठ (हत्यार अि.).
**मुट्ठी**—स्त्री. १ मूठ. २ मूठभर. (मु.) **मुट्ठी गरम करना**—लांच देणें. **मुट्ठीभर**—मूठभर; थोडेसें. **मुट्ठीमें**—मुठींत; आधीन.
**मुठभेड**—स्त्री. टक्कर; लढाअी; सामना.
**मुठिका** स्त्री. १ मूठ. २ ठोसा.
**मुठिया**—स्त्री. हत्याराची मूठ. **मुठियाकी डंडी**—स्त्री. धोक्याची दांडी.
**मुडना**—क्रि. अ. १ मोडणें. २ वांकणें; लचकणें. ३ टोंक वांकणें. ४ वळणें; फिरणें. ५ परतणें. ६ पालटणें.
**मुडवाना**—क्रि. स. वळविणें.
**मुडवाना**—क्रि. स. गठवणें; फसविणें.
**मुडवारी**—स्त्री. १ वरवंडी. २ अुसें.
**मुडहर**—पु. डोक्यावरील पदर.
**मुतअल्लिक**—वि. [अ.] १ संबंधी. २ सम्मीलित; जोडलेला. क्रि. वि. संबंधीं; विषयीं. [ २ कटडा.
**मुतक्का**—पु. १ कठड्याचा खांब.
**मुतफन्नी**—वि. धूर्त; कावेबाज.
**मुतफर्रिक**—वि. [अ.] निरनिराळें.
**मुतलक**—क्रि. वि. [अ.] थोडासुद्धां; यत्किंचित्‌हि. वि. केवळ; नुसता.
**मुतवाज़ी**—वि. [अ.] गुप्त; लपलेला.
**मुतवातिर**—क्रि. वि. [अ.] निरंतर; सतत.
**मुतसद्दी**—पु. [अ.] १ कारकून. २ व्यवस्थापक. ३ लेखक. ४ दिवाण.
**मुतासिरी**—स्त्री. मोत्याचा कंठा.
**मुताबिक**—क्रि. वि. [अ.] अनुसार; प्रमाणें वि. अनुकूल.
**मुतालबा**—पु. [अ.] १ हिशेबाची बाकी. २ मागणी.
**मुतिलाड्डू**—पु. मोतीचूर.
**मुत्तसल**—वि. [अ.] १ निकट असलेला. २ संबद्ध.
**मुद्‌गर**—पु. जोडी; मुद्गल (व्यायाम).
**मुदर्रिस**—पु. [अ.] शिक्षक.
**मुदाम**—क्रि. वि. [अ.] १ सदासर्वदा; नेहमीं. २ अेकसारखा; लागोपाठ.
**मुद्दआ**—पु. [अ.] अुद्देश; अभिप्राय.
**मुद्दअी**—पु. [अ.] वादी.
**मुद्दत**—स्त्री. [अ.] मुदत; अवधि.

**मुद्दालेह**–पु. [अ.] प्रतिवादी.
**मुद्रणालय**—पु. छापखाना.
**मुद्रा**—स्त्री. १ नाणें; चलन. २ शिक्का.
**मुद्रास्फीती**–स्त्री. चलनवाढ.
**मुद्रातत्त्व**—पु. जुन्या नाण्यांवरून अितिहास जाणण्याचें शास्त्र. [यंत्र.
**मुद्रायंत्र**—पु. मुद्रणयंत्र; छापण्याचें
**मुधा**–क्रि. वि. व्यर्थ. वि. १ व्यर्थ; निरर्थक. २ असत्य; खोटें. पु. मिथ्या गोष्ट. [पु. नास्तिक.
**मुनकिर**–वि. [अ.] न मानणारा.
**मुनक्का**–पु. मनुका.
**मुनादी**–स्त्री. [अ.] दवंडी.
**मुनाफा**–पु. [अ.] फायदा; नफा.
**मुनासिब**–वि. [अ.] अुचित;योग्य.
**मुनियाँ**–स्त्री. [दे.] लाल नांवाच्या पक्ष्याची मादी.
**मुनीब,मुनीम**–पु.[अ.]१ कारकून. २ मदतनीस साहाय्यक.
**मुन्तकिल**–वि. [अ.] स्थानांतरित.
**मुन्तखिब**–वि. [अ.] निवड केलेला; निवडून आलेला.
**मुन्तजिम**–वि. [अ.] व्यवस्थापक.
**मुन्तशिर**—वि. [अ.] १ विखुरलेला. २ दुर्दशाग्रस्त.
**मुन्दरज**–वि.[अ.] १ नमूद केलेला; लिहिलेला. २ अंतर्गत; सम्मिलित.
**मुन्ना**–पु. [दे.] बाळ (टोपण नांव).
**मुन्शी–मुन्सिफ**–पु. पाहा 'मुंशी', 'मुंसिफ'.
**मुफलिस**–वि. [अ.] गरीब;निर्धन.
**मुफलिसी** —स्त्री. गरीबी; दारिद्र्य.
**मुफसदा**–पु. [अ.] अुपद्रव; तंटाबखेडा. **मुफसिद**–वि. तंटाबखेडा करणारा; अुपद्रवी. [सांगणारा.
**मुफस्सिर**--वि. [अ.] तपशीलवार
**मुफस्सल**–वि. [अ.] तपशीलवार; क्रमवार; विस्तृत. पु. शहरा बाहेरील गांव; अुपनगर.
**मुफीद**–वि. लाभदायक; फायदेशीर.
**मुफ्त** वि. [अ.] मोफत; फुकट; विनामूल्य. **मुफ्तखोर**—वि. फुकट्या; अैतखाअू. [धर्मशास्त्री.
**मुफ्ती**—पु. [अ.] मुसलमानी
**मुबद्दल**–वि. [अ.] बदल केलेला.
**मुबहम**–वि. [अ.] संदिग्ध; अस्पष्ट.
**मुबादला**—पु. [अ.] परिवर्तन; मोबदला. [होवो की.
**मुबादा**—अव्य. [फा.] असें न
**मुबारक**–वि. [अ.] १ शुभ; मंगलप्रद. २ फलदायी.
**मुबारकबाद**—पु. [अ. + फा.] अभिनंदन. **मुबारकबादी**–स्त्री. अभिनंदन; धन्यवाद. **मुबारकी**—स्त्री. आभार; अभिनंदन.

**मुर्री**—स्त्री· १ चिंधीची वात. २ दोन्यांना पीळ देअून गांठ मारण्याची विशिष्ट पद्धति. ३ पीळ.
**मुर्रीदार**—वि· [सं·+फा.] पीळदार.
**मुर्शिद**—पु· पाहा 'मुरशिद'.
**मुलकी**—वि· [अ.] १ शासनव्यवस्थेसंबंधीं. २ स्वदेशी.
**मुलज़िम**—वि· [अ·] अपराधी.
**मुलतवी**—वि· [अ·] तहकूब.
**मुलमची**—पु· [अ·] मुलामा देणारा.
**मुलम्मा**—पु·[अ·]१ कल्हअी; मुलामा. २ बनावट किंवा दिखाअूपणा.
**मुलाँ**—पु· [अ·] मौलवी; मुल्ला.
**मुलाकात**—स्त्री· [अ·] १ भेट; मुलाखत. २ मिलाफ; मैत्री; सलोखा. **मुलाकाती**—पु· १ ओळखीचा; परिचित. २ भेटीस आलेला.
**मुलाजिम**—पु· [अ·] नोकर. **मुलाजिमत**—स्त्री· नोकरी.
**मुलायम**—वि· [अ·] १ मअू; मृदु. २ नाजुक. ३ हलका. **मुलायमियत, मुलायमी**—स्त्री· मअूपणा; मृदुता; कोमलता.
**मुलाहज़ा**—पु· [अ.] १ निरीक्षण; देखरेख. २ भीड; मुरवत.
**मुलेठी**—स्त्री· ज्येष्ठमध. [प्रांत· ३ जग.
**मुल्क**—पु· [अ·] १ देश; मुलूख. २
**मुवक्कल, मुवाक्कल**—पु· [अ·] अशील; पक्षकार. [अुचित.
**मुवज्जह**—वि· [अ·] तर्कसंगत;
**मुवर्रिख**—पु· [अ·] अितिहासकार.
**मुशर्रफ**—[अ·] १ प्रतिष्ठित; सन्मान्य. २ मानमरातब मिळालेला; अुच्च; श्रेष्ठ. [कविसम्मेलन.
**मुशायरा**—पु· [अ·] काव्यगायन;
**मुशाहरा**—पु· [अ·] वेतन; पगार.
**मुशाहीर**—पु· [अ·] प्रसिद्ध लोक.
**मुश्क**—पु· [अ·] कस्तुरी.
**मुश्क**—स्त्री· [दे.] दंड (हाताचा). (मु.) **मुश्कें कसना** अथवा **बांधना**—मुसक्या बांधणें; दंडाला दोऱ्या बांधणें.
**मुश्किल**—वि·[अ·] कठिण; दुष्कर. स्त्री· १ मुष्कील; काठिण्य. २ अडचण; आपत्ति.
**मुश्की**—वि· [फा.] १ कस्तुरी रंगाचा; काळा. २ कस्तुरी मिसळलेला. पु· काळा घोडा.
**मुश्त**—पु· [फा.] १ मूठ. २ हसा.
**मुश्ताक**—वि· [अ·]अभिलाषा किंवा वासना बाळगणारा; अिच्छुक.
**मुषुर**—स्त्री· गुंजन. [३ दुष्काळ.
**मुष्टि**—स्त्री· १ मूठ. २ ठोसा.
**मुष्टियुद्ध**—पु· ठोसेबाजी; बॉक्सिंग.

**मुसंड**—पु· [?] १ धष्टपुष्ट; शरीर कमावलेला माणूस. २ गुंड.

**मुसकन**—स्त्री· स्मित.

**मुसकराना-कुराना मुसकाना**—क्रि·अ· स्मित करणें. **मुसकराहट, मुसकान, मुसक्यान**—स्त्री· स्मित; हास्य.

**मुसन्निफ**—पु·[अ·] लेखक; ग्रंथकार.

**मुसम्मात**—स्त्री· [अ·] स्त्री· वि· नामक; नांवाची (स्त्री).

**मुसलधार**-क्रि·वि·पाहा 'मूसलधार'

**मुसलमान**—पु· [अ·] अिस्लाम धर्माचा अनुयायी; मुहम्मदी.

**मुसलमानियत**—स्त्री· [अ·] मुस्लिमत्व. मुसलमानी धर्म. [मान लोक.

**मुसलमीन**—पु· बहु. [अ·] मुसल-

**मुसलेह**—वि·[अ·] सुधारक. [सबंध.

**मुसल्लम**—वि· [फा·] शाबूत;

**मुसल्ला**—पु· [अ·] नमाज पढण्याची चटअी किंवा सतरंजी.

**मुसाव्विर**—पु· [अ·] चित्रकार.

**मुसहर**—पु· वैदू जात.

**मुसहिल**—वि· [अ·] जुलाबाचें औषध; रेचक.

**मुसाफिर**—पु· [अ·] प्रवासी. **मुसाफिरी**—स्त्री· प्रवास.

**मुसाफिरखाना**—पु· [अ· + फा·] धर्मशाळा; मुशाफरखाना.

**मुसाहब**—पु· [अ·] १ श्रीमंत किंवा राजे लोकांचे जवळ राहणारा. २ दरबारी.

**मुसीबत**—स्त्री· [अ·] १ संकट; विपत्ति. २ कष्ट; दुःख.

**मुस्टंडा**—वि· गलेलष्ठ. [देणारा.

**मुस्तअफी**—वि· [अ·] राजीनामा

**मुस्तकबिल**—पु· [अ·] १ भविष्यकाळ. २ भवितव्य.

**मुस्तकिल**—वि· [अ·] १ कायमचा. २ मजबूत; दृढ.

**मुस्तगीस**·पु·[अ·] खटला भरणारा.

**मुस्तफा**—वि· [अ·] स्वच्छ. पु· महम्मद पैगंबर.

**मुस्तैद**—वि· [अ·] १ तत्पर; सिद्ध; तयार. २ हुशार; तरतरीत. **मुस्तैदी**—स्त्री· १ तत्परता; तयारी. २ चुणचुणीतपणा; हुशारी.

**मुस्लिम**—पु· [अ·] मुसलमान.

**मुहतरिम**—वि· पाहा 'मोहतरीम'

**मुहकम**—वि· [अ·] मजबूत.

**मुहकमा**—पु·[अ·] विभाग; खातें.

**मुहज्जब**—वि· [अ·] शिष्ट; सभ्य.

**मुहताज**—वि· [अ·] १ गरीब; दरिद्री. २ गरजू. **मुहताजी**—स्त्री· गरीबी; दारिद्य.

**मुहताजखाना**—पु· [अ·+फा·] अनाथालय.

**मुहब्बत**—स्त्री. [अ.] १ प्रेम; प्रीति. २ मैत्री. [प्रेमळ; प्रेमपूर्ण.
**मुहब्बत-आमेज**-वि. [अ. +फा.]
**मुहर**—स्त्री. पाहा 'मोहर'.
**मुहरा**—पु. १ पुढचा भाग. २ निशाणं; लक्ष्य. ३ मोहरें (बुद्धिबळ). ४ घोड्याच्या तोंडावरील साज. ५ तोंडाचा भाग. (मु.) **मुहरा लेना**—सामना करणें.
**मुहर्रम**-पु. [अ.] मोहरम. **मुहर्रमी**-वि. १ मोहरमसंबंधी. २ अुदास. ३ अेककल्ली. ४ दुःखी.
**मुहर्रिर**—पु. [अ.] कारकून. **मुहर्रिरी**—स्त्री. कारकुनी.
**मुहल्ला**-पु.[अ.] मोहल्ला; आळी; पेठ.
**मुहसिल**—वि. [अ.] वसूल करणारा. पु. शिपाअी; प्यादा.
**मुहाना**-पु. १ मुख(नदीचें). २ खाडी.
**मुहाफा**—पु. [अ.] पालखी; मेणा (विशेषतः स्त्रियांकरितां).
**मुहाफिज**—पु. [अ.] संरक्षक.
**मुहाल**—वि. [अ.] अशक्य.
**मुहावरा**—पु. [अ.] १ वाक्प्रचार. २ संवय; अभ्यास.
**मुहासिल**—पु. [अ.] १ मिळकत; अुत्पन्न. २ नफा; लाभ. [२ मित्र.
**मुहिब्ब**—पु. [अ.] १ प्रेम करणारा.
**मुहिम** स्त्री. [अ.] १ कठिण काम. २ लढाअी; मोहीम. ३ हल्ला; आक्रमण.
**मुहैया**—वि. [अ.] तयार; अुपस्थित.
**मूंग**—स्त्री., पु. मूग. **मूंगिया**—वि. मुगाच्या रंगाचा हिरवा.
**मूंगफली**—स्त्री. भुअीमुगाची शेंग.
**मूंगा**—पु. प्रवाळ; पोवळें.
**मूँछ**-स्त्री. मिशी(मु.) **मूँछ अुखाड़ना**-गर्वहरण करणें; मिशा अुपटणें.(मु.) **मूँछें नीची होना**—फजिती होणें. **मूँछोंपर ताव देना**—मिशीवर ताव देणें; धमेंडीत मिशांवरून हात फिरविणें; मिशांना पीळ देणें.
**मूँछी**—स्त्री. [दे.] अेक प्रकारची बेसनाची कढी.
**मूंडन**—पु. मुंडन-संस्कार.
**मूँडना**-क्रि. स. १ मुंडन करणें. २ फसविणें. ३ चेला बनविणें.
**मूँदना**—क्रि. स. मिटणें; झांकणें; आच्छादणें.
**मूजी**—पु. [अ.] त्रास देणारा; दुष्ट.
**मूढ**—वि. १ मूर्ख. २ गोंधळलेला; घोटाळलेला.
**मूढगर्भ**—पु. वाखा; गर्भपात.
**मूतना**—क्रि.अ. लघ्वी करणें; मुतणें.
**मूर**—पु. १ जड; मूळ. २ जडीबुटी. ३ मूलधन. [स्त्री. मूर्खता.
**मूरख***—वि. मूर्ख; **मूरखताअी**—

**मूरचा**–पु. [फा.] १ खंदक. २ माऱ्याची जागा.
**मूरत**–स्त्री. मूर्ति.
**मूर्च्छित**–वि. बेशुद्ध; मूर्च्छित.
**मूर्ति तक्षक**–पु. मूर्ति घडविणारा.
**मूल्य**–पु. १ किंमत. २ महत्त्व.
**मूस–सा**–पु. उंदीर. **मूसदानी**–स्त्री. उंदराचा पिंजरा.
**मूसना**– क्रि. स. चोरणें.
**मूसर, मूसल**–पु. मुसळ. [मुसळधार.
**मूसलधार–मूसलाधार** क्रि. वि.
**मूसा**–पु. [हिब्रू.] मोझेस.
**मृगी**–स्त्री. १ हरिणी. २ फेंफरें.
**मृतक**–पु. शव; मेलेला जीव.
**मृत्युदंड**–पु. फांशीची शिक्षा.
**मृदु**–वि. १ मऊ. २ दयाळू.
**मृषा**–अव्य. व्यर्थ; असत्य. [प्रत्यय.)
**में**–अव्य. आंत; मध्यें. ( सप्तमीचा
**मेंगनी**–[?] लेंडी.
**मेंडक-मेंढक**–पु. पाहा 'मेढक'.
**मेखला**–स्त्री. १ करगोटा; कडदोरा; कमरपट्टा. २ कफनी.
**मेज़**–स्त्री. टेबल.
**मेज़बान**–पु. [फा.] आतिथ्य करणारा; यजमान. [जमादार.
**मेट**–पु. [अिं.] मजुरांच्यावरील
**मेड**–पु. बांध; कुंपण.
**मेढक**–पु. बेडूक.
**मेढकी**–स्त्री. बेडकी.
**मेढा**–पु. मेंढा; एडका.
**मेथी**–स्त्री. मेथी
**मेथौरी**–स्त्री मेथीची वडी.
**मेदा**–पु. [अ.] पक्वाशय.
**मेम**–स्त्री. [अिं.] १ मडम. २ पत्त्यांतील राणी.
**मेमना**–पु. [अनु.] १ कोंकरूं. २ घोड्याची एक जात.
**मेमार**–पु. [अ.] गवंडी. [३ संगत.
**मेल**–पु. १ भेट; मिलाफ. २ सलोखा. ४ संगत. ५ साम्य; जोड; बरोबरी. ६ मिश्रण. ७ तऱ्हा; प्रकार. (मु.) **मेल खाना, बैठना, मिलना** मेळ बसणें; जमणें. **मेलजोल–मेल मिलाप**–मैत्री; दोस्ती. [गाडी.
**मेल**–पु. [अिं] मेलगाडी; आग-
**मेला**–पु. १ मेळावा; समुदाय. २ जत्रा.
**मेवा**–पु. [फा.] सुका मेवा. **मेवा–फरोश**–पु. मेवा विकणारा.
**मेहंदी**–स्त्री. मेंदी.
**मेह**–पु. १ प्रमेह (रोग) २ मूत्रस्राव.
**मेह**–पु. मेघ. २ पाऊस.
**मेहतर**–पु. [फा.] भंगी.
**मेहनत**–स्त्री. श्रम; मेहनत. **मेहनताना**–पु. श्रमाचा मोबदला. **मेहनती**–वि. परिश्रम करणारा.
**मेहमान**–पु. [फा.] पाहुणा.

**मेहमानदारी, मेहमानी**–*स्त्री·* आतिथ्य; पाहुणचार.
**मेहर**–*स्त्री·* [फा.] दया; कृपा.
**मेहरबान**–*वि·* [फा.] दयाळू **मेहरबानी**–दया; कृपा.
**मेहरा**–*पु·* हिजडा; नपुंसक.
**मेहराब**–*स्त्री·* [अ.] महिराप.
**मेहरी**–*स्त्री·* १ स्त्री. २ पत्नी.
**मैं**–सर्व. मी.
**मैं**–अव्य. आंत.
**मै**–*क्रि· वि·* [अ.] सह; बरोबर.
**मै**–*स्त्री·* [फा.] मद्य; दारू. (यौ.) **मैकश**–मद्यपी; दारू पिणारा. **मैखाना**–दारूचा गुत्ता; मद्यपानगृह **मैख्वार**–दारू पिणारा. **मैफरोश**–दारू विकणारा.
**मैका**–*पु·* माहेर. [मस्तावलेला.
**मैगल**–*पु·* मस्तावलेला हत्ती. *वि·*
**मैदा**—*पु·* [फा.] सपीठ.
**मैदान**–*पु·* [फा.] १ मैदान; सपाट जमीन. २ क्रीडांगण. (मु.) **मैदान करना**–लढाओ करणें. **मैदान मारना**–युद्धांत जय मिळविणें; विजयी होणें. **मैदानमें आना**–समोर येणें. **मैदान साफ होना**–शत्रूंचा नाश होणें; कांहीं अडकाठी न राहणें. **मैदाने जंग**–*पु·* [फा.] रणक्षेत्र; रणमैदान.
**मैन***–*पु·* १ कामदेव; मदन. २ मेण.
**मैमंत***–*वि·* मदोन्मत्त.
**मैयत**–*स्त्री·* [फा.] १ मृत्यु; मरण. २ शव; प्रेत. ३ प्रेतयात्रा.
**मैल**–*स्त्री·* १ मळ; घाण. २ दोषविकार. (मु.) **हाथ पैरकी मैल**–हातचा मळ; तुच्छ गोष्ट.
**मैलखोरा**–*वि·* [सं·+फा.] मळकट रंगाचा; मळखाऊ.
**मैला**–*वि·* मळकट. **मैलाकुचैला**–*वि·* १ घाणेरडा. २ मळकट कपडे घालणारा. [हातोडा.
**मोंगरी**—*स्त्री·* मोंगरी; लाकडी
**मोंढा**–*पु·* खांदा.
**मो***–सर्व. माझा.
**मोकल**–*वि·* स्वच्छंदी; स्वतंत्र.
**मोख***–*पु·* मोक्ष.
**मोखा**–*पु·* झरोका. [वेल.
**मोगरा**—*पु·* मोगऱ्याचें फूल अथवा
**मोच**—*स्त्री·* शरीर चमकणें; नस अुतरणें.
**मोची**–*पु·* चांभार(जोडे शिवणारा).
**मोछ**–*स्त्री·* मिशी.
**मोजा**–*पु·* [फा.] पायमोजा.
**मोट**–*पु·* [दे.] मोट (पाण्याची).
**मोट**–*स्त्री·* [दे.] गाठोडें. **मोटरी**–*स्त्री·* लहान गाठोडें.
**मोटा**–*वि·* १ लठ्ठ; फुगलेला; स्थूल.

२ घट्ट; दाट. ३ कमी प्रतीचा; हलका. ४ भरड. ५ मोठ्या आकाराचा. **मोटाओी**—स्त्री· १ स्थूलपणा; लठ्ठपणा. २ कुरापत; भांडखोरी. (मु.) **मोटाओी चढना**—घमेंडखोर होणें.
**मोटाना**—क्रि.अ. १ लठ्ठ होणें; फुगणें. २ घमेंड करणें. ३ श्रीमंत होणें.
**मोटिया**—पु· [ दे. ] हमाल; ओझें वाहणारा.
**मोटिया**—पु· लठ्ठ; जाडें भरडें कापड.
**मोठ**—पु· मुगासारखें अेक भरड धान्य.
**मोड**—पु· १ रस्त्याचें वळण. २ वांकण; मोडणी.
**मोडना**—क्रि· स· १ वळवणें; फिरविणें. २ घडी करणें; मोडणें. ३ बोथट करणें. (मु.) **मुँह मोडना**. विमुख होणें.
**मोतिया, मोतीबेल**—पु· मोगरा.
**मोतियाबिंद**—पु· मोतीबिंदु.
**मोती**—पु· मोत्यें. (मु.) **मोतियोंसे मुँह भरना**—पुष्कळ धन देणें.
**मोतीचूर**—पु· मोतीचुराचा लाडू.
**मोतीझिरा**—पु· [ ? ] कांजिण्या.
**मोतीसिरी**—स्त्री· मोत्यांची माळ.
**मोदी**—पु· भुसार माल विकणारा.
**मोदीखाना**—पु· [सं·+फा.] धान्याचें कोठार.
**मोन-ना**—पु· पेटारा. [ ओलें करणें.
**मोना***—क्रि· स· [ ? ] भिजविणें;
**मोम**—पु· [फा.] मेण. **मोमजामा**—पु· मेणकापड. [ मेणबत्ती.
**मोमबत्ती**—स्त्री· [ फा. + सं· ]
**मोमिन**—पु· [ अ. ] १ धर्मनिष्ठ मुसलमान. २ मुसलमान विणकर.
**मोमियाओी**—स्त्री· [फा.] नकली शिलाजीत.
**मोय***—सर्व. माझा. [घालावयाचें).
**मोयन**—पु· [?] मोहन (पदार्थांत
**मोर**—पु· मोर.
**मोरचा**—पु· [फा.] १ खंदक; खाओी. २ माऱ्याची जागा. (मु.) **मोरचा जीतना** अथवा **मारना**-माऱ्याची जागा काबीज करणें. **मोरचा लेना**—युद्ध करणें; सामना करणें.
**मोरचा**—पु· [फा.] गंज; जंग; कीट (लोखंडावरील). [ पिसांची ).
**मोरछल**—पु· चंवरी ( मोराच्या
**मोरछली**—पु· बकुळीचें झाड.
**मोरन**—पु· १ कोशिंबीर. २ शिकरण.
**मोरना**—क्रि· स· लोणी काढणें.
**मोरनी**—स्त्री· १ लांडोर. २ नथींतील लोलक.
**मोरपंखा**—पु· मोराचें पीस.
**मोरपंखी**—स्त्री· मोरासारखी आकृति अेका टोंकाला असणारी नाव.

पु. मोराच्या पिसासारखा रंग. मोरपिसाच्या रंगाचा.

**मोरवा***–पु. मोर.

**मोरी**–स्त्री. पन्हाळी; मोरी.

**मोल**–पु. मूल्य; किंमत.

**मोहतरिम**–वि. पूज्य; आदरणीय.

**मोहतरिमा**–स्त्री. आदरणीय स्त्री.

**मोहताज**–वि. [अ.] १ गरीब; कंगाल. २ भिक्षुक.

**मोहनभोग**—पु. [दे.] १ शिरा. २ अेक जातीचा आंबा.

**मोहर**—स्त्री. [फा.] १ शिक्का; मोहर; छाप. २ मोहोर (नाणें). (मु.) **मोहर लगाना**–शिक्का-मोर्तब करणें.

**मोहरा**—पु. [फा.] १ बुद्धिबळां-तील मोहरें. २ मातीचा सांचा. ३ अिस्त्री (रेशमी वस्त्राकरितां).

**मोहरा**–पु. १ भांड्याचें तोंड. २ वस्तूचा वरचा किंवा पुढला भाग. ३ सैन्याची पुढील रांग. ४ चोळीचा बंद. ५ माऱ्याची जागा. (मु.) **मोहरा लेना**–सामना करणें.

**मोहरी**–स्त्री. १ भांड्याचें लहान तोंड. २ पायजम्याची बाही.

**मोहर्रिर**—पु. [अ.] कारकून.

**मोहलत**–स्त्री. [अ.] १ सुट्टी. फुरसत. २ अवधि; मुदत.

**मोहलिक**—वि. [अ.] कसाअी.

**मोहिं***—सर्व. मला. [भ्रमित.

**मोहित**–वि. १ लुब्ध; आसक्त. २

**मौंजीबन्धन**–पु. मुंज.

**मौका**–पु. [अ.] १ संधि; योग्य वेळ. २ घटना-स्थळ. ३ जागा; स्थल.

**मौकूफ**—वि. [अ.] १ बडतर्फ (नोकरीवरून). २ रद्द केलेला. ३ अवलंबून राहणारा. ४ थांबविलेला.

**मौखिक**—वि. तोंडी.

**मौज**–स्त्री. [अ.] १ पाण्याची लाट; लहर. २ मौज; मनाचा अुत्साह.

**मौज़ा**–पु. [अ.] १ जागा. २ शेत. ३ गांव. [२ आनंदी; प्रसन्नचित्त.

**मौजी**–वि. [अ.] १ मजा मारणारा.

**मौज़ूँ**—वि. [अ.] अुचित; योग्य.

**मौजूद**–वि. [अ.] १ अुपस्थित; हजर. २ तयार. **मौजूदगी**–स्त्री. अुपस्थिति. **मौजूदा**–वि. सद्यः-स्थितीचा; चालू; विद्यमान.

**मौत**–स्त्री. [अ.] १ मरण; मृत्यु. २ मृत्युवेळ. ३ आत्यंतिक क्लेश. (मु.) **मौतका सिरपर खेलना**-मृत्यु जवळ असणें; प्राण कंकटांत असणें. **मौतके घाट अुतारना**-ठार मारणें.

**मौताद**–स्त्री. [अ.] मात्रा; प्रमाण.

**मौन**–वि. मूक; गप्प. पु.-मूकता; मौन. (-मु.) **मौन धारण करना—मौन साधना**–गप्प बसणें; न बोलणें.
**मौर**–पु. मंजिरी.
**मौर**–पु. १ लग्नांत घालावयाची पगडी. २ शिरोमणि; श्रेष्ठ.
**मौरसिरी, मौलसिरी**–स्त्री. बकुळीचें झाड.
**मौरूसी**–वि. [अ.] वडिलोपार्जित.
**मौलिक**- वि. मूळचें; स्वतंत्र; नवीन.
**मौसा**–पु. मावशीचा पति; मावसा.
**मौसिम**–पु. [अ.] १ ऋतु; मोसम; हंगाम. २ योग्य वेळ.
**मौसी**–स्त्री. [स.] मावशी. **मौसेरा** वि. मावस (भाऊ, बहिण इ.).
**मौसूफ**–वि. [अ.] १ प्रशंसित. २ उल्लिखित.
**मौसूम** -वि. [अ.] नामक.
**म्याँ**—पु. पाहा 'मियाँ'.
**म्यान**—पु. तलवारीचें म्यान.
**म्याना***–क्रि. स. [फा.] म्यानांत ठेवणें. पु. मेणा; पालखी.
**म्युनिसिपैलिटी** — स्त्री. [अिं.] नगरपालिका.
**म्रियमाण**–वि. मरावयास टेंकलेला; मृतप्राय. [२ कोमजलेला; अुदास.
**म्लान**—वि. १ मळलेला; मलिन.
**म्लेच्छ**-पु. अहिन्दु; यवन; मुसलमान.

## य

**यंत्रणा**—स्त्री. १ क्लेश; कष्ट. २ वेदना; पीडा.
**यक**—वि. [फा.] अेक.
**यकजाअी**—वि. [फा.] अेकत्र मिळालेलें; अेकंदर. [अनुपम.
**यकता**-वि. [फा.] अद्वितीय;
**यक-ब-यक, यकबारगी**- क्रि. वि. [फा.] अेकाअेकीं; अचानक.
**यकमुश्त**–क्रि. वि. [फा.] अेकाच वेळीं; अेकहातीं; अेकमुठी (रक्कम अित्यादींची फेड).
**यकसाँ**–वि. [फा.] सारखा; समान.
**यकायक**–क्रि.वि. [फा.] अेकाअेकीं; अेकदम.
**यकीन**—पु. [अ.] दृढ विश्वास; खात्री; भरंवसा. (मु.) **यकीन लाना**–विश्वास ठेवणें; मानणें.
**यकीनन**— क्रि.वि. [अ.] निश्चित-पणें; खात्रीपूर्वक; खरोखरीच.
**यकीनी**–वि. [अ.] निश्चित; ठराविक; खात्रीचा. [झालेलें बर्फ; हिम.
**यख**—पु. [फा.] गोठून घट्ट

**यखनी**—स्त्री. [फा.] मांसाचा रस्सा.
**यगाना**—वि. [फा.] १ नात्याचा; आप्तेष्ट. २ निरुपम; अद्वितीय.
**यजमान**—पु. १ यज्ञ करणारा; ब्राह्मणांना दान देणारा. २ घरमालक; पाहुण्यांचें स्वागत करणारा.
**यतीम**—पु. [अ.] अनाथ; पोरका (आईबाप नसलेला). **यतीमी**—स्त्री. अनाथ अवस्था.
**यतीमखाना**—पु. [अ.+फा.] अनाथाश्रम (पोरक्या मुलांचा).
**यथार्थवाद**–पु. वास्तववाद. [तसा.
**यथावत्**–अव्य. यथोचित; जसाच्या
**यथाविधि**—अव्य. विधिपूर्वक; ठरविल्याप्रमाणें; नियमाप्रमाणें.
**यथेष्ट**—वि. पूर्ण; भुरपूर; पुरेसें.
**यद्**—पु. [अ.] हात.
**यदि**—अव्य. जर.
**यदिचेत्**—अव्य. यद्यपि; जरी.
**यद्यपि**–अव्य. जरी.
**यम**—पु. [फा.] नदी; महानदी.
**यम**—पु. १ यमराज; मृत्यूचा देव. २ जुळें ३ संयम.
**यमद्वितीया**—स्त्री. भाऊबीज.
**यमपुर**–पु. **यमपुरी**—स्त्री. नरक.
**यमाण**–पु. १ जुळें. २ जोडपें; जोडी.
**यरकान**—पु. [अ.] १ पंडुरोग. २ कावीळ.
**यलगार**—स्त्री. [तु.] चढाई; धावा; हल्ला.
**यवद्वीप**—पु. जावाबेट.
**यवनिका**—स्त्री. नाटकाचा पडदा.
**यशी**—वि. यशस्वी.
**यशोगान**—पु. प्रशंसा; स्तुति.
**यह**—सर्व. हा, ही, हें.
**यहाँ**—क्रि. वि. येथें; या ठिकाणीं.
**यहीं**—क्रि. वि. येथेंच.
**यही**—सर्व. हाच; हीच; हेंच.
**याँ**—क्रि. वि. येथें.
**या**—अव्य. [फा.] अथवा; किंवा.
**याकूत**—पु. [अ.] लाल (रत्न).
**यातायात**–पु. दळवळण; रहदारी.
**यातें***—अव्य. यामुळें.
**यात्रा**—स्त्री. १ प्रवास. २ यात्रा. ३ प्रयाण. **यात्री**–पु. प्रवासी.
**यात्रावाल**–पु. तीर्थोपाध्याय; पंड्या.
**यात्रिक** } –पु. यात्रा किंवा प्रवास
**यात्री** } करणारा; प्रवासी.
**याद**—स्त्री. [फा.] स्मरण; आठवण. (मु.) **याद करना**–पाठ करणें. **यादगार**–स्त्री. स्मृतिचिह्न. **याददाश्त**–स्त्री. १ स्मरणशक्ति; स्मरण. २ आठवणीसाठीं वहींत केलेली नोंद. [म्हणजे.
**यानी–ने**–क्रि. वि. [अ.] अर्थात्;

**यापन**—पु. चालविणें; घालविणें; व्यतीत करणें. [अुत्पन्न; आय.
**याफ्त**—स्त्री. [फा.] मिळकत;
**याब**—प्रत्य. [फा.] मिळविणारा. (अुदा. **कामयाब**).
**याबू**—पु. [फा.] तट्टू.
**यार**—पु. [फा.] १ मदतनीस; साहाय्यक. २ मित्र. ३ जार. ४ प्रियकर. **याराना**—पु. मैत्री; दोस्ती. *वि.* मित्राप्रमाणें. **यारी**—स्त्री. १ पुरुषाचा अनुचित प्रेमसंबंध. २ मैत्री.
**यारा**—पु. [फा.] सामर्थ्य.
**याल**—स्त्री. [तु.] १ मान. २ आयाळ.
**यास**—स्त्री. [अ.] निराशा.
**यासमन यासमीन**—पु. [फा.] चमेली.
**यासीन**—स्त्री. [अ.] मृत्युसमयीं चांगली गति प्राप्त होण्यासाठीं म्हणावयास सांगतात तो कुराणांतील मंत्र.
**याहि-ही***—सर्व. याला.
**युक्ति**—स्त्री. १ अुपाय. २ कौशल्य; चातुर्य. ३ तर्क. ४ पद्धत; प्रकार.
**युग**—पु. १ जोडी. २ बारा वर्षांचा काळ. ३ खूप मोठा कालावधि. (मु.) **युगयुग**—अनेक वर्षेपर्यंत.
**युगति***—स्त्री. युक्ति.
**युगपत्**—अव्य. अेकाच वेळीं; बरोबरच; अेकदम. [संक्रमणावस्था.
**युगसंधि**—स्त्री. संक्रमणकाल;
**युनिवरसिटी**—स्त्री. [अिं.] विश्वविद्यालय; विद्यापीठ.
**युमन**—पु. [अ.] १ सुदैव. २ सफलता.
**युवक**—पु. तरुण; जवान.
**युवति-युवती**—स्त्री. तरुण स्त्री.
**युवराज**—पु. भविष्यकाळीं राजा होणारा राजाचा मोठा मुलगा; राजपुत्र.
**युवा**—वि. तरुण. (यौ.) **युवावस्था**—स्त्री. तारुण्य.
**यूँ**—अव्य. असें; अशा तऱ्हेनें.
**यूज़**—पु. [फा.] चित्ता.
**यूज़**—वि. [फा.] शेंकडा.
**यूथ**—पु. समूह; समुदाय.
**यूनान**—पु. [ग्री.] ग्रीस देश. **यूनानी**—वि. ग्रीक देशाचा. स्त्री. १ ग्रीक भाषा. २ ग्रीसनिवासी.
**यूह**—पु. समूह; झुंड; यूथ.
**ये**—सर्व. हे; हे सर्व.
**येओ***—सर्व. हात्त.
**यों**—अव्य. असें; अशा तऱ्हेनें.
**यों ही**—अव्य. १ असेंच; याप्रमाणेंच. २ सहज; अुगीच.
**योग**—पु. १ संयोग; मेळ. २

योगायोग. ३ सहकार. ४ सहवास. ५ प्रेम. ६ बेरीज.

**यौत, यौतुक**—*पु.* लग्नांत वराला किंवा वधूला मिळणारा अहेर.

**यौन**—*वि.* लैंगिक; बैषयिक.

**यौम**—*पु.* [ *अ.* ] दिवस. ( यौ. ) **यौमे आज़ादी**–स्वातंत्र्यदिन.

**यौमिया**–*पु.* [ *अ.* ] अेका दिवसाचें वेतन. *वि.* दररोजचा.

**यौवन**—*पु.* तारुण्य.

## र

**रंग**—*पु.* १ रंग. २ नाच, गाणें अित्यादि. ३ तारुण्य. ४ शोभा; सौंदर्य. ५ वजन; प्रभाव. ६ आनंद; अुत्सव ७ मनाची लहर. ८ दशा; स्थिति. ९ चाल; रीत. (यौ.) **रंग रलि**–आमोद-प्रमोद; मौज. (मु.) ( चेहेरे का ) **रंग अुड़ना या फ़क़ हो जाना**–तोंड अुतरणें; फिक्कें पडणें. **रंग जमना**–रंग येणें. **रंग निखरना**–स्वच्छ व चमकदार होणें. **रंगमें भंग होना**–आनंदांत विघ्न येणें. **रंग लाना**–प्रभाव दाखविणें.

**रंगत**—*स्त्री.* १ मजा; माज. २ स्थिति; अवस्था. ३ रागरंग.

**रंगतरा**—*पु.* नारिंग; संत्रें.

**रंगढंग**–*पु.* चालचलणूक; आचरण.

**रँगना**—*क्रि. स.* १ रंगविणें. २ प्रेमांत गुंतविणें. ३ अनुकूल करणें. *क्रि. अ.* आसक्त होणें.

**रंगबिरंगा**—*वि.* १ रंगीबेरंगी. २ अनेक प्रकारचा; विविध.

**रंगभूमि**—*स्त्री.* नाटकगृह.

**रंगमंच**—*पु.* १ मंच. २ स्टेज; रंगभूमि.

**रंग-रेली**—*स्त्री.* क्रीडा; विहार; मौज; विलास. [ रंगेल पुरुष.

**रंगरस -रसिया**—*पु.* विलासी;

**रँगरूट**—*पु.* [ अिं. ] १ रिक्रूट; नवीन भरती केलेला शिपाअी. २ नवशिक्या.

**रँगरेज़**—*पु.* [ फा. ] रंगारी.

**रँगवाना, रंगाना**— *क्रि. स.* रंगवून घेणें.

**रंगशाला**— *स्त्री.* नाटकगृह.

**रंगसाज़**—*पु.* [ फा. ] १ रंगारी. २ रंग तयार करणारा.

**रँगा**—*वि.* रंगलेला. ( मु. ) **रँगासियार**–बनेल माणूस; ढोंगी.

**रंगाअी**—*स्त्री.* रंग देण्याचें काम किंवा मजुरी. [ विविध.

**रंगारंग**—*वि.* [फा.] चित्रविचित्र;

**रंगीं**—*वि.* आनंदी; विनोदी.
**रंगीन**—*वि.* [फा.] १ रंगीत; रंगदार. २ विलासप्रिय.
**रंगीला**—*वि.* [फा.] रंगेल; रसिक.
**रंच, रंचक**—*वि.* थोडें; अल्प.
**रंज**—*पु.* [फा.] १ दुःख; खेद. २ शोक.
**रंजक**—*वि.* रंजविणारा; हांसविणारा.
**रंजक़**—*स्त्री.* [फा.] १ तोड्याच्या बंदुकीची दारू. २ अखाद्याला चिडवण्यासाठीं सांगितलेली गोष्ट.
**रंजन**—*पु.* १ मनोरंजन. २ रंगविण्याची क्रिया. ३ लाल चंदन.
**रंजना***—*क्रि. स.* १ प्रसन्न करणें. २ भजणें; स्मरण करणें. ३ रंगविणें [अनुरक्त; लुब्ध.
**रंजित**—*वि.* १ रंगलेलें. २ आनंदित. ३
**रंजिश, रंजीदगी**—*स्त्री.* [फा.] १ दुःख; खेद. २ बेबनाव. ३ शत्रुता; वैर.
**रंजीदा**—*वि.* [फा.] १ दुःखी; कष्टी; खिन्न. २ नाराज; अप्रसन्न.
**रँडापा**—*पु.* वैधव्य.
**रंडी**—*स्त्री.* वेश्या. (यौ). **रंडीबाज**—[हि. + फा.] वेश्यागामी; बाहेरख्याली.
**रँडुआ-वा**—*पु.* विधुर
**रंद्**—*पु.* १ झरोका. २ बंदूक किंवा तोफ सोडण्यासाठीं किल्ल्याच्या भिंतींत केलेलें छिद्र.
**रंदना**—*क्रि. स.* रंधणें; रंधा मारणें.
**रंदा**—*पु.* रंधा.
**रंधन**—*पु.* स्वयंपाक.
**रंभ**—*पु.* १ वेळू. २ अेक प्रकारचा बाण. ३ कठिण शब्द.
**रंभा**—*पु.* कुदळ.
**रंभाना**—*क्रि. अ.* हंबरणें.
**रअय्यत**—*स्त्री.* [अ.] रयत; प्रजा.
**रअिनी***—*स्त्री.* रजनी; रात्र.
**रअी**—*स्त्री.* घुसळण्याची रवी
**रअी**—*स्त्री.* १ भरडा. २ रवा. ३ पीठ. *वि.* १ अनुरक्त. २ संयुक्त.
**रअीस**—*पु.* [अ.] १ श्रीमंत; धनिक. २ प्रांताधिकारी. ३ जमीनदार.
**रअीसी**—*स्त्री.* श्रीमंती.
**रअुताअी***—*स्त्री.* स्वामित्व; मालकी
**रअुरे***—*सर्व.* महाराज; महाशय (आदरसूचक शब्द).
**रकछ**—*पु.* पानांची भजीं.
**रकत***—*पु.* रक्त. *वि.* लाल.
**रकतांक***—*पु.* १ पोवळें. २ केशर. ३ रक्तचंदन.
**रकबा**—*पु.* क्षेत्रफळ.
**रक़म**—*स्त्री.* [अ.] १ लिहिण्याची क्रिया अथवा भाव. २ छाप; मोहोर. ३ धन; संपत्ति. ४ दागिना. ५

चलाख; धूर्त. ६ प्रकार. ७ रक्कम.
**रकाब, रिकाब**–स्त्री· [अ.] रिकीब.
**रकाबत**—स्त्री· [अ·] चढाओढ; प्रतिद्वंद्विता.
**रकाबदार**–पु· [अ.+फा.] १ मोतद्दार. २ स्वयंपाकी. ३ हलवाओी.
**रकाबी**—स्त्री· १ तबक. २ बशी; ताटली. [ प्रतिद्वंद्वी; प्रतिस्पर्धी.
**रकीब**–पु· [अ.] १ दुसरा प्रियकर;
**रकषक**—पु· रक्षण करणारा.
**रकषा**–स्त्री· १ संरक्षण; बचाव. २ भूतबाधेपासून बचावण्याकरितां मुलांच्या गळयांत बांधतात तो गंडा.
**रकषाबंधन**–पु· नारळी पौर्णिमा; राखी पौर्णिमा.
**रकस**–पु· [अ.] नृत्य; नाच. (यौ.) **रक्से ताअूस**–मयूर-नृत्य.
**रखना**–क्रि· स· १ ठेवणें. २ सांभाळणें; रक्षण करणें. ३ वाया जाअू देणें. ४ सोंपविणें. ५ गहाण ठेवणें.
**रखनी**—स्त्री· रखेली; अुपपत्नी.
**रखवाओी–वाली**–स्त्री· १ राखण. २ राखण करण्याची मजुरी.
**रखवाना**–क्रि· स· ठेववून घेणें.
**रखवार, रखवाला**—पु· संभाळणारा; राखण करणारा.
**रखाओी**—स्त्री· १ रखवाली. २ राखण करण्याची मजुरी.
**रखाना**–क्रि· स· १ ठेववून घेणें. २ सांभाळणें.
**रखत**—पु· [फा.] १ सामान. २ पोशाख. ३ जोड्याचें कातडें. ४ थाटमाट.
**रग**—स्त्री· [फा.] १ शीर; नस. २ नाडी. ३ पानाची शीर. (मु.) **रग दबना**-कह्यांत जाणें; ताब्यांत जाणें. **रगरग फडकना**–अुत्साहित होणें; पुलकित होणें.
**रगड**–स्त्री· १ रगडणें, चेपणें अित्यादि क्रिया. २ अत्यंत मेहनत. ३ हुज्जत.
**रगडना**–क्रि· स· १ रगडणें. २ चेपणें. ३ वाटणें. ४ घांसणें. ५ भरडणें.
**रगडा**–पु· १ घर्षण; २ सतत भांडण.
**रगपट्ठा**—पु· [फा. + दे.] शरीराचे निरनिराळे अवयव. [२ अिच्छा.
**रगबत**—स्त्री· [अ·] १ प्रवृत्ति.
**रगरेशा**–पु· [फा.] १ पानांच्या शिरा. २ शरीराचे अवयव.
**रगवाना**—क्रि· स· [दे.] चूप बसविणें; शांत करणें.
**रगाना**–क्रि· अ· [दे.] चूप होणें; गप्प राहणें. क्रि· स· चूप करणें.
**रगेदना**— क्रि· स· पळावयास लावणें; पाठलाग करणें.

**रचना**—स॰ १रचणें; बनविणें. २सजविणें. स्त्री॰ १कृति. २ रचनाकौशल्य. ३ लेख, कविता वगैरे.
**रचयिता**—पु॰ कर्ता; करणारा.
**रचवाना, रचाना**—स॰ १ रचविणें; बनविणें. २ मेंदी लावून घेणें.
**रज**—पु॰ १ आर्तव; ऋतु. २ पाणी. ३ पाप. ४ पुष्पपराग. ५ चांदी. ६ धोबी. [ज्योति.
**रज**—स्त्री॰ १धूळ. २ रात्रि. ३प्रकाश;
**रजक**—पु॰ धोबी; परीट.
**रजत**—पु॰ १ चांदी. २ रुपें. ३ रक्त. ४ सोनें. वि॰ १ पांढरें; शुभ्र. २ लाल. [क्रि॰ स॰ रंगविणें.
**रजना**—क्रि॰ अ॰ रंगणें; मग्न होणें.
**रजनि-रजनी**—स्त्री॰ १ रात्र;निशा. २ हळद. [सातवा महिना.
**रजब**—पु॰ [अ॰] अरबी वर्षांचा
**रजवाडा**—पु॰ १ राज्य. २ देशी संस्थान. ३ राजा.
**रज़ा**—स्त्री॰ [अ॰] १ अिच्छा; मर्जी. २ सुट्टी. ३ अनुमति. ४ स्वीकृति. [अंगावर पाजणें.
**रजाअत**—स्त्री॰ [अ॰] मुलाला
**रजाअि-ई**—स्त्री॰ राजाज्ञा.
**रज़ाअी**—स्त्री॰ [अ॰] १ लेप; रजअी. वि॰ दूधभाअू.
**रज़ामंद**—वि॰ [अ॰ + फा॰] मान्य करणारा; राजी; कबूल असलेला.
**रज़ील**—वि॰ [अ॰] नीच; हलक्या जातीचा.
**रज़्ज़ाक**—पु॰ [अ॰] १ धनी; पालन पोषण करणारा. २ अीश्वर.
**रज्जु**—स्त्री॰ १ दोरी. २ लगाम.
**रट**—स्त्री॰ घोकंपट्टी.
**रटना**—क्रि॰ स॰ १ पाठ करणें; लक्षांत ठेवणें. २ घोकंपट्टी करणें.
**रण**—पु॰ युद्ध; संग्राम; लढाअी.
**रणखेत***—पु॰ रणक्षेत्र.
**रणना**—क्रि॰ अ॰ वाजणें.
**रतजगा**—पु॰ जागरण.
**रतन**—पु॰ रत्न.
**रतनागर***—पु॰ रत्नाकर; समुद्र.
**रतनार-रा**—वि॰ लालसर.
**रतनालिया***—वि॰ लालसर.
**रातना***—क्रि॰ अ॰ रत होणें, मग्न होणें. क्रि॰ स॰ आकर्षिणें.
**रति**—स्त्री॰ १ मदनाची बायको. २ सुंदरी. ३ संभोग.
**रतिक***—क्रि॰ वि॰ किंचित्; थोडेसें.
**रतिनाह** —पु॰ रतिनाथ; कामदेव; मदन.
**रतिराअी***—पु॰ कामदेव; मदन.
**रतौंधी**—स्त्री॰ रातांधळें.
**रत्ती**—स्त्री॰ गुंज. (मु.) **रत्तीभर**—किंचित्; थोडा; रेंसभर.

**रत्थी**—स्त्री. तिरडी.
**रद्**—पु. दांत.
**रद, रद्द**—वि. [ अ. ] १ रद्द. २ टाकाअू. (यौ.) **रद्दोबदल**—बदल; फेरफार.
**रदच्छद्***—पु. ओंठ.
**रद्द**—वि. पाहा ' रद '
**रद्दा**—पु. [ दे. ] अेकावर अेक रचलेला वस्तूंचा थर.
**रद्दी**—वि. [ अ. ] कुचकामाचा; टाकाअू; निरुपयोगी. स्त्री. निरुपयोगी वस्तु. [ कृष्ण; रणछोड.
**रन***—पु. रण. (यौ.) **रनछोर**—पु.
**रनबंका-बाँकुरा**—पु. शूर; वीर; योद्धा; रणबांका. [ राणीवसा.
**रनवास, रनिवास**—पु. अंतःपुर;
**रनी***—पु. वीर; योद्धा; रणी.
**रपट**—स्त्री. [अिं.] रिपोर्ट; वृत्तान्त.
**रपट**—स्त्री. १ फेरफटका; रपेट. २ घसरगुंडी. ३ जमिनीचा अुतार.
**रपटना**—क्रि. अ. घसरणें; घाअीनें चालणें. [ फटका करावयास लावणें.
**रपटाना**—क्रि. स. १ घसरविणें; २ फेर-
**रफल**—पु. [अिं.] पांघरण्याचें गरम वस्त्र; शाल.
**रफा**—वि. [ अ. ] १ दूर केलेला. २ निवृत्त; शांत. पु. १ अुंची.
**रफादफा**—वि. [अ.] काढून टाकलेलें.
**रफ़ीक**—पु. [अ.] १ मित्र; साथी. २ साहाय्यक.
**रफू**—पु. [ अ. ] रफू करण्याचें काम.
**रफ़ूगर**—पु. [ अ. + फा. ] रफू करणारा.
**रफूचक्कर**—क्रि. वि. [ अ. + स. ] पळालेला; अदृश्य; नाहींसा झालेला; फरारी झालेला.
**रफ्त**—वि. [ फा. ] भूतकालीन. (यौ.) **रफ्त व गुजश्त**—जुनाट व कुचकामी झालेला; व्यतीत.
**रफ्तगी**—स्त्री. [फा.] जाणें; गमन.
**रफ्तनी**—स्त्री. [फा.] मालाची निर्यात.
**रफ्तार**—स्त्री. [ फा. ] गति; चाल. **रफ्तार व गुफ्तार**—बोलण्याची व राहाण्याची पद्धत.
**रफ्ता-रफ्ता**—क्रि. वि. [ फा. ] सावकाश; हलुहलू; क्रमानें.
**रब**—पु. [अ.] १ अीश्वर. २ पालनपोषण करणारा.
**रबड**—पु. [ अिं. ] रबर.
**रबडना**—क्रि. स. १ ढवळणें. २ फेनणें.
**रबडी**—स्त्री. बासुंदी. [ श्रम.
**रबदा**—पु. १ चिखल. २ चालण्याचे
**रबी**—स्त्री. [ अ. ] १ वसंत अृतूंत कापलें जाणारें रब्बीचें पीक. २ वसंत अृतु.
**रबीब**—पु. [ अ. ] १ पाळलेला

मुलगा. २ बायकोच्या पहिल्या नवऱ्याचा मुलगा.

**रब्त**–*पु.* [*अ.*] १ अभ्यास; संवय; राबता. २ घनिष्ठ संबंध. (यौ.) **रब्तजब्त**-मेळ; मिलाफ; घनिष्ठता.

**रमज़ान**–*पु.* [*अ.*] मुसलमानांचा अुपवासाचा महिना.

**रमज़ानी**—*वि.* [*अ.*] १ रमजान सणासंबंधीं. २ रमजान महिन्यांत जन्मलेला. ३ भुकेला; अुपाशी.

**रमण**–*पु.* १ पति. २ कामदेव; ३ विलास. **रमणीक–रमणीय**–*वि.* सुंदर; मनोहर; रमणीय. [करणें.

**रमना**–*क्रि. अ.* १ रमणें. २ सहल

**रमल**–*पु.* [*अ.*] फाशांवरून वर्तविलें जाणारें भविष्य.

**रमाना**–*क्रि. स.* १ रमविणें; मोहून टाकणें; भुलविणें. २अनुकूल करणें. ३ थोपविणें. ४ लावणें; जोडणें.

**रमैनी**–*स्त्री.* कबीराच्या बीजक नामक ग्रंथाचा दुसरा भाग.

**रम्माल**–*पु.* [*अ.*] रमल विद्या जाणणारा.

**रयना***–*क्रि. अ.* १ रंगणें; रंगानें भिजणें. २ प्रेममग्न होणें. ३ अेकरूप होणें.

**रयनि***–*स्त्री.* १ रजनी; रात्र.

**रय्यत**—*स्त्री.* [*अ.*] रयत; प्रजा.

**ररिहा***–*पु.* १ वटवट करणारा. २ घुबडासारखा अेक पक्षी. ३ मागणारा; याचक.[करणें.

**रलाना**–*क्रि. स.* मिसळणें; अेकत्र

*क्रि.अ.* अेकत्र होणें.

**रली**—*स्त्री.* १ क्रीडा; विहार. २ मौज; आनंद.

**रव**–*पु.* १ शब्द; नाद; गुंजारव. २ मोठा आवाज.

**रवन***-*पु.* रमण; पति. *वि.* क्रीडा, विहार करणारा. **रवनी**–*स्त्री.* १; पत्नी; स्त्री. २ रमणी.

**रवाँ**–*वि.* [*अ.*] १ चालू; सुरू झालेला. २ प्रवाही ३ संवयीचा. ४ प्रचलित; रूढ. *पु.* जलद वाचन.

**रवा**–*वि.* [फा.] अुचित; योग्य.

**रवाज**–*स्त्री.* [*अ.*]चालरीत; रिवाज.

**रवानगी**–*स्त्री.* [फा.] १ प्रस्थान. २ पाठवणी. [२ पाठविलेला.

**रवाना**–*वि.* [फा.] १ निघालेला.

**रवानी**–*स्त्री.*[फा.] १प्रवाह. २ वेग.

**रवायत**–*स्त्री.* [*अ.*] १ कथानक. २ प्रथा. ३ म्हण. [घाअी; शीघ्रता.

**रवारवी**–*स्त्री.* [फा. + अनु]

**रवि**–*पु.* १ सूर्य. २ अग्नि. ३ सरदार.

**रविश**–*स्त्री.* [फा.] १ गति; चाल. २ तऱ्हा; पद्धत; वागणूक; ३ बागेंतील पायवाट.

**रवैया**—पु॰ [फा.] १ वागणूक; वर्तणूक. २ चालरीत; पद्धत.
**रश्क**—पु॰ [फा.] १ अीर्ष्या; मत्सर वैर; शत्रु॰व.
**रश्के जहाँ**—वि॰ [फा.] जगाला हेवा वाटणारा.
**रश्के-परी**—स्त्री॰ [फा.] परम सुंदरी.
**रश्मि**—पु॰ १ किरण २ लगाम. (यौ.) **रश्मिमाली**—१सूर्य. २चंद्र.
**रस**—पु॰ १ रस. २ स्वाद. ३ प्रेम (मु.) **रस भीगना या भीजना**-तारुण्यास प्रारंभ होणें. [औषधी.
**रसकपूर**—पु॰रसकापूर, अेक विषारी
**रसकोरा**—पु॰ [दे.] रसगुल्ला नांवाची मिठाअी.
**रसखीर**—स्त्री॰ [दे.] साखरभात.
**रसगुल्ला**—पु॰अेक बंगाली मिठाअी.
**रसद**—स्त्री॰ [फा.] १ वांटा; हिस्सा. २ शिधा. ३ रसद; अन्नपुरवठा. (मु.) **हिस्सा-रसद**—योग्य वांटा.
**रसदार**—वि॰ [सं॰+फा.] १ रसाळ. २ रुचकर; स्वादिष्ट. [३ लगाम.
**रसना**—स्त्री॰ १ जीभ. २ दोरी.
**रसना**—क्रि॰ अ॰ १ झिरपणें; गळणें. २ आनंदमय होणें. ३ रसास्वाद घेणें. ४ प्रेमांत गुंतणें.
**रसभरी**—स्त्री॰ [अिं.] रासबेरी फळ.
**रसभीना**—वि॰ रसभरित.
**रसम**—स्त्री॰ [अ॰] १ चालरीत; रिवाज; प्रथा. २ मेळ; संबंध.
**रसराज**—पु॰१ पारा. २ शृंगार रस.
**रसा**—स्त्री॰ १ पृथ्वी; जमीन. २ जीभ; रसना.
**रसाअी**—स्त्री॰ [फा.] पोंच; प्रवेश.
**रसायन**—पु॰ १ धातूचें भस्म. २ अमृत. ३ किमया.
**रसाल**—पु॰ १ आंबा. २अूंस. ३गहूं. ४ फणस. वि॰ रसाळ; मधुर; सुंदर.
**रसिया**—पु॰ १ रसिक; शौकी. २अेक प्रकारचें गीत.
**रसीद**—स्त्री॰ [फा.] पावती.
**रसीला**—वि॰ १रसभरित.२स्वादिष्ट; रुचकर. ३ सुंदर. ४ रसिक.
**रसूम**—पु॰ [अ॰] १ नियम; कायदा. २ चालीरीती; रिवाज ('रस्म' चें बहु.).
**रसूल**—पु॰ [अ॰]१ अीश्वराचा संदेश-वाहक. २ मार्गदर्शक; पैगंबर.
**रसोअिया**-पु॰ आचारी; स्वयंपाकी.
**रसोअी**—स्त्री॰ स्वयंपाक.
**रसोअीघर**—पु॰ स्वयंपाकघर.
**रसौर**—पु॰ अुसाच्या रसांत शिजविलेला भात.
**रस्ता**—पु॰ [फा.] मार्ग; रस्ता.
**रस्म**—स्त्री॰ [फा.] १ पगार; वेतन. २ पाहा 'रसम'.

**रस्सा**–पु· जाड दोर. **रस्सी**–स्त्री· दोरी; रस्सी.
**रहँकला**–पु· १ अेक प्रकारची गाडी; रेकला. २ तोफेची गाडी.
**रहँट**–पु· रहाट. **रहँटा**–पु· चरखा.
**रहँसना**–क्रि· अ· प्रसन्न होणें.
**रहज़न**–पु· [फा.] डाकू; लुटारू.
**रहन**–स्त्री· १ राहणी. २ व्यवहार. (यौ.) **रहन-सहन**–स्त्री· राहणी.
**रहना**–क्रि· अ· राहणें.(यौ.) **रहा सहा**–अुरलें सुरलें.
**रहनुमा**–वि· [फा.] मार्गदर्शक.
**रहबर**–वि· [फा.] मार्गदर्शक.
**रहम**–पु· [अ·] दया; करुणा.
**रहमत**–स्त्री· [अ·] १ कृपा; दया. २ वृष्टि; वर्षाव.
**रहमदिल**–वि· [अ· + फा.] दयाळू
**रहमान**—वि· [अ·] दयाळू. पु· अीश्वराचें नांव. [लाकडी कैंची.
**रहल**–स्त्री· [अ·] पोथी ठेवण्याची
**रहस्य**—पु· १ गुप्त गोष्ट; मर्म. २ थट्टा मस्करी.
**रहीम**–वि· [अ·] दयाळू; कृपाळू पु· १अीश्वर. २ अेक कवि व साधु.
**रहैया**·पु· रहिवासी.
**राँगा**–पु· १ कथील. २ शिसें.
**राँचना**–क्रि·अ· १अनुरक्त होणें; प्रेम करणें. २तद्रूप होणें; समरस होणें. क्रि· स· १ तद्रूप करणें. २ रंगविणें. ३ समरस करणें.
**राँड**–स्त्री· १ विधवा. २ वेश्या.
**राँधना**–क्रि· स· स्वयंपाक करणें.
**राँपी**–स्त्री· [दे.] चांभाराची रापी.
**राँभना**–क्रि· अ· गाअीचें हंबरणें.
**राअी**–स्त्री· १ मोहरी. २ अल्प प्रमाण. (मु.) **राअीकाअी करना**–तुकडे तुकडे करणें; नष्ट करणें.
**राअीसे पर्वत करना; राअीका पहाड बनाना**—राअीचा पर्वत करणें; अेवढीशी गोष्ट फुगवून सांगणें.
**राअु***–पु· राव; राजा; नरेश.
**राअुर**–पु· अंतःपुर; राअूळ.
**राअूल***–पु· १ राजकुलांत अुत्पन्न झालेला. २ राजा.
**राकस***-पु· राक्षस.
**राका**–स्त्री· पौर्णिमेची रात्र.
**राख**–स्त्री· राख; भस्म.
**राखना**–क्रि· स· १ रक्षण करणें. २ राखण करणें; संभाळणें. ३ कपट करणें; लपवून ठेवणें. ४ अडकविणें. ५ आरोप करणें.
**राग**–पु· १ प्रेम; प्रीति. २ द्वेष; मत्सर. ३ पीडा; कष्ट; ४ आल्मा. ५ संगीतांतील राग. (मु.) **अपना अपना राग अलापना**

स्वतःचीच टिमकी वाजविणें; आपलेंच घोडें पुढें दामटणें. (यौ.) **रागरंग**—आमोद; प्रमोद; विलास; नाचगाणें. **रागनी**—*स्त्री·* रागिणी; संगीतांतील लहान राग.

**राछ**—*पु·* १ फणी ( हातमागाची ). २ मिरवणूक; वरात.

**राज़**—*पु·*[फा.] रहस्य;गौप्य. **राज़-दार**—रहस्य जाणणारा.

**राज**—*पु·*१ राज्य. २ स्वामित्व. ३ शासनकाल. ४ देश.

**राज**—*पु·* १ गवंडी. २ राजा.

**राजकन्या**—*स्त्री·* राजाची मुलगी.

**राजगीर** *पु·* १ गवंडी; कारागीर. २ राजगृह. [राजाचें निवासनगर.

**राजधानी**—*स्त्री·* देशाचें शासनकेंद्र;

**राजना***—*क्रि· अ·* १ राहणें;असणें. २ विराजणें; शोभणें.

**राजनीति**—*स्त्री·* राजकारण. [कीय.

**राजनीतिक**—**राजनैतिक** *वि·* राज-

**राजपाट**—*पु·* राज्य. [ कालवा.

**राजबाहा**—*पु·* सर्वांत मोठा व मुख्य

**राजमहल**—*पु·*[सं·+फा.] राजवाडा. राजमंदिर;

**राजसा**—*वि·* राजासारखा; बहुमूल्य.

**राज़ी**—*वि·* [अ.] १ खुश; प्रसन्न. २ सुखी. ३ सम्मत; तयार; राजी. ४ निरोगी

**राजीनामा**—*पु·* [ अ·+फा. ] तड-जोडपत्र.

**राजीव**—*पु·* कमळ.

**राज्य**—*पु·* १ राज्य; २ प्रांत; प्रदेश. ( यौ. ) **राज्यपरिषद्**—**राज्य-सभा**-वरिष्ठ कायदेमंडळ,(पार्लमेंट) कौन्सिल ऑफ स्टेटस.

**राज्यपाल**—*पु·* गव्हर्नर.

**राज्यारोहण**—*पु·* राज्याभिषेक.

**रात**—*स्त्री·* रात्र. [ २ खुराक.

**रातिब**—*पु·*[अ·]१ जनावराचें खाद्य.

**रान**—*स्त्री·* मांडी.

**राम**-*पु·* श्रीरामचंद्र. ( यौ. ) **रामकहानी**—रडगाणें; दुःखाची गोष्ट. (मु.) **रामराम**—नमस्कार. **रामराम करके**—मोठ्या मुष्कि-लीनें. **रामराम सत्त हो जाना**—मरणें. [ धारक.

**राम**-*वि·* [फा.] १ सेवक. २ आज्ञा-

**रामतरोई**—*स्त्री·* भेंडी.

**रामबाँस**—*पु·*१ अेक प्रकारचा मोठा बांबू. २ घायपात.

**रामरमौवल**—*स्त्री·*[दे.] गप्पागोष्टी.

**रामरसरा**—*पु·* पाल्हाळ; चऱ्हाट.

**राय**—*स्त्री·*[फा.] १ मत. २ सल्ला; विचार.

**राय**—*पु·* राव; राजा.

**रायज**—*वि·* [अ.] रूढ; प्रचलित.

**रायट**—पु· [अि.] बंड.
**रायता**—पु· कोशिंबीर; भरीत.
**रायरासि**—स्त्री· राजाचा खजिना.
**रार**—पु· तंटा.; झगडा; हुज्जत.
**राल**—स्त्री· राळ.
**राल**—स्त्री· लाळ.
**रावरा—रावरो**— सर्व. आपला. पु· १ अंतःपुर. २ राजमहाल.
**राष्ट्र**—पु· १ राष्ट्र. २ प्रदेश. (यौ.) **राष्ट्रभाषा**—१ राष्ट्रीय भाषा. २ हिन्दी. ३ हिंदुस्तानी.
**रास**—स्त्री· [फा.] १ रस्ता; सडक. २ राहू ( ग्रह ) ३ पागा.
**रास**—स्त्री· [अ.] लगाम.
**रास**—स्त्री· १ भूशिर. २ वरचा भाग.
**रास**—वि· [ फा. ] अनुकूल; योग्य.
**रासो** पु·राजाचें पद्यमय जीवनचरित्र.
**रास्त**-वि·[फा.]१ सरळ;सीधा.रास्त. २ ठीक; बरोबर. ३ अुचित; योग्य.
**रास्ता**-पु· [ फा. ] १ रस्ता; मार्ग. २ चाल; प्रथा. ३ अुपाय; युक्ति.
**राह**—स्त्री· [ फा. ] १ रस्ता; मार्ग. २प्रथा; चाल. ३ नियम.
**राहखर्च**—पु· [फा.] प्रवास-खर्च.
**राहगीर**—पु·[फा.]मुशाफिर;प्रवासी.
**राहचलता**—पु· [ फा.+सं· ] १ वाटसरू; पांथस्थ. २ परका.
**राहज़न**—पु· [फा.] डाकू. **राहज़नी**-स्त्री· वाटमारी.
**राहत**—स्त्री· [ अ· ] आराम; चैन.
**राह-व-रब्त**—पु· [ फा.+अ· ] येणेंजाणें; घरोबा; घनिष्ठ संबंध .
**राह-व-रस्म**—स्त्री· [फा. +अ·] निकट संबंध.
**राहिब**—पु· [अ·] बैरागी; विरक्त.
**राही**—पु· [फा. ] प्रवासी; यात्रेकरू.
**रिंगन**—स्त्री· रांगणें.
**रिंद**—पु·[फा.] १ नास्तिक; धार्मिक बंधनें न मानणारा. २ स्वच्छंद; स्वैराचारी. वि· १ लहरी. २ मदोन्मत्त; अुडाणटप्पू.
**रिआयत, रियायत**-स्त्री· [ अ· ] १ सवलत. २ लक्ष. ३ दयापूर्ण व्यवहार. ४ न्यूनता.
**रिआया**—स्त्री· [ अ· ] प्रजा.
**रिकार्ड**—पु· [ अि. ] रेकार्ड; नोंद; नोंदणी. [ २ निर्धन.
**रिक्त**—वि· १ रिकामा; शून्य.
**रिज़क-रिज्क**—पु· [अ·]१ दररोजचें जेवण; आहार. २ आजीविका.
**रिझाना**—क्रि· स· प्रसन्न करणें.
**रिझावना***—क्रि· स·रमविणें; प्रसन्न ठेवणें..
**रिनिआँ***-वि· अृणकरी; कर्जदार.
**रिपोर्ट**—स्त्री· [अि.] पाहा 'रपट'
**रिफार्म**—पु· [ अि· ] सुधारणा.

**रिमझिम**—*स्त्री.* [अनु.] झिमझिम पाऊस.
**रिमार्क**—*पु.* [अिं.] विधान; कथन.
**रिया**—*स्त्री.* [अ.] धोका; दगा; कपट.
**रियाकार**—*वि.* [अ.+फा.] दगलबाज; कपटी.
**रियाज़**—*पु.* [अ.] अभ्यास; मेहनत.
**रियाज़ी**—*स्त्री.* [अ.] गणित.
**रियासत**—*स्त्री.* [अ.] १ राज्य; संस्थान. २ वैभव; अैश्वर्य; श्रीमंती.
**रिलना**—*क्रि. अ.* [दे.] १ प्रवेश करणें; शिरणें. २ मिसळणें. रमणें.
**रिलीफ**—*पु.* [अिं.] सुटका.
**रिवाज**—*पु.* [अ.] चाल; रीत; प्रथा; पद्धत.
**रिवाल्वर**—*पु.* [अिं.] पिस्तुल.
**रिश्ता**—*पु.* [फा.] नातें; संबंध. **रिश्तेदार**—नातलग.
**रिश्वत**—*स्त्री.* [अ.] लांचलुचपत.
**रिश्वतखोर**—*वि.* [अ.+फा.] लांचखाअू.
**रिस, रीस**—*स्त्री.* राग; क्रोध.
**रिसाना**—*क्रि. अ.* रागावणें.
**रिसालत**—*स्त्री.* [अ.] १ अीश्वराचा प्रेषित असणें; पैगंबरी. २ परराष्ट्र-वकिली.
**रिसाला**—*पु.* १ पत्र. २ लहान पुस्तक. ३ घोडदळ. ४ मासिक.
**रिसिआना-याना**—*क्रि.अ.* रागावणें. **रिसौंहाँ**—*वि.* रागावलेला; नाराज.
**रिहा**—*वि.* [फा.] बंधमुक्त; सुटका झालेला. **रिहाअी**—*स्त्री.* सुटका.
**रीझ**—*स्त्री.* प्रसन्नता.
**रीझना**—*क्रि.अ.* प्रसन्न होणें.
**रीढ**—*स्त्री.* पाठीचा कणा.
**रीत-ति**—*स्त्री.* १ रीत; पद्धत; तऱ्हा. २ चालरीत; परिपाठ. ३ नियम.
**रीता**—*वि.* रिकामा; रिक्त.
**रुँदवाना**—*क्रि. स.* दुसऱ्याकडून तुडवून घेणें.
**रुँधना**—*क्रि.अ.* १ थांबणें. २ अडकून पडणें; फसणें. ३ कामांत गुंतणें. ४ घेरलें जाणें.
**रु**—*अव्य.* आणि.
**रुआसो***—*वि.* रडवा.
**रुकना**—*क्रि.अ.* १ थांबणें; अडकून पडणें. २ अडून राहणें.
**रुकवाना**—*क्रि.स.* आडकाठी करविणें; थांबविणें.
**रुकाव**—*पु.* आडकाठी; अडथळा.
**रुकावट**—*स्त्री.* अडथळा.
**रुक्का**—*पु.* [अ.] चिठ्ठी; पत्र; रोखा.
**रुख**—*पु.* [फा.] १ गाल. २ तोंड. ३ कृपादृष्टि. ४ पुढला भाग. ५ हत्ती (बुद्धिबळ). *क्रि. वि.* कडे; समोर.
**रुख**—*पु.* वृक्ष; झाड.

**रुखसत**—*स्त्री·* [*अ·*] १ आज्ञा; परवानगी. २ रजा; मोकळीक.
**रुखाओी**—*स्त्री·* १ रुक्षपणा. २ कठोरता. ३ बेमुरवतपणा.
**रुखानी**—१ *स्त्री·* सांताकसनी; रंधिट. २ पटाशी.
**रुखौहा**—*वि·* रुक्ष; शुष्क.
**रुचना**—*क्रि· अ·* रुचणें; पसंत पडणें.
**रुचि** —*स्त्री·* रुचि; स्वाद; गोडी. (यौ.) **रुचिकर-रुचिकारक**—रुचकर; रोचक; गोड. **रुचिर**—सुंदर; मनोरम.
**रुचिराओी***—*स्त्री·* सौंदर्य; रुचिरता.
**रुज**—*पु·* १ भंग. २ वेदना; कष्ट. ३ जखम; घाव.
**रुजी**—*वि·* [*अ·*] अस्वस्थ; आजारी.
**रुजू**—*वि·* [*अ·*] कार्यमग्न; तल्लीन.
**रुठाना**—*क्रि· स·* नाराज करणें; नाखूष करणें.
**रुत**—*स्त्री·* ऋतु; मोसम.
**रुतबा**—*पु·* [*अ·*] १ पदवी, हुद्दा; दर्जा. २ प्रतिष्ठा; मान.
**रुपना**—*क्रि·अ·* रुतणें; अडकणें.
**रुपसी**—*स्त्री·* सुंदरी.
**रुपहला**—*वि·* रुपेरी.
**रुबआ**—*वि·* [*अ·*] अेकचतुर्थांश.
**रुबाओी**—*स्त्री·* [*अ·*] चार चरणांचा श्लोक.
**रुमाली**—*स्त्री·* [फा.] लंगोट.
**रुराओी***—*स्त्री·* सौंदर्य.
**रुरुआ-वा**—*पु·* मोठें घुबड.
**रुलाओी**—*स्त्री·* रडें; रडणें.
**रुलाना**—*क्रि· स·* रडविणें.
**रुलाना**—*क्रि· स·* नष्ट करणें.
**रुसूख**—*पु·* [*अ·*] १ दृढता. २ धैर्य. ३ स्नेह. ४ विश्वास.
**रुसूम**—*पु·* [*अ·*] १ चाल; प्रथा. २ वर्षासन.
**रुस्तम**—*पु·* [फा.] १ अिराणांतील अेक प्रसिद्ध योद्धा. २ शूर व्यक्ति.
**रुस्तमी**—*स्त्री·* शौर्य; वरिता.
**रुहठि**—*स्त्री·* रुसवा; राग; घुस्सा.
**रूँध**—*वि·* अडविलेला.
**रूँधना**—*क्रि· स·* अडविणें; घेरणें.
**रू**—*पु·* [फा.] चेहरा; आकृति. *स्त्री·* १ कारण; सबब. २ तळ; बूड. ३ अग्रभाग. ४ आशा.
**रूओी**—*स्त्री·* १ कापूस. २ तंतू.
**रूओीदार**—*वि·* [*सं·* + फा.] कापसाचा.
**रूखा**—*वि·* १ रुक्ष; शुष्क. २ बेचव; नीरस. ३ खडबडीत. ४ उदास; विरक्त. **रूखापन**—*वि·* शुष्कपणा; रुक्षता. (मु.) **रूखा सूखा**—ओलें-कोरडें; गरीबीचें जेवण.
**रूठ-रूठन**—*स्त्री·* रुसवा; राग.

**रूठना**–*क्रि. अ.* रुसणें.
**रूढि**–*स्त्री.* १ चाल; प्रथा. २ अुत्पत्ति. ३ ख्याति. ४ वाढ
**रूप**–*पु.* १ रूप; सौंदर्य. २ चेहरा.
**रूपक**–*पु.* १ मूर्ति. २ अेक अलंकार.
**रूपांतर**–*पु.* दुसरें रूप; परिवर्तन.
**रूपा**–*पु.* रुपें. [लेला. २फरारी.
**रूपोश**–*वि.* [फा.] १ गुप्त; लप-
**रूबकार**–*पु.* [फा.] १ सादर करणें. २ कोर्टाचा हुकूम. ३ आज्ञापत्र.
**रूबरू**–*क्रि. वि.* [फा.] प्रत्यक्ष; समोरासमोर.
**रूम**-*पु.* [फा.] १ तुर्कस्तान. २ रोम.
**रूमाल**-*पु.*[फा.] रुमाल.[ओरड करणें.
**रूरना**–*क्रि. अ.* १ रडणें. २ आरडा-
**रूस**–*पु.* [दे.] रशिया.
**रूसना**–*क्रि. अ.* रुसणें; रागावणें.
**रूसी**–*वि.* रशियासंबंधीं.
**रूह**–*स्त्री.* [अ.] १ आत्मा. २ सत्त्व; सार; तथ्य. **रूहानी**–*वि.* आत्म्या-संबंधीं; आध्यात्मिक. [ ओरडणें.
**रेंकना**–*क्रि. अ.* [अनु.] गाढवाचें
**रेंगना**–*क्रि. अ.* १ सरपटणें; चालणें. २ सावकाश चालणें; वळवळणें.
**रेंट**–*पु.* [दे.] मेकूड. [चें बी.
**रेंड**–*पु.* अेरंडाचें झाड. *स्त्री.* अेरंडा-
**रेंडी**–*स्त्री.* अेरंडाचें बी. [भिसरूड.
**रेख**–*स्त्री.* १ रेघ. २ चिह्न. ३
**रेग**–*स्त्री.* [फा.] रेती; वाळू.
**रेगिस्तान**–*पु.* [फा.] वाळवंट.
**रेजगी, रेजगारी**–*स्त्री.* [फा.] चिल्लर; मोड. [ २कपड्याचें ठाण.
**रेज़ा**–*पु.* [फा.] १ लहान तुकडा.
**रेत**–*स्त्री.* रेती. २ गुळगुळीत करणें.
**रेतना**–*क्रि.स.* १ कानशीनें घासणें.
**रेता**–*पु.* १ रेती. २ माती.
**रेती**–*स्त्री.* रेताड नदीकांठ .
**रेतीला**–*वि.* रेताड; वालुकामय.
**रेती**–*स्त्री.* कानस.
**रेनु**–*पु.* १ धूळ; रेणु. २ रेती. ३ पृथ्वी. ४ कण; अणुरेणु.
**रेल**–*स्त्री.* [अि.] १ आगगाडी. २ आगगाडीचे रूळ. [आगगाडी.
**रेलगाडी**—*स्त्री.* [अि + सं.]
**रेलठेल**–*स्त्री.* [दे.] १ भडिमार; अधिकता. २ दाटी; गर्दी.
**रेलना**–*क्रि. स.* [दे.] १ रेलणें. २ दुसऱ्यावर रेलून अुभें राहणें. ३ अधाशीपणानें खाणें. *क्रि. अ.* भरगच्च असणें.
**रेलपेल**—*स्त्री.* पाहा ' रेलठेल '.
**रेला**–*पु.* [दे.] १ पाण्याचा लोंढा. २ हल्ला; धांवा. ३ धक्का; रेटा-रेटी. ४ आधिक्य; विपुलता.
**रेवड**–*पु.*[दे.] शेळयामेंढ्यांचा कळप.

**रेवडी**–स्त्री· तीळ व गूळ मिसळून केलेली मिठाआी.

**रेस्तराँ**–पु· [ फ्रेंच ] अुपहारगृह; हॉटेल.

**रेशा**–पु· [ फा. ] काथ्या; फळावरील तंतु.

**रेह**–स्त्री· [ ? ] खारी माती.

**रेहन**–पु· [ फा. ] गहाण ठेवणें. **रेहनदार**–पु· गहाण ठेवून घेणारा; सावकार.

**रेहननामा**–पु· [ अ· + फा. ] गहाणखत.

**रैदास**–पु· [?] १ रोहिदास साधु. २ चांभार.

**रैन-रैनि**–स्त्री· रात्र.

**रैयत**–स्त्री· [ अ· ] रयत; प्रजा.

**रैहान**–पु· [अ·] तुळशीसारखें एक सुगंधित झुडुप.

**रोंगटा**–पु· रोमांच; कांटा. ( मु. ) **रोंगटे खडे होना**—भीतीमुळें अंगावर कांटा अुभा राहाणें.

**रोंगटी**–स्त्री· खेळांत बेअिमानी करणें किंवा रागावणें; रडी; रड्डी.

**रोंधना**–क्रि·स·पायाखालीं तुडविणें.

**रोआ-याँ**— [?] रोम; लंव; केंस.

**रोआब**–पु·[अ·]वचक; रुबाब; अैट.

**रोक**–स्त्री· अडथळा; आडकाठी. ( यौ. ) **रोकटोक**—अडथळा; मनाअी.

**रोकड**–स्त्री· [ सं.+अ· ] १ नगद; रोख. २ जमा; भांडवल. पु· **रोकडिया**–पु· खाजिनदार.

**रोकना**–क्रि· स· अडविणें; थांबविणें; रोखणें.

**रोगन**–पु· [ फा. ] पॉलिश; रोगण.

**रोचक**-वि· १ स्वादिष्ट. २ मनोरंजक.

**रोचना**–स्त्री· १ लाल कमळ १ रक्तचंदन. ३ वसुदेवाची बायको.

**रोज़**–पु· [ फा. ] दिवस. अव्य. नित्य; दररोज.

**रोजगार**–पु· [ फा. ] १ व्यापार. २ धंदा. **रोज़गारी**–पु· व्यापारी.

**रोज़नामचा**–पु· [फा.] दैनंदिनी; रोजनिशी.

**रोज़मर्रा**—अव्य. [ फा. ] नित्य; दररोज. पु·व्यावहारिक बोली, भाषा.

**रोज़ा**–पु· [ फा. ] १ अुपवास; रमजान महिन्यांत मुसलमान करतात तो अुपवास.

**रोज़ी**–स्त्री· [ फा. ] १ अुपजीविका. २ रोजचा जेवणखर्च. ३ मजुरी.

**रोज़ीना**–पु· [ फा. ] मजुरी.

**रोटी**–स्त्री· [ ? ] १ भाकरी; पोळी. २. स्वयंपाक. ३ जेवण.

**रोडा**–पु· गोटा; लहान दगड. (मु.) **रोडा अटकाना**–मार्गांत अडथळा करणें.

**रोदा**–पु· धनुष्याची दोरी.

**रोधना***–*क्रि. स.* अडविणें; आड-काठी करणें.

**रोना**–*क्रि. अ.* १ रडणें. २ चिडणें. *वि.* चिडका; रड्या. (यौ.) **रोना-धोना**–रडारड; विलाप.

**रोपना**–*क्रि. स.* १ रोप लावणें. २ पेरणें. ३ बसविणें; घट्ट करणें.

**रोप**–*पु.*[*अ.*]१ रुबाब; वचक; वजन. २ अैट. [प्रभावशाली; तेजस्वी.

**रोपदार**–*वि.*[*अ.*+फा.] रुबाबदार;

**रोम**–*पु.*[अि.]अिटलीची राजधानी.

**रोम-रोयाँ**–*पु.*शरीरावरील केंस;लव.

**रोया**–*पु.* [ *अ.* ] स्वप्न.

**रोर**—*स्त्री.* आरडाओरड; दंगल; आक्रोश. *वि.* १ वेगवान.२दुर्दम्य.

**रोरी–ली**—*स्त्री.* कुंकू.

**रोल***–*स्त्री.* १ गडबड. २ आवाज.

**रोला**–*पु.* १ गोंगाट; गोंधळ. २ तुंबळ युद्ध.

**रोवनहार**–*वि.* रड्या.

**रोवनी-धोवनी**–*स्त्री.* [ दे.] शोक; रडवेपणा. [ २ रड्या.

**रोवासा**–*वि.* १ रडकुंडीस आलेला.

**रोशन**—*वि.* [ फा. ]१ प्रज्वलित; प्रकाशित. २ प्रकट; अुघड;प्रसिद्ध.

**रोशनचौकी**–*स्त्री.* [ फा.] सनअी; वाजंत्री. [झरोका.

**रोशनदान**—*पु.* [ फा. ] गवाक्ष;

**रोशनदिमाग**–*पु.* [फा. ] १ बुद्धि-मान. २ तपकीर.

**रोशनाअी**–*स्त्री.* [ फा.] १ शाअी. २ प्रकाश. ३ आरास; रोषणाअी.

**रोशनी**–*स्त्री.* [ फा. ] १ अुजेड; प्रकाश. २ ज्ञान. ३ दिवा.

**रोहू**–*स्त्री.* मोठा मासा.

**रौंद**–*स्त्री.* तुडवणें; तुडवातुडवी.

**रौंदना**–*क्रि. स.* चिरडणें; तुडविणें.

**रौज़न**–*पु.* [फा.] झरोका. [स्थान.

**रौज़ा**—*पु.*[*अ.*]१ बाग. २समाधि-

**रौताअिन**—*स्त्री.* सरदारीण.

**रौनक**–*स्त्री.* [*अ.*] १ कांति; तेज़. २ शोभा. ३ रूप; छटा.

**रौरव**–*वि.* भयंकर. *पु.* नरकस्थान.

**रौला**—*पु.* धामधूम; गडबड.

**रौस**—*स्त्री.* [ फा. ] चाल; रीत; पद्धति.

## ल

**लंक**–*स्त्री.* कंबर; कटि.

**लंकलाट**–*पु.* [ अि. ] अुत्तम तलम विलायती कापड;लँकेशायरचें कापड.

**लंका**–*स्त्री.* लंका; सिलोन. ( यौ. ) **लंकानायक,लंकाधिपति,लंका-पति, लंकेश, लंकेश्वर, लंकेस-**

१ रावण; २ बिभीषण.
**लंगड-डा**–*वि.* लंगडा.
**लँगडाना**–*क्रि. अ.* लंगडत चालणें.
**लंगर**–*पु.* [फा.] १ नांगर (जहाजाचा). २ गळ्यांतला ओंडका; लोढणें. ३ लोखंडी साखळदंड. ४ पेहेलवानी लंगोट. ५ धांवदोरा. ६ गरिबाला नित्य द्यावयाचा शिधा; सदावर्त. *वि.* भारी; वजनदार. (मु.) **लंगर करना**–तंटा बखेडा करणें. [अगाअू व्यक्ति.
**लंगर**—*स्त्री. पु.* [दे.] धृष्ट किंवा
**लंगर**–*पु.* १ लंगडा. २ श्रीकृष्ण.
**लँगरअी-लँगराअी**–*स्त्री.* १ धृष्टता; मर्यादातिक्रम. २ दुष्टता.
**लंगूर**—*पु.* १ माकड. २ शेंपूट (माकडाचें). ३ वानर.
**लँगोट, लँगोटा**—*पु.* लंगोट; लंगोटा. (यौ.) **लँगोटबंद**—ब्रह्मचारी.
**लँगोटी**—*स्त्री.* लंगोटी; कौपीन. (मु.) **लँगोटिया यार**–लंगोटीमित्र; बालमित्र. **लँगोटीपर फाग खेलना**–अुधळेपणा करणें; शक्तीबाहेर खर्च करणें. [ओलांडणें.
**लंघना***–*क्रि. स.* अुल्लंघन करणें;
**लंठ**–*वि.* मठ्ठ; मूर्ख. [लांडा.
**लँडूरा**—*वि.* [दे.] शेंपूटतुटका;
**लंपट**—*वि.* विषयी; व्यभिचारी; कामुक. [सारखा अुंच.
**लंबतडंग**–*वि.* लांबटांग्या; ताडा-
**लंबा**–*वि.* १ लांब. २ दूर. ३ अुंच. **लंबाअी**–*स्त्री.* लांबी; लांबटपणा; दीर्घता. (यौ.) **लंबा-चौडा**-अैसपैस; ऐसघशीत. **लंबान**–*स्त्री.* लांबी.
**लंबी**–*वि. स्त्री.* लांबडी; अुंच. (मु.) **लंबी तानना**-१ आरामांत डारढूर झोंपणें. २ पळून जाणें.
**लंबोतरा**–*वि.* लांबट.
**लंबोदर**-*पु.* गणपति.
**लकडबग्घा**–*पु.* लांडग्यापेक्षां मोटा जंगली प्राणी; तरस.
**लकडहारा**–*पु.* लाकूडतोड्या.
**लकडा**–*पु.* लाकडाचा ओंडका.
**लकडी**–*स्त्री.* १ लाकूड. २ जळणाचें लाकूड. ३ काठी; छडी.
**लकदक**–*वि.* [अ.] झाड नसलेलें (मैदान); चमकदार.
**लकनत**–*स्त्री.* [अ.] तोतरेपणा.
**लकब**–*पु.* [अ.] १ पदवी; किताब; २ अुपनांव.
**लकवा**–*पु.* [अ.] अर्धांगवायु.
**लकीर**–*स्त्री.* १ रेघ. २ ओळ; रांग. (मु.) **लकीर का फकीर**–जुन्या चाकोरींतून जाणारा. **लकीर**

पीटना—अंधानुकरण करणें.
**लकुट, लकुटिया, लकुटी**—*स्त्री.* काठी; छडी; लाकूड.
**लक्कड**—*पु.* लाकडांचा ओंडका.
**लक्का**—*पु.* [*अ.*] अेक जातीचें कबूतर.
**लक्खी**—*पु.* लक्षाधीश.
**लक्खी**—*वि.* लाखेच्या रंगाचा; लाखी रंगाचा.
**लकावी**—*पु.* अश्वविशेष.
**लक्षण**—*पु.* चिह्न; खूण.
**लक्षणा**—*स्त्री.* अभिप्राय किंवा तात्पर्यसूचक शब्द; उद्देश.
**लक्ष्य**—*पु.* निशाणा; लक्ष्य.
**लखपती**—*पु.* लक्षाधीश.
**लखन***—*पु.* लक्ष्मण.
**लखना**—*क्रि. स.* १ पाहाणें. २ ताडणें; अनुमान करणें.
**लखलखा**—*पु.* [फा.] शुद्धीवर आणण्यासाठीं अुपयोगांत आणली जाणारी वल्ली.
**लखलुट-लखलूट**—*वि.* अुधळ्या.
**लखाअु-अू***—*पु.* १ खूण; लक्षण; चिह्न. २ ओळख पटण्यासाठीं खूण म्हणून दिलेली वस्तु.
**लखाना***—*क्रि. अ.* दिसणें. *क्रि. स.* दाखविणें; कल्पना देणें.
**लखिया***—*पु.* प्रेक्षक.
**लखी**—*पु.* लाल घोडा.
**लखेरा**—*पु.* लाखेच्या बांगड्या तयार करणारा कांसार.
**लखौटा**—*पु.* १ अुटी. २ कुंकवाची डबी.
**लखौरी**—*स्त्री.* लाखेपासून बनविलेली [वस्तु.
**लखौरी**—*स्त्री.* लाखोली. [वीट.
**लखौरी**—*स्त्री.* १ भुंगा. २ लहान
**लग, लगि**—*क्रि. वि.* पर्यंत; निकट; समीप. अव्य. साठीं; करितां.
**लगन**—*स्त्री.* १ संबंध. २ प्रेम; स्नेह. *पु.* १ लग्नाचा मुहूर्त. २ लग्नसराअी. ३ लग्न. *वि.* गर्क; मग्न; चूर. **लगनपत्री**—लग्नपत्रिका (मुलीचा बाप मुलाच्या बापास पाठवितो ती).
**लगना**—*क्रि. अ.* १ लागणें. २ चिकटणें; जुळणें. ३ पान्हवणें (गाय, शेळी अि.). (मु.) **लगती बात कहना**—मर्मभेदक वाक्य अुच्चारणें; जिव्हारीं लागणारें बोलणें.
**लगनि***—१ संबंध; लागाबांधा. २ प्रेम; प्रीति. ३ मग्नता. ४ अेकाग्रता. [२ परात.
**लगनी**—*स्त्री.* [फा.] १ ताटली.
**लगभग**—*क्रि. वि.* अदमासें; जवळजवळ; सुमारें.

**लगर**—पु. [ दे. ] घारीसारखा अेक शिकारी पक्षी.

**लगलग**—वि. [ अ. ] १ अत्यंत दुबळा; हडकुळा. २ नाजुक.

**लगव**—वि. [ अ. ] १ खोटें; असत्य; मिथ्या. २ व्यर्थ; निरर्थक.

**लगवाना**—क्रि. स. लावविणें.

**लगातार**—क्रि. वि. लागोपाठ; अेकसारखें.

**लगान**—पु. १ कर; महसूल. २ लावण्याची क्रिया. ( यौ. ) **लगान बंदी**—कर-बंदी; साराबंदी.

**लगाना**—क्रि. स. १ लावणें. २ जोडणें; चिकटविणें. ३ अेकावर अेक ठेवणें; रचणें. ४ सम्मीलित करणें. ५ आघात करणें; मारणें. ६ दूध काढणें ( गाय, म्हैस अित्यादिकांचें ). ( मु. ) **लगाना बुझाना** — लावालावी करणें; भांडण लावणें.

**लगाम**—स्त्री. [ फा. ] लगाम; लगामाच्या दोऱ्या.

**लगार**—स्त्री. १ रतीब. २ रोज नियमित द्यावयाचें अन्न. ३ संबंध; प्रेम. ४ भेद्या; हेर. [संबंध; मळ.

**लगालगी**—स्त्री. १ स्नेह; प्रेम.

**लगाव**—पु. संबंध; संपर्क.

**लगावन***—स्त्री. संबंध; लागाबांधा.

**लगि***—क्रि. वि. १ पर्यंत. २ निकट; जवळ. [ २ करितां.

**लगि**—अव्य. १ बरोबर; सह.

**लगो**—वि.[अ.]असभ्य;वाह्यात गोष्ट.

**लग्गा**—पु. कार्यारंभ; सुरवात.

**लग्गा**—पु. लांब बांबू; फळें तोडण्यासाठीं आंकडी बांधलेला मोठा बांबू. [ जातीचा चित्ता.

**लग्घड**—पु. [दे.] १ ससाणा. २ अेक

**लग्वियात**—स्त्री. [ अ. ] निरर्थक; वाह्यात किंवा असत्य गोष्टी.

**लघु**—वि. १ लहान; अल्प. २ शीघ्र; लौकर. ३ सुंदर. ४ क्षुल्लक. ( यौ. ) **लघुतम**—अत्यंत लहान,

**लघुता-लघुताअी**—स्त्री. १ नम्रता. २ लहानपणा; हलकेपणा.

**लघुशंका**—स्त्री. लघ्वी.

**लचक**—स्त्री. १ चमक; मुरका. २ लवचीकपणा. **लचकनि***—स्त्री. १ लवचीकपणा. २ मुरका. [लचकणें.

**लचकना**—क्रि. अ. [अनु.] वांकणें;

**लचीला**—वि. लवचीक. ( यौ. ) **लचीली शासनपद्धति**—स्त्री. परिवर्तनशील राज्यघटना.

**लच्छ***—पु. १ बहाणा; ढोंग. २ लक्ष्य; निशाण.

**लच्छन***—पु. लक्षण.

**लच्छा**—पु. [ अनु. ] १ गोंडा;

झुपका. २ अेक दागिना. ३ गोळे असलेला घट्ट पदार्थ.

**लच्छित***–*वि.* १ पाहिलेला, अव-लोकिलेला. २ खूण पाडिलेला; चिह्न केलेला. ३ लक्षणी; गुणांनीं युक्त.

**लच्छेदार**—*वि.* [ अनु. + फा. ] गोळे असलेला; घट्ट व दाट (खाद्यपदार्थ). २ मजेदार (गोष्टी).

**लछन–लछमन–लछिमन**— *पु.* लक्ष्मण. **लछमी**–*स्त्री.* लक्ष्मी.

**लज***—*स्त्री.* लाज.

**लजना**—*क्रि. अ.* लाजणें.

**लजवाना**—*क्रि. स.* लाजविणें.

**लजाना**—*क्रि. अ.* लाजणें. *क्रि. स.* लाजविणें.

**लजालू**—*पु.* लाजाळूचें झाड.

**लजीला**—*वि.* लज्जाशील; लाजरा.

**लज्ज़त**—*स्त्री.* [ *अ.* ] १ स्वाद; रुचि. २ आनंद; सुख.

**लट**—*स्त्री.* १ केसांची बट. २ गुंतवळ ( केसांची ).

**लटक**—*स्त्री.* १ हावभाव; अंग-विक्षेप. २ लचक; मुरगळा.

**लटकन**—*पु.* १ कच्छपीं लागलेला माणूस. २ नथीचा चौकडा.

**लटकना**—*क्रि. अ.* १ लोंबकळणें; लटकणें. २ वांकणें; ओणवें होणें; कलणें. ३ लचकणें; मुरगळणें. ४ पडून राहणें ( काम ).

**लटका**—*पु.* १ चाल; ढब; तऱ्हा. २ डाव. ३ बनावट गोष्ट. ४ तोडगा. ( मु. ) **लटके में आना**–जाळ्यांत अडकणें; फसणें.

**लटना**—*क्रि. अ.* १ गळून जाणें; थकणें. २ दुबळें होणें; अशक्त होणें. ३ अस्वस्थ किंवा व्याकुळ होणें.

**लटपटा**–*वि.* १ सैल; ढिला. २ झोकांडी जाणारा. ३ तोतें; अस्पष्ट ( बोलणें ).

**लटपटाना**–*क्रि. अ.* १ अडखळून पडणें. २ लटपटणें.

**लटूरी**–*स्त्री.* केसांची बट.

**लट्टू**–*पु.* भोंवरा ( खेळ ). (मु.) **(किसी पर) लट्टू होना**–मोहित होणें; बेहद्द खुश होणें.

**लठैत**–*पु.* लाठीबाज.

**लठ्ठ**–*पु.* मोठा दंडा; सोडगा.

**लठ्ठबाज**–*पु.* [ *सं.* + फा. ] लाठी-बाज. **लट्ठमार**—*वि.* लाठी चालविणारा.

**लठ्ठा**–*पु.* १ लांब बांबू; २ वासा. ३ तुळअी. ४ लाकडाचें खोड. ५ अेक प्रकारचें जाडेंभरडें कापड.

**लडंत**–*स्त्री.* सामना; लढाअी; द्वंद्व.

**लडकखेल**–*पु.* १ पोरखेळ. २ सोपें काम.

**लडकपन**—*पु*. १ बालपण. २ पोरकट-पणा. ३ चपलता; चंचलता. [पणा.

**लडकबुद्धि**—*स्त्री*. बालबुद्धि; अज्ञानी-

**लडका**—*पु*. १ मुलगा. २ पुत्र. ३ मूल (लहान). **लडकों का** (मु.) **खेल**—मामुली गोष्ट; पोरखेळ. **लडकी**- मुलगी.

**लडकौरी**-*वि*. *स्त्री*. लेंकुरवाळी.

**लडखडाना**—*क्रि*.*अ*. १ अडखळणें; झोक जाणें; डगमगणें. २ अडखळून पडणें; आपटणें.

**लडना**—*क्रि*. *अ*. १ लढणें. २ भांडण करणें. ३ टक लावणें. ४ डावपेंच करणें (दुसऱ्याच्या विरुद्ध).

**लडबावला**—*वि*. १ अल्लड. २ बावळा; अडाणी. [भांडण; तंटा.

**लडाअी**-*स्त्री*. १ युद्ध; लढाअी. २

**लडाका-कू**—*वि*. १ लढाअू वृत्तीचा (शिपाअी). २ भांडकुदळ.

**लडाना**—*क्रि*. *स*. १ लाड करणें. २ लाडावून ठेवणें.

**लडाना**—*क्रि*. *स*. लढविणें. २ भांडण करविणें. ३ लढण्यास अुत्ते-जन देणें. ४ युक्ति लढविणें.

**लडुआ-वा**—*पु*. लाडू.

**डैता**-*वि*. १ लढणारा. २ योद्धा.

**लडैता**—*वि*. १ लाडका; प्रिय. २ लाडावलेला; शेफारलेला; विथरलेला.

**लड्डू**—*पु*. लाडू.

**लत**—*स्त्री*. खोड; वाअीट संवय.

**लतखोर-खोरा**—*वि*. [सं.+फा.] १ लाथखाअू; निर्लज्ज. २ पायपुसणें.

**लतर**—*स्त्री*. वेल; लता.

**लताडना**—*क्रि*. *स*. १ लाथाडणें; तुडवणें; ठोकरणें. २ लाथा मारणें. ३ हैराण करणें; सतावणें.

**लतियाना**—*क्रि*. *स*. १ लाथाडणें; ठोकरणें. २ लाथा मारणें; तुडवणें.

**लतीफ़**—*वि*. [*अ*.] १ स्वादिष्ट; रुचकर. २ सूक्ष्म. ३ कोमल. ४ अुत्तम; छान.

**लतीफ़ा**—*पु*. [*अ*.] कहाणी; गोष्ट.

**लत्ता**—*पु*. फाटकें-तुटकें कापड; चिरगुट. (यौ.) **कपडालत्ता**—पोषाख **लत्ती**-*स्त्री*. चिंधी.

**लत्ती**—*स्त्री*. दुगाणी; लत्ताप्रहार.

**लथपथ**—*वि*. [अनु] १ ओथंब-लेला; थबथबीत. २ भरलेला; बरबटलेला.

**लथाडना, लथेडना**—*क्रि*. *स*. [अनु.] १ चिखल अित्यादीनें घाण करणें. २ लोळविणें; घाण करणें. ३ फरफटणें. ४ हैराण करणें; थकविणें. ५ दटावणें.

**लदना**—*क्रि*. *अ*. १ ओझें लादलें

जाणें. २ शिक्स्त होणें; तुरुंगांत जाणें. ३ निघून जाणें.

**लद्वाना**—*क्रि. स.* ओझें लादणें.

**लदाऊ, लदाव***–*पु.* १ भार; ओझें; बोजा. २ पटअी. ३ तुळअी न लावतां केलेलें छत. ४ लादण्याची क्रिया.

**लद्वा, लद्दू**—*वि.* ओझें वाहणारा.

**लद्धड**—*वि.* आळशी; सुस्त.

**लद्धना***—*क्रि. स.* मिळविणें; प्राप्त करणें.

**लपक**—*स्त्री.* [अनु.] १ ज्वाला. २ चमक; लखलखाट. ३ वेग; गति.

**लपकना**—*क्रि. अ.* [अनु.] १ धांवून जाणें. २ अंगावर धांवून जाणें; आक्रमण करणें. ३ लपलपणें (तलवार अि.).

**लपट**—*स्त्री.* १ ज्वाला; आगीची लपेट. २ आंच; झळ. ३ वाऱ्याची झुळूक. ४ सुगंध.

**लपटना**—*क्रि. अ.* १ आलिंगणें. २ चिकटणें; भिडणें. ३ गढून जाणें; मग्न होणें. [सांजा. २ संबंध.

**लपटा**—*पु.* १ तिखटामिठाचा शिरा;

**लपना**—*क्रि. अ.* [अनु.] १ वांकणें २ हालणें; डोलणें. ३ हैराण होणें.

**लपलपाना**—*क्रि. अ.* [अनु.] लपलप होणें; जोरानें हलणें (लवचीक छडी); चमकणें; लपकणे (तलवार अि.).

**लपसी**—*स्त्री.* लापशी.

**लपाना**—*क्रि. स.* [अनु.] लपलप करणें; जोरानें हालविणें (लवचीक छडी, तलवार अि.)

**लपेट, लपेटन**—*पु.* १ बांधण्याचें कापड; वेष्टण. २ गुंडाळा; वेष्टण. ३ घेर. ४ विवंचना.

**लपेटना**—*क्रि. स.* १ गुंडाळणें. २ गाठोडें करणें; बांधून घेणें. ३ धरणें. ४ विवंचनेंत टाकणें.

**लफंगा**—*पु.* [फा.] बदमाश; लुच्चा.

**लफना**—*क्रि. अ.* १ लपलप करणें; (वेत, कामटी, तलवार अि.) हालणें. २ वेगानें जाणें; धांवून जाणें.

**लफ़ज़, लफ्ज़**—*पु.* [अ.] शब्द. **लफ्ज़ी**—*वि.* शाब्दिक. **लफ्ज़ीमानी**—*पु.* शब्दार्थ.

**लफ्फाज़**—*वि.* [अ.] बाता मारणारा; गप्पीदास. **लफ्फाज़ी**—*स्त्री.* बाताडेपणा; बढाअी. [३ किनारा.

**लब**—*पु.* [फा.] १ ओठ. २ थुंकी.

**लबडधोंधों**—*स्त्री.* [अनु.] १ घोंटाळा. २ गोंधळ; गडबड. ३ खोटेपणा; बेअिमानी. ४ आरडाओरड; गलबला. [भरलेला.

**लबरेज़**—*वि.* [फा.] कांठोकांठ

